# क्रांतीच्या वाटेवर

*

लेखिका

निर्मला देशपांडे



परंधाम विद्यापीठ प्रकाशन, वर्धा

किंमत एक रुपया

# प्रस्तावना

बिहारचा कार्यक्रम होता भूरि-दान. भूरि-दान हा काहीं भूमि दानाचा कळस नाहीं. त्याचा कळस ग्राम दान. म्हणजे जमिनीची व्यक्तिगत मालकी संपवणें. हा प्रयोग मला ओडिसात करायचा होता. कारण एक तर ओडिसाचें क्षेत्र त्याला विशेष अनुकूल होतें. ओडिसाची गरिबी गरिबीबद्दल गाजलेल्या हिंदुस्थानात हि अद्वितीय च. गरिबानीं आर्धी मालकी नाहीं सोडायची तर कुणीं सोडायची? श्रीमंताची सुटायची, गरिबानीं सोडायची. भारताचें हें भाग्य कीं श्रीमंत हि कुणी कुणी मालकी सोडायला तयार होतात. पण हें भाग्य अति ताणून चालायचें नाहीं. अति ताणलें तर तुटायचें, म्हणून मिळाली तितकी श्रीमंताची सहानुभूति मिळवून, गरिबानीं मालकी सोडण्याचा प्रयोग यशस्वी करणें हा च श्रीमंतीचा बालेकिल्ला जिंकण्याचा कुशल उपाय होता. त्यासाठीं ओडिसाचें क्षेत्र अनुकूल होतें. शिवाय ओडिसात जनतेविषयींच्या सद्भावनेनें आणि अनुरागानें प्रेरलेली वानरसेना (हनूमदादि नायकासकट) सज्ज होती. म्हणून ओडिसात सर्वोदयाचें नशीब अजमावून पाहण्याचें योजिलें होतें.

बिहारच्या माझ्या यात्रेला मीं 'आनंद यात्रा' असें नाव दिलें होतें. तदनंतर बंगालची छोटीशी प्रेम यात्रा संपवून ओडिसांत शक्ति यात्रेला आरंभ करायचा होता. सुमारें सात आठ महिने ही शक्ति यात्रा चालली. पूर्वार्धांत झाला शक्तीचा शोध, उत्तरार्धात तिचें दर्शन.

कोरापुट जिल्ह्यात उत्तरार्ध सुरू झाला, आणि त्या जिल्ह्यात च तो संपला भर पावसाळ्यात जसा शिवाजीनें जंजिऱ्याच्या सिद्दीवर हल्ला केला, तसा ओडिसाच्या कार्यकर्त्यांनीं कोरापुटच्या मलेरिया शीतल चातुर्मास्यात कोरापुटवर हल्ला चढविला. एकेकानें आजारी पडावें आणि दुरुस्त होऊन पुन्हा आघाडीवर जावें. चातुर्मास्यात देव देखील झोंपतात असें पुराण आहे. चातुर्मास्यात सेवकानीं जागून इतिहास बनविला. शेंकडों ग्राम दानें कोरापुट-मध्यें मिळालीं आणि सर्वोदयाच्या अंगावर मूठभर मांस चढलें. त्यानंतर बाबाचा मुक्त विहार चालू आहे. तो हि तामिल्नाडमध्यें थोडा सोपाधिक

झाला आहे. त्यातून सुटल्यावर निरुपाधिक मुक्त विहार सुरू होईल अशी बाबाला आशा आहे.

शक्तीचा शोध व शक्तीचे दर्शन – ओडिसाच्या यात्रेचा पूर्वार्ध आणि उत्तरार्ध – आमच्या दोघी मुलींनीं दोन पुस्तकांत चित्रित केला आहे. हिंदींतून दोन्ही पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. मराठींत आता होत आहेत.

जगलाचा प्रवास वर्णन करणारे दुर्मिळ च असतात. कारण वर्णन करू शकणारे जगलात जात नसतात. आणि जगलात जाणारे वर्णन करू शकत नसतात. वाणीला डोळा नाहीं, डोळ्याला वाणी नाहीं, असें रामायणात तुलसीदासानीं म्हटलें आहे. पण सर्वोदय विचाराचें हें सामर्थ्य होय कीं त्याने वाणीला डोळा लाभला आणि डोळ्याला वाणी लाभली. वाचकाचें हें भाग्य च म्हटलें पाहिजे.

उत्तरार्ध आणि पूर्वार्ध दोन्ही एका च पुस्तकात घालता आले असते. पण त्यानें पुस्तक थोडें मोठें झालें असतें म्हणून दोन भाग केले आहेत. वाचकाना एकदम च अजीर्ण व्हायला नको. एकामागून एक सेवन करून सावकाश पचविता येईल.

भूदानयज्ञ-यात्रा<br>
कोइमतूर जिल्हा<br>
२३–९–५६

# अनुक्रमणिका

# क्रांतीच्या वाटेवर

## अल्लाचें दर्शन

पटाव–ब्रह्मपुर
[ जि. गंजाम, उत्कल ]
७ मे ते ११ मे १९५५

" मुझे उसके चेहरे मे अल्लाह का दर्शन हुआ।"...वाक्‌ सरितेवरील शब्द-तरंग विरले. क्षणभर निःशब्द शांतता पसरली आणि मग पुन्हा हलके च एकेक तरंग उमटू लागला — " बिहारच्या यात्रेंतील घटना. मी अेका मुसलमान बंधूकडे जमीन मागायला गेलों होतों. त्याच्याजवळ बरी च जमीन होती व त्यानें कांहीं जमीन दान देण्याचें कबूल देखील केलें होतें. मीं त्याला म्हटलें कीं साधारणतः प्रत्येक घरात पाच पांडव असतात असें मी मानतों आणि म्हणून मी सहाव्या भावाच्या नात्यानें सहाव्या हिस्स्याची मागणी करतों. तो चटकन् उद्‌गारला, ' हो, काय योगायोग ! आम्ही देखील पाच च भाऊ आहोत. पण हे बघा, आम्हा मुसलमानात बहिणींना देखील संपत्तीचा अधिकार असतो. मला दोन बहिणी आहेत.' त्याच्या मुखींचे हे शब्द कानावर पडता च मीं तत्क्षणीं त्याच्या चेहेऱ्याकडे पाहिलें."

हृदयींच्या गुहेंतून अेक गंभीर ध्वनि निघाला— " मुझे उसके चेहरे मे अल्लाह का दर्शन हुआ। ( मला त्याच्या चेहऱ्यात ईश्वराचें दर्शन घडलें. ) मीं लगेच च म्हटले, ' तुझें म्हणणें अगदीं मान्य आहे मला. तुम्ही सात भावंडें ना ? तर मी आठवा झालों. मला आठव्या हिस्स्याचे दान द्या. ' त्यानें त्या च क्षणीं होकार दिला नी आपल्या जमिनीच्या आठव्या हिस्स्याचे दानपत्र लिहून देखील टाकलें."— भारतवासीयांचीं हृदयें किती पवित्र

आहेत याचें या घटनेनें भान होतें. अेवढ्या च करता मीं तुम्हाला ही गोष्ट सांगितली. मी तर अत्यंत कठोर हृदयाचा माणूस मला कुणाच्या मरणाचें दुःख नाहीं कीं कुणाच्या जन्माचा आनंद वाटत नाहीं. पण या भूदानयज्ञात मला जे अनुभव आले त्यामुळें माझें हृदय अतिशय कोमल बनलें. आणि गेल्या अनेक वर्षांच्या अेकान्त ध्यानसाधनेंत देखील मला जेवढा भक्तिलाभ झाला नाहीं तेवढा यात झाला. या सार्‍या अनुभवावरून माझ्या ध्यानात आलें कीं आपल्या देशात अेक सुप्त शक्ति आहे. तिच्या आधारावर आपण या देशाला सामर्थ्यशाली बनवू शकू ”

विनोबाच्या शब्दाच्या गतीबरोबर धावू पाहणाऱ्या लेखणीला थांबवीत मीं क्षणभर वर दृष्टि वळवली. अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीच्या अधिवेशनाकरता कलात्मकतेनें सजवलेला भव्य मंडप, कानात सारे प्राण अेकून विनोबा यांची अैकणारी तीं असंख्य माणसें, विद्युद्दीपाच्या झगझगटात उठून दिसणाऱ्या त्या व्यासपीठावरील ' प्रकाशातील व्यक्ति ', ध्यानस्थ अवस्थेंत डोळे मिटून बोलणाऱ्या विनोबाच्या कृश मूर्तीवर दृष्टि रोखीत अेकाग्र चित्तानें श्रवण करणारे भारताचे पंतप्रधान — या सर्वांवर निमिषार्धांत नजर टाकीत मीं व्यासपीठामागच्या पडद्याकडे बघितलें. पण भारतीय चित्रकाराच्या कुंचल्यातून निर्माण झालेल्या त्या सुंदर सृष्टीला डोळ्यात साठवून घेण्यापूर्वी च माझी दृष्टि खालीं वळली व पांढऱ्या कागदावर काळ्या रेघा मारीत लेखणी पुढें धावू लागली.

' रूप पाहता लोचनीं, सुख झाले वो साजणी ' — डोळ्यांना दिसणाऱ्या प्रत्येक रूपात विनोबांना देवाचें दर्शन घडतें, अन् मग त्याचें भारतीय मन भारतीय मनाला कळणाऱ्या गूढ भाषेंत त्या आनंदाचें वर्णन करू लागतें. आज हि त्यांनीं भाषणाची सुरवात करताना म्हटलें कीं, सुहृज्जनाच्या दर्शनानें मला अपार आनंद झाला— जणू तहानलेला जीव पाणी पिऊन तृप्त झाला !

भूदानयज्ञ आणि विश्वशांति यामधील निकटच्या नात्याचें विवेचन करीत विनोबा पुढें म्हणाले, “ आजच्या जगाला जडलेल्या रोगाचें मूळ काय आहे तें प्रथम शोधायला हवें आहे. या वैज्ञानिक युगात माणसाच्या हातात शक्ति

आली आहे एवढें च नव्हे तर माणूस शक्तीच्या अधीन झाला आहे. आज सारें जग भयग्रस्त अवस्थेंत आहे. ही भयभीत अवस्था नाहींशी करण्याकरता मानवाच्या मनात निर्भयता निर्माण करावी लागेल. निर्भयता हा अहिंसेचा पर्यायवाची शब्द आहे. आम्हाला शांतता हवी आहे. तर मग आम्हाला हा विचार करायला हवा कीं आम्हीं आपल्या देशात अशी शक्ति निर्माण करण्याच्या दिशेने काम करीत आहोंत क, कीं जिच्या आधारें आमच्या सामाजिक जीवनातून हिंसेचें उच्चाटन होईल, सारे लोक स्वयशासित होतील? विज्ञान आणि अहिंसा यांच्या मीलनानें जगाचें कल्याण होईल पण अहिंसेवाचून विज्ञान विनाशकारी ठरेल. आणि म्हणून च आम्हाला आपल्या देशात अहिंसेची शक्ति वाढविण्याचें कार्य करायला हवें. त्याकरता समाजातील कठीण समस्या अहिंसेच्या, शांततेच्या, मार्गानें सोडविण्याचे मार्ग शोधून काढले पाहिजेत. भूदान यज्ञाकडे तुम्ही या दृष्टिकोनातून बघा, कीं याच्या द्वारें अहिंसेची शक्ति निर्माण करण्याची एक युक्ति आपल्याला गवसली आहे. म्हणून च मीं म्हटलें आहे कीं, जो भूदान यज्ञात दान देतो तो जागतिक शांततेकरता आपलें मत देतो."

ब्रह्मपुरला गांधी कुटुंबातील आप्तजनांच्या भेटीगाठी हा च विनोबाचा मुख्य कार्यक्रम होता. काहींशी तर तासन् तास चर्चा झाल्या. विचार, प्रकृति आणि परिस्थितीच्या भिन्नतेमुळें कोणीं सत्ता ग्रहण केली होती तर कोणीं 'नवाखाली'च्या वाटेवर पुढें पुढें पावलें टाकलीं. परंतु तरी हि सर्वांना एकत्र गुंफणारा तो अव्यक्त धागा कधीं हि तुटू शकत नव्हता. विनोबा म्हणाले, "आम्हीं मनमोकळेपणानें व जिव्हाळ्याने परस्पराची विचारसरणी समजून घेण्याचा प्रयत्न केला." पंडित नेहरूंनीं पहिल्या दिवशींच्या जाहीर सभेत सांगितलें कीं, "विनोबाजींचा सल्ला घेता यावा म्हणून च आम्हीं अ. भा. कॉंग्रेस कमिटीची बैठक ब्रह्मपुरला घेण्याचें ठरवलें." विनोबा आपल्या ठरलेल्या मार्गानें यात्रा करीत होते. त्यांच्या वाटेवरचें ब्रह्मपुर हे गाव निवडून तिथें कॉंग्रेसची बैठक घेण्याचा निर्णय सुमारें दीडदोन महिन्यांपूर्वीं च त्या लोकांनीं घेतला होता.

सत्ताधीशांच्या आगमनामुळें ब्रह्मपुरला वेगळें च वातावरण निर्माण झालें होतें. पोलिसांच्या रांगा, तिरंगी झेंडे फडकवीत भरधाव धावणाऱ्या मोटारी,

धाडरे शुभ्र खादीचे कपडे घातलेल्या व्यक्ति–सारें पाहून दुसऱ्या च जगात गेल्यासारखें वाटत होतें. पण स्मृति विस्मृतींच्या वळात त्या जगातील एक च स्मृति घेऊन मी बाहेर पडलें. तो गंभीर आवाज कानात घुमत होता – ' मुझे उसके चेहरे में अल्लाह का दर्शन हुआ। '



## ' आम गॉरे भूमि-मालिक, रहिबे नाहीं '

वालीपदा, गोकर्णपुर, दिगपहडी, पुडामारी
१२ ते १५ मे १९५५

ढोल्क झाजा वाजवीत स्वागताला सामोऱ्या आलेल्या ग्रामवासियांना पाहून बहादुरपासून कित्ती तरी दूर आल्याची जाणीव झाली. वाटेवरचा मैलाचा दगड भौतिक अंतर दाखवीत होता तर डोंगराच्या पायथ्याशी हिरव्या झाडाच्या छायेंतल्या त्या छोट्या छोट्या झोपड्या दुसरें च अंतर भासवीत होत्या लोक घोषणा करीत होते. त्यातील एका घोषणेचा उच्चार करीत विनोबानीं साद घातली, ' आम गॉरे भूमिहीन ' ( आमच्या गावात भूमिहीन ), लोकानीं उत्साहानें प्रतिसाद दिला — ' रहिबे नाही, रहिबे नाही ' ( राहणार नाहीं, राहणार नाहीं ) विनोबानीं दुसरी साद घातली, ' आम गॉरे भूमिमालिक '— घोषणा अपरिचित होती. लोक क्षणभर थांबले नी मग दुप्पट उत्साहात म्हणाले ' रहिबे नाही, रहिबे नाही ' विनोबा बोलू लागले— " आपल्या गावात कोणी हि भूमिहीन राहू नये, सर्वांना जमीन मिळावी, हें आरंभींचें कार्य आहे व आपल्या गावात कोणी हि भूमीचा मालक राहू नये, सारी जमीन देवाची व्हावी, हें अंतिम कार्य आहे. भूमि आपली माता, भूमिपति परमेश्वर नी आपण सारे भूमिपुत्र " विचारवन्हीची पहिली ठिणगी होती ती! अरण्ययात्रेंत पहिल्या च दिवशीं मालकीहक्काचें विसर्जन करणाऱ्या मनाचें बीजारोपण झालें !

गोकर्णपुरच्या सभेंत विनोबांनीं मागें १९५१ सालीं विंध्यप्रदेशाच्या यात्रेंत घडलेली घटना सांगितली. तिथें एका लहानशा गावातल्या लोकांनीं त्याना विचारलें कीं महात्मा गांधी सध्या कुठें आहेत? त्या लोकाना हें देखील माहीत नव्हतें कीं हिंदुस्तानला स्वराज्य मिळालें आहे. विनोबा म्हणाले, "सूर्योदय झाला हें काय दवंडी पिटवून सांगावें लागतें का? सूर्योदय झाला म्हणजे दिल्लीच्या बंगल्यात हि त्याचीं किरणें प्रवेश करतात नी खेड्यातल्या झोपडींत हि प्रवेश करतात. त्याच्या किरणाची ऊब नी प्रकाश सर्वांना सारखा मिळतो. पण स्वराज्य मिळाल्यानंतर हि लोकांच्या जीवनात काहीं फरक च नाहीं पडला तर त्याना स्वराज्य भासणार कसें? आपल्या देशाला स्वराज्य मिळालें आहे—पण तें दिल्लींत, कलकत्त्यात नी कटकमध्ये आलें आहे; अजून खेड्यापाड्यापर्यंत पोहोंचलें नाहीं. ज्याप्रमाणें आपल्या पोटाची भूक शमवायला स्वतः च खायला पाहिजे, दुसरा पोटभर जेवला म्हणून काहीं माझें पोट भरत नाहीं, तसें च आपलें स्वराज्य आपण च मिळवावें लागतें. खेड्याखेड्यातील लोक जेव्हा जागृत होतील, जमीन व संपत्तीचें वितरण करून गरिबी व विषमता नाहींशी करतील, ग्रामोद्योग सुरू करतील, शिक्षण स्वच्छता वगैरे सर्व गोष्टींची योजना करून ग्रामराज्याची स्थापना करतील, तेव्हा स्वराज्य खेड्यात पोहोंचेल."

दिगपहडीला आमचें निवासस्थान एका रमणीय तलावाच्या काठीं होतें. तलावाच्या दुसऱ्या बाजूला असलेला येथील राजाचा जुनाट पडका महाल 'ते हि नो दिवसा गताः' चें स्मरण करवीत होता. राजसाहेब बदलत्या युगाचीं पावलें ओळखून भूदान देऊन आमच्या यात्रेंत सामील झाले आहेत. दुपारीं गावातील प्रतिष्ठित व्यक्ति विनोबाना भेटायला आल्या. एकानें प्रश्न विचारला कीं, 'सरकारचें स्वरूप कसें असायला हवें?' या प्रश्नाचें उत्तर आजच्या प्रवचनात मिळालें. विनोबा म्हणाले, "सरकारचें स्वरूप लोकांच्यावर अवलंबून असतें. ज्या कुटुंबात तरुण आईबाप व लहान मुलें असतात त्या कुटुंबाचें स्वरूप एक प्रकारचें असतें. तिथें मुलें आईबापाची आज्ञा मानतात. तर ज्या कुटुंबात प्रौढ आईवडील व तरुण मुलें असतात *त्यात आईबाप व मुलें सहकार्यानें काम करतात आणि ज्या कुटुंबात म्हातारे* आईबाप व प्रौढ मुलें असतात तिथें आईबाप फक्त सल्ला देतात व सारा

कारभार मुलांच्या च हातीं असतो. परंतु कुटुंबाचें मूलतत्त्व जें प्रेम, तें सर्वत्र कायम असतें. त्याप्रमाणें समाजाचें बाह्य स्वरूप परिस्थितीनुसार बदलत राहील. परंतु समाजाचें मूलतत्त्व असेल सर्वोदय. जसजशी जनता जागृत होत जाईल तसतशी सरकारची आवश्यकता कमी होत जाईल."

"समाजवादीरचना, लोकशाही हे सर्व सुशासनात मोडते आणि म्हणून तें शासनमुक्तीच्या पोटात सामावतें. ज्याप्रमाणें आईच्या पोटातल्या बाळाला आईकडून पोषण मिळतें त्याप्रमाणें ह्या सर्वांना सर्वोदयाकडून पोषण मिळतें. आमचा अंतिम आदर्श आहे 'शासनमुक्ति.' शासनहीनता ही अगदीं च भिन्न वस्तु आहे. शासनहीनता म्हणजे अदाधुंद कारभार. तेव्हा तो नाहींसा करून सुशासन निर्माण करायचें व पुढे सुशासनातून शासनमुक्तीकडे जायचें, ही प्रक्रिया आहे. शासनमुक्त समाजात सारें शासन खेड्या-खेड्यात वाटलें जाईल. काही नैतिक तत्त्वें साऱ्या समाजाच्या आचरणात आलेलीं असतील. तो समाज स्वयंशासित असेल आणि अपरिग्रहाच्या अधिष्ठानावर उभा राहील. म्हणून आमच्या कार्याचें स्वरूप दुहेरी राहील. एका बाजूनें शासनमुक्तीकडे दृष्टि ठेवून सुशासन चालवायचें व दुसऱ्या बाजूने शासनमुक्तीकरता जनशक्ति जागृत व संघटित करण्याचा प्रयत्न करावयाचा."

पुडामारीला एक चैतन्यसंप्रदायाचा मठ आहे. आमच्या भोजनाची व्यवस्था येथील महंतानें केली होती. महंत विनोबांना म्हणाले, 'तुमचें भूदानाचें काम अगदीं चैतन्य महाप्रभूंच्या आदेशानुसार चाललें आहे. आम्ही यात पूर्ण सहकार्य करूं.' प्रार्थना सभेंत त्या घटनेचा उल्लेख करीत विनोबा म्हणाले, "मी जगातल्या सर्व महापुरुषांच्या चरणचिह्नांची वाट चालत आहें असें मीं पूर्वीं च म्हटलें होतें. आज महंतानें माझें हें म्हणणें मान्य केलें ही आनंदाची गोष्ट आहे. भूदान कार्यकर्त्यांनीं हें लक्षात घ्यायला हवें कीं आपलें कार्य हें भक्ति मार्गाचें कार्य आहे. त्यानीं आपलें हृदय व जीवन त्यानुसार घडविण्याचा प्रयत्न करायला हवा. मूर्तिपूजा, एकान्तध्यान, चिंतन वगैरेंचा काळ आता राहिला नाहीं. भारतातल्या भक्तिमार्गाला आता सेवापरायण बनलें पाहिजे. न खाणाऱ्या देवाला नैवेद्य दाखवून खाणाऱ्या देवाला उपाशी ठेवणें ही काहीं भक्ति नाहीं. पूर्वीं मंदिर हें भक्तीचें किंवा सार्वजनिक स्थळ होतें. आपल्या लोकांशी एकटे उठावें

म्हणून मंदिरात पहाटे चौघडा वाजायचा व देव उठण्याची वेळ जाहीर व्हायची. दुपारीं देवाला भोग देण्याचा कार्यक्रम व्हायचा. रात्रीं आरति होऊन देव झोंपीं जायचे. हे सारें नाटक म्हणजे लोकांना शिक्षण देण्याचा एक प्रकार होता. नाहीं तर देव का कुठे खातो, झोंपतो नी उठतो? आपल्याजवळ जमीन, संपत्ति, बुद्धि, जे काहीं आहे तें देवाला, समाजाला अर्पण करून मग प्रसादसेवन करण्याचा आपल्याला अधिकार आहे. देवाला 'दीनबंधु' म्हणत असत. पण नुसतें दीनाचें पालन करायचें नसून *त्याची दीनता च मिटवायची हे भूदानयज्ञाचें कार्य आहे.*"

## सुखद वनवास

तप्तपाणी
१३ मे १९५५

हरितवस्त्र परिधान केलेली धरणी ग्रीष्माचें गर्वहरण करीत होती. ऐन वैशाखात हिरण्यागार वनराजीनें वेढिलेले पर्वत नी पानापानांतून लसलसणाऱ्या हिरव्या रंगाच्या विविध छटांचें नर्तन पाहून क्षणभर प्रश्न पडायचा कीं हा ऋतु कोणता? कोकिळेची कु ऽ ऽ ऽ हाक ऐकून तिच्याशीं कुजबुज करावी तों च कुठून तरी एका पाखराचा 'पियू कहाँ' हा हृदय पिळवटून काढलेला करुण स्वर कानीं पडायचा. 'कधीं तरी कुठें तरी भेटेल तुला' असें काहींसें त्याला सांगावें. तिकडे उंच झाडाच्या शेंड्यावर एखादा तपस्व्याप्रमाणें रमलेला पक्षी 'टाकोरजी'चा जप करीत असलेला पाहून त्याचें कौतुक करावें. तेवढ्यात रसाळ भृंगराजानें शीळ घातली च म्हणून समजा! मग सारिका कुठली स्वस्थ बसायला! एखाद्या संगीतसम्राज्ञीच्या ऐटींत हळू च नाजूक गोड लकेर घेऊन टाकायची ती. उगवत्या सूर्याच्या किरणांत श्वेत-तेजानें चकाकणारे पांढरे ढग पर्वतशिखरांशीं शिवाशिवीचा खेळ खेळत असलेले पाहून दुरून भास व्हावयाचा कीं हिमाच्छादित शिखरांचें च दर्शन घडत आहे. तिकडे बाबांचा काव्यशास्त्रविनोद चालू असायचा च हरित-

सौंदर्य पाहून डोळे विसावले, पाखरांच्या संगीताने कान सुखावले, बाबांच्या मुखातून प्रकटणा या ज्ञानधारांनीं मन व बुद्धीला प्रफुल्लित केलें. सतत चढणीच्या रस्त्यावरून पुढें पुढें जाणाऱ्या पायांना आरोहणाचा आनंद मिळाला. अन् बाहेरचे लोक म्हणतात, 'जगलांतली वाट, केवढे कष्ट!'

ओरिसाचे मुख्य मंत्री श्री. नवकृष्ण चोधरी यांच्याशीं राज्यशास्त्रावर चर्चा चालली होती. भुवनेश्वर (ओरिसाची राजधानी) ला राहून मुख्य मंत्रीपदाची जबाबदारी सांभाळीत असतांना देखील नबबाबूंचें मन विनोबांच्या मागोमाग पदयात्रा करीत असतें. भूदानकार्याकरतां मुख्य-मंत्रीपदाचा राजीनामा देण्याची इच्छा त्यांनीं गेल्या दोन वर्षांत अनेकदा प्रकट केली आहे. पण त्यांची त्या कारागृहांतून लवकर सुटका करण्यास त्यांचे सर्व सहकारी व अनुयायी मुळीं च तयार नाहींत. त्यामुळें अधूनमधून ते वेळ काढून विनोबांच्याकडे येतात व पदयात्रेचा व ज्ञानश्रवणाचा आनंद लुटतात. कधीं ते शेतकऱ्याच्या झोंपडींत शिरून गप्पा करीत भूदानाचें तत्त्वज्ञान समजावून सांगतांना दिसतील, कधीं हातीं झाडणी घेऊन झाडतांना दिसतील तर कधीं कार्यकर्त्यांशीं थट्टाविनोद करतांना दिसतील. त्यांची ज्येष्ठ कन्या उत्तरा (कैलासवासी महादेवभाई देसाई यांची सून) हिचीं छोटीं मुलें संघमित्रा व नचिकेता यांना तर आपले आजोबा म्हणजे एक सवंगडी च वाटतात. ते यात्रेंत आले कीं उत्तरेप्रमाणें च आम्हा सर्वांना हि आपले 'बापी' (वडील) आल्याचा आनंद होतो.

बाबा (विनोबा) बापींना सांगत होते कीं, "आजवर ज्ञानी लोकांनीं हातीं राजदंड घेऊन राज्य चालविण्याचे अनेक प्रयोग करून पाहिले आहेत. विजयानगरचा मुख्य मंत्री विद्यारण्य हा एक थोर वेदान्ती होता. परंतु या युगांत असे प्रयोग होऊं शकणार नाहींत. प्रतिहिंसेचा आधार घेतल्या-मुळें दंड आपल्या आत्महत्येची तयारी करीत आहे. तेव्हां आतां ज्ञानी लोकांनीं शासनमुक्तीचे प्रयोग करायला हवेत.

मागें एकदां 'राजसत्ता व क्रान्ति' या विषयावर प्रकट चिंतन करतांना बाबा म्हणाले होते कीं, "भूदानाच्या कामाला गति कशी प्राप्त होईल याविषयीं जेव्हां मी विचार करूं लागतों तेव्हां मला अखंड हिंडून विचार-प्रचार करणाऱ्या परिव्राजक वर्गाची आवश्यकता विशेष च जाणवते. आज-

काल राजसत्तेद्वारें क्रांति करण्याच्या गोष्टी ऐकूं येतात. पण राजसत्तेद्वारें क्रांति होऊ शकत असती तर हातीं असलेली राजसत्ता सोडून भगवान् बुद्ध जंगलात कशाला गेले असते ? पुष्कळांना वाटतें कीं अशोकाच्या मुळे बौद्ध धर्माचा खूप प्रसार झाला. परंतु हा एक निव्वळ भ्रम आहे. बौद्ध राजानीं आपल्या धर्माचा प्रसार करण्याचा प्रयत्न केला तर हिंदु राजानीं हिंदु धर्माला उत्तेजन दिलें. आणि राजाराजात लढाया सुरु झाल्या व अखेरीस बौद्ध धर्म हिंदुस्थानातून नाहीसा झाला. तेव्हा राजसत्तेचा प्रवेश होता च धर्मप्रसार होण्याऐवजीं धर्माचा न्हास च होतो. राजसत्तेद्वारें लोकांची थोडीफार सेवा होऊ शकते पण लोकांच्या उत्थानाचें कार्य राजसत्तेद्वारें होऊ शकत नाहीं. म्हणून च मला वाटतें कीं, सतत भ्रमण करीत ज्ञान-प्रचार करणारे परिव्राजक निघतील तर सार्‍या देशात एक असें वातावरण निर्माण होईल कीं सारें भूमिदानकार्य एका दिवसात आटोपून जाईल. सूर्योदय झाला म्हणजे पाच लाख खेड्यात नी प्रत्येक घरात एकदम च प्रकाश पसरतो त्या च प्रमाणें एक तारीख ठरवली जाईल नी त्या दिवशीं भारतातल्या सर्व खेड्यात जमिनीचें वाटप होईल. तो दिवस आणण्याकरता किती हि काळ लागू द्या पण अखेरीस काम होणार तें एका च दिवसात होणार !"

घनदाट अरण्यात हिरव्यागार वृक्षलतांच्या सान्निध्यात एका उच्च टेकडी-वरच्या डाक बंगल्यात आजचा निवास होता. नेमकीं सौंदर्यस्थळें शोधून काढून त्या ठिकाणीं डाक बंगले बांधल्याबद्दल अशा वेळीं ब्रिटिशांचे आभार मानल्यावाचून राहवत नाहीं. चोहींकडे पर्वतांच्या रांगा, खोल दरींतून वाहणार्‍या नदीचें दुपारच्या उन्हात चकाकणारें स्वच्छ निर्मल पाणी आणि वातावरणातली हिरवीगार प्रशान्तता ! विनोबांचें वनवासी मन अशा वनात विसावतें. निबिड अरण्यातील पाऊलवाटेवर त्याना प्रभु रामचंद्रांचीं पदचिन्हें आढळतात, निर्जन एकान्त ठिकाणीं वाहणार्‍या झर्‍यात त्याना एकान्तप्रिय ऋषींचें दर्शन होतें. सारी शांत सृष्टि त्यांच्या शांति शोधनात साथ देत असते. आजच्या भाषणात ते येथील लोकाना म्हणाले, "तुम्ही डोंगराच्या, झर्‍याच्या, नद्यांच्या संगतींत राहता, पाखरांची गोड गाणीं ऐकता, तुमच्या

भाग्याचा हेवा वाटतो मला. माझ्या हातीं जर भूदानाचें काम नसतें तर या ठिकाणीं माझी समाधी च लागली असती ! ”

शेजारीं उंच झाडाच्या शीतल छायेत एक गरम पाण्याचें कुंड होतें. त्यावरून च या गावाचें नाव ‘ तप्तपाणी ’ पडलें होतें. हा सारा उंचीवरचा भाग असल्यामुळें उन्हाळा मुळीं भासत च नव्हता. ऐन मे महिन्यात त्यामुळें दुपारच्या वेळीं देखील कुंडात स्नान करण्याची हौस भागवता आली. कुंडाजवळ च सोनचाफ्याच्या झाडाखालीं शिवलिंग होतें. त्यावर टपोऱ्या सोनचाफ्याचा सडा पडलेला होता.



## ‘ सत्पात्रीं दान ’

लोहागुडी व सिरुंडीपदर
१७, १८ मे १९५५

सध्या आम्हीं वाघोबाच्या राज्यात प्रवेश केला आहे. त्याचा योग्य तो मान राखायचा म्हणून आम्हीं आताशा पहाटे चारला न निघता थोडे उजाडल्यावर ५॥ च्या सुमारास चालायला सुरवात करतों. वाघानें माणसाला खाणें म्हणजे येथील लोकांच्या जीवनातील नित्याची च घटना. या भागात सौरा जातीचे आदिवासी बरे च आहेत. या लोकात एक अशी पद्धत आहे की एखाद्याच्या बायकोला जर वाघानें खाल्लें तर तो जिच्या नवऱ्याला वाघानें खाल्लें आहे अशा च स्त्रीशीं पुनर्विवाह करू शकतो. हा च न्याय स्त्रियांच्या पुनर्विवाहाला हि लागू आहे. आमच्या एका आदिवासी भूदान-कार्यकर्त्याला वाघोबानीं भटकावलें आहे. आजकाल रोज नृत्य गायनानें स्वागत होतें. आदिवासींचें जीवन नृत्य संगीतमय आहे. त्यांच्याजवळ वाद्यें हि तऱ्हेत ऱ्हेचीं असतात. झाडूचें देखील वाद्य बनतें जरा दोन चार लोक एकत्र झाले कीं ताल देणें सुरु होतें. मात्र त्यांचें संगीत अविकसित वाटतें. ठराविक चार सहा रागाच्या पलीकडे गेलेलें नाहीं. काहीं काहीं जातींतील लोकांचे वेष व दागिने मोठे मजेदार असतात. हे लोक नाकाकानांना पाडता

येतील तितकीं भोंकें पाडून त्यात फूल घालतात. गळ्यात मण्यांच्या व कवड्यांच्या माळा, कधीं डोक्याला मोराच्या पिसाचे मुगुट. कपडे जवळ जवळ घालत च नाहींत. पुरुष लंगोटी घालतात. मात्र ती लंगोटी कलाकुसरीनें विणलेली असते व कित्येकदा एका लंगोटीला वीस रुपये देखील पडतात. स्त्रिया कमरेखालीं पचासारखे वस्त्र गुंडाळतात. मालतीदेवींनीं आम्हाला मागें च सांगितलें होतें कीं तुमच्या शहरी मनाला गंजामच्या आदिवासी भागात चांगले च धक्के बसणार आहेत.

सिकुडीपदरला सभा संपल्यावर विनोबानीं गावच्या सार्वजनिक बगीच्याचें उद्घाटन केलें. जवळच्या दाट जंगलानें वेढलेल्या डोंगरावर सर्वप्रकाश पसरला होता. कोणीं तरी सांगितलें कीं या जंगलात रानहत्तींचे कळप राहतात. आम्हीं मनात म्हटलें कीं दूरचे पाहुणे आल्याची खबर त्याना मिळाली नसेल. नाहीं तर ते भेटायला आल्यावाचून राहिले नसते! तिथून परतताना वाटेंत एक ल्हानसें शेत लागलें. त्यात खूप लहान मोठे दगड पडले होते. 'चला रे आपण शेत साफ करू या' असें म्हणून विनोबानीं दगड उचलायला सुरवात केली. गावकरी मंडळी हि उत्साहानें कामाला लागली. आम्हीं १२५ माणसानीं वीस मिनिटें काम केलें व पाहता पाहता सारें शेत साफ झालें व चारी बाजूना दगडाची पाळ तयार झाली. मागून कळलें कीं तें शेत एका गरीब विधवेचें होतें. तिला ल्हान मुलें होतीं व मदत करणारें असें कुणी च नव्हते. पण 'निराधाराचा आधार' अशीं च कुणाकरवीं कामें करवून घेत असतो! विनोबा म्हणाले, "तशीं सगळीं च दानें पात्राला दिलीं जातात. पण हें अगदीं सत्पात्रीं दान होतें!"



# अहिंसेचा अणुबाँब

रानीसमा
१९ मे १९५५

या जगलात ठिकठिकाणीं उधयाचीं वारुळें दिसतात. त्यांतील काहीं तर आठ दहा फूट उंचीचा असतात. त्या वारुळाची सुंदर रचना पाहून विनोबा त्यांना ' भुवनेश्वर ' म्हणतात. आज वाटेंत फुललेल्या कमळाप्रमाणें चौदा पाकळ्यांचें एक ' भुवनेश्वर ' पाहून ते म्हणाले, " लोक भुवनेश्वर, अजिंठा, वेरुळ इत्यादि ठिकाणें पहायला जातात पण मला तर या उधयाच्या ' भुवनेश्वरा 'त अजिंठ्याहून कमी कला दिसत नाहीं. उधया म्हणजे किती क्षुद्र जंतु अन् त्या केवढें विशाल घर उभारतात. त्यांचे तर अधिक कौतुक करायला हवें हें एक ' भुवनेश्वर ' बांधायला केवढी सामूहिक श्रमशक्ति लागली असेल जरा विचार तर करा !" भुवनेश्वराचें तें भव्य मंदिर, त्याच्या दगडादगडांतून मिळणारें जीवनाच्या विविध छटांचें दर्शन, आंतील गाभाऱ्यातलें विशाल शिवलिंग, त्यावरचा फुलांचा सडा, त्यावर थेंब थेंब होणारा अखंड अभिषेक ! विनोबांच्या नवीन नामकरणामुळें या रानांत जागोजागीं ती स्मृति साकारलेली आढळू लागली.

ग्रामदानात मिळालेल्या शेजारच्या अंकिली गावात आजची प्रार्थना सभा होती. गावच्या जमिनीचें नाऱ्याच्या हस्तें पुनर्वितरण होणार होतें. अंकिलीकडे नेणारी नयनरम्य पाऊलवाट, चहूकडे हिरवळीचे गालीचे व हिरव्या'शाली पांघरलेले गुमगुमीत पहाड. गावकरी रामधुन गात होते. हृदयें जोडणारा अतरतर राम नाम जगातील सारीं कृत्रिम अंतरें नाहींशीं करतो आणि मग माणूस स्वामित्वविसर्जनासारखी क्रांतिकारी कृति सहज करून जातो ! नाजुक पिंपळ्या आमलताशाच्या लोलकांनीं व आम्रपर्णांनीं सारं अंकिली गाव सजविलें होतें. घराघरासमोर सडा घालून रांगोळी काढलेली. त्यावर मंगल कलश व दीप. जणू मांगल्य साकारलें होतें. गावची सर्व मंडळी ओळींनें व्यवस्थित बसली होती.

प्रार्थना आटोपली आणि गावच्या नाइकान छंदात न मामावणारी

भावना शब्दात व्यक्त करण्याचा प्रयत्न केला — "गांधीजींचे शिष्य विनोबाजी गरीबांचे दु:ख दूर करण्याकरता हिंडत आहेत. त्यांचा संदेश ऐकून आम्ही 'सर्वस्वदान' देण्याचें ठरवलें." नंतर विनोबांच्या हस्ते जमिनीच्या पुनर्वितरणाची प्रमाणपत्रे वाटण्याचा कार्यक्रम सुरू झाला. ग्रामदान मिळालेल्या गावचें पुनर्वितरण विनोबांच्या हस्तें होण्याचा हा पहिला च प्रसंग होता. भारतातल्या पहिल्या ग्रामदानाच्या गावीं— उत्तर-प्रदेशातील मगरोठ— विनोबा कधीं गेले च नव्हते. ओरिसातल्या पहिल्या ग्रामदानाच्या गावीं ते जाण्यापूर्वी च वितरण झालें होतें. 'अंत्रिली'मध्ये एकूण कुटुंबं ३१ व जमीन १४३ एकर. गावच्या प्रत्येक जमीनवाल्यानें आपल्या सर्व जमिनीचें दान देऊन टाकल्यामुळें आता त्या गावात जमिनीचा मालक कोणी हि राहिला नव्हता. सारी जमीन देवाची झाली होती. देवाचा प्रसाद म्हणून गावच्या सर्व लोकांची झाली होती. सर्वांनीं मिळून माणशीं एक एकराप्रमाणें प्रत्येक कुटुंबातील माणसांच्या संख्येनुसार जमीन वाटण्याचें ठरवलें होतें. ज्या कुटुंबात पाच माणसें त्याला पाच एकर व ज्यात आठ माणसें त्याला आठ एकर, अशा हिशोबानें सर्वांना जमीन देऊन उरलेली बचाळीस एकर सामूहिक शेतीकरता ठेवली होती. सर्वांना भूमातेची सेवा करण्याचीं, मालकीहक्काचीं नव्हे तर सेवकत्वाचीं, प्रमाणपत्रें मिळत होतीं. प्रत्येक कुटुंबातील एकेक माणूस पुढें येई, एक भगिनी त्याला फुलें देई, दुसरी गंध लावी, नी मग विनोबांच्या हातून एक कागद घेऊन नमस्कार करीत तो परत जाई

हा समारंभ संपल्यावर दाटलेल्या गळ्यानें विनोबा बोलूं लागले, "हें काम तुम्हीं केलें नाहीं कीं मीं करविलें नाहीं हें ईश्वरानें केलें व ईश्वरानें च करविलें. आपल्या देशाचे एक थोर नेते — राजाजी — एकदा म्हणाले होते कीं, 'भूदान यज्ञाचें कार्य ईश्वरनिष्ठा वाढविणारें कार्य आहे.' पण आज तर मला या गावात साक्षात् ईश्वराचें दर्शन च घडत आहे

"या गावात जें कार्य घडलें त्यायोगें साऱ्या जगात शांतता प्रस्थापित होऊ शकते असें मला वाटतें पाश्चात्य विद्या शिकलेल्या आंधळ्या लोकांना अणु शक्तीचें महत्त्व कळतें पण ग्रामदानात अणुशक्तीहून हि अधिक शक्ति

आहे हें त्यांना उमगत नाहीं माझें तर असें मत आहे कीं हैड्रोजन बॉम्बच्या द्वारें हिंसेच्या क्षेत्रात जो पराक्रम घडला तसा च पराक्रम ग्रामदाना-द्वारें अहिंसेच्या क्षेत्रात घडला. वैज्ञानिक म्हणतात कीं अणु-विस्फोट होतो तेव्हा साऱ्या जगाची हवा अशुद्ध होऊन जाते. मी म्हणतों कीं ग्रामदान होतें तेव्हा साऱ्या जगाची हवा शुद्ध होते."

सभा संपल्यावर श्रमदानाचा कार्यक्रम झाला. कोणी कुदळीनें माती खणीत होते तर कोणी माती टोपल्यात भरून डोक्यावर वाहून नेत होते. हातीं कुदळ घेतलेल्या विनोबाकडे पाहून मनात विचार आला कीं हातीं श्रमाचें साधन नी मुखात उपनिषद्. हा च तर नव्या जगाचा आदर्श आहे ! काम संपल्यावर सर्वांनीं जयघोष केला 'आनंदे अेक बार, हरि बोल ऽऽऽ' — संधिप्रकाशात हिरवळीच्या नेत्रात स्वागत स्मित तरळत असलेलें दिसलें. विनोबानीं हसत म्हटलें, "आजच्या ग्रामदानामुळें वाता-वरणात सर्वत्र रेडिओ ॲक्टिव्ह तरंग पसरले आहेत. बघा आतां त्याचा काय परिणाम होतो तें!" त्याच्या विनोदात लपलेल्या सत्याचें भान व्हायला वेळ लागला नाहीं. आज सकाळीं जेव्हा आम्हीं रानीसमात प्रवेश केला तेव्हा तेथील लोक भूदान द्यायला सुद्धा तयार नव्हते. पण संध्याकाळीं आम्ही सभेहून परतलों तेव्हा कळलें कीं गावकऱ्यानीं ग्रामदान द्यायचें ठरवलें आहे. वातावरणात रेडिओ ॲक्टिव्ह तरंग पसरू लागले !

## जीवन-संगीत

वाघमारी, लुशारसिंगी
२०, २१ मे १९५५

काल रात्रीं पाऊस पडून गेला होता. नुकती च न्हालेली सृष्टि अधिक च प्रसन्न भासत होती. जंगलांतली मुद्दाम तयार केलेली पायवाट होती. झाडांचीं पानें दवबिंदूंच्या स्वप्नाळू डोळ्यांनीं जगाकडे बघत होतीं व उषेच्या आरक्त रश्मि-जालाचें प्रतिबिंब डोळ्यांत साठवीत होतीं तिकडे आकाशाच्या मानस-सरोवरांत मेघांचे राजहंस डौलानें विहार करीत होते. बाबा रोज म्हणतात कीं, "गेल्या चार वर्षांच्या यात्रेंत मे महिन्यांत एवढी रमणीय यात्रा कांहीं कधीं झाली नव्हती !" गेल्या चार वर्षांत उन्हाळ्यांत ५१ मध्यें तेलंगणा, ५२ मध्यें बुंदेलखंड, ५३ आणि ५४ मध्यें बिहारचे गया व पलामू व शाहाबाद जिल्हे—सारा अगदीं अग्निज्वालाविहार झाला. जणू सारें जग पेटलें होतें. आणि यदाचा शांतशीतल सुखकर उन्हाळा. चहूंकडची हिरवळ फार बोलकी होती. जणू अशांतिरूपी अग्नीचें शमन झाल्याची च सूचना देत होती ती !

वाटेंत एक 'कुसुमपुर' नावाचें फुलासारखें लहानसें गाव लागलें. ग्रामवासी स्वागतार्थ उभे होते. बाबा म्हणाले, "शेजारच्या अंगिली गावच्या लोकांनीं ग्रामदान दिलें. तुम्ही पण त्यावर विचार करा. भूमि आपली माता आहे, आपण सारे मानव तिचे पुत्र तिचा मालक ईश्वर. आपण स्वत:ला भूमीचा मालक म्हणवून घेणें म्हणजे ईश्वराची जागा घेणें होय. त्यासारखें दुसरें पाप नाहीं" विचार पटला, आचारांत परिणत झाला. दुपारीं वातमी मिळाली कीं कुसुमपुरच्या लोकांनीं ग्रामदान देण्याचा निर्णय घेतला. वाटेंत लागलेल्या आणखी एका गावांत विनोबांनीं ती च गोष्ट समजावून सांगितली. गावकरी म्हणाले, "विचार करून निर्णय घेऊं." रेडिओ ॲक्टिव्ह तरंग पसरत होते. पूर्वीच्या साऱ्या घोषणा एकदम जुन्या वाटूं लागल्या. आतां वृद्ध, तरुण, मुलें साऱ्यांच्या मुखीं एक च मंत्र—'आम गौंरे भूमि-मालिक, रहिबे नाहीं, रहिबे नाहीं।'

हा सारा एजन्सी विभाग म्हणजे मालतीदेवींचे ( नवबाबू यांच्या पत्नी ) कार्यक्षेत्र आहे. आदिवासी विभागाची सेवा करण्याकरता त्यांनी स्थापन केलेल्या 'नवजीवन मंडळा'च्या वतीनें या भागात ठिकठिकाणीं केन्द्रें उघडलीं आहेत. घरदार सोडून या दूरवरच्या जंगलातील केन्द्रात सेवाकार्य करणाऱ्या निर्भय भगिनींचे बाबाना फार कौतुक वाटते. स्वराज्यापूर्वी येथील लोकांची अवस्था फार च दयनीय होती. व्यापारी, सरकारी अधिकारी व मधले इतर दलाल हे सर्व मिळून त्या लोकांची पद्धतशीर लूट करीत असत. अशा स्थितीत जनतेला आपल्या न्याय्य हक्काविषयीं जागृत करून व त्याद्वारें सरकारवर वजन पाडून या लोकांवरचे बरेच अन्याय दूर करण्याचें सारें श्रेय मालतीदेवींना आहे. 'मुठादारी पद्धति' व 'बेगार' या नावानीं होणारा अन्याय त्यांनीं कायद्यानें बंद करवून घेतला. बाबा त्यांच्याविषयीं नेहमी म्हणतात कीं, ती फार पराक्रमी स्त्री आहे. त्यांचे पति प्रांताचे मुख्य मंत्री-नी त्या जननेत्या. त्यामुळे बाबा त्यांची अशी थट्टा करतात कीं 'आपके तो दोनों हाथों में लड्डू हैं। जनता भी आपके साथ है और सरकार भी आपके हाथ।' ( तुमची तर दोन्हीकडून चैन आहे, जनता तुमच्या मागे आहे नी सरकार तुमच्या 'मुठीत' आहे. )

मालतीदेवी म्हणजे रवीन्द्रनाथ टागोरांची लाडकी शिष्या 'मिनू'. त्यांनीं नवीन गीत रचलें कीं आधीं मिनूला शिकवायचे. शांतिनिकेतनात मिनूचें विजेसारखें तरल नी चमकणारें व्यक्तित्व साऱ्यांचे डोळे दिपवायचें. बंगाल च्या एका गर्भश्रीमंत व पाश्चात्य संस्कृतीत रंगलेल्या सुधारक घराण्यात तिचा जन्म झाला होता. दुःख व दारिद्र्य यांचीं वर्णनें तिनें फक्त पुस्तकातच वाचलीं होतीं. पण तिनें रवीन्द्रगीतें नुसतीं गाईलीं च नाहींत तर तीं त्यानुसार 'जीवन जगत आहे! स्वातंत्र्याच्या लढ्यात ती नेहमीं अग्रभागीं असायची, मात्र स्वातंत्र्यानंतर सत्तेच्या राजकारणात तिचं क्रान्तिकारी मन कधीं रमू शकलें नाहीं. त्यामुळें राजकारणातील सर्व पदांचा त्याग करून तिनें सेवेचें क्षेत्र निवडलें. आज हि सत्तेच्या उच्च पदावर असलेल्या पतीच्या घराची गृहिणी बनून बड्या बड्या पाहुण्यांचा आदरसत्कार करण्याचें सीमित जीवन सोडून ती दुःखी जनतेचे अश्रू पुशीत, त्यांचीं गाऱ्हाणीं सरकारसमोर मांडीत.

विधायक कार्य करणाऱ्या संस्थांचें संचालन करीत साऱ्या प्रांतभर संचार करीत असते. ' शुभ कर्मपथावर निर्भयगान ' गात संगीतमय जीवन जगणारी आपली लाडकी मिनू पाहून आज वर्नीद्राच्या आत्म्याला कोण समाधान होत असेल !



## अरण्य आणि आरण्यक

लुवरसिंगी
२१ मे १९५५

डोंगराच्या कुशींत, झाडाच्या गार छायेत वनवासी लोकांना विनोबाजी ऋषिजीवनाचा धडा शिकवीत होते. " ऋषि श्रम करून, घाम गाळून उदरात आहुति अर्पण करतात. ते स्वतःला प्रकृति मातेचीं लेकरें समजतात व सदैव सत्याच्या मार्गावर चालतात. ते कधीं च स्वतःला मालक समजत नाहींत. मालक परमेश्वर आहे आणि आम्हाला सर्वांची सेवा करायची आहे व श्रमादून जें कांहीं निर्माण होईल त्याचा एक भाग आधीं दुसऱ्याना देऊन मग ' यज्ञशेष ' खायचें आहे, असं च ते समजतात. आज तुमचें जीवन बरेंचसें ऋषि जीवनासारखें आहे. पण तें अज्ञानवश आहे. शहरी लोकांच्या संगतींत येता च तुमचें जीवन बदलतें. तुम्ही ज्ञानपूर्वक ऋषि जीवन जगावें अशी माझी इच्छा आहे."

मात्र या प्रकृति-मातेच्या अंकावर खेळणाऱ्या बाळाच्या जीवनात दारूच्या रूपानें एक मोठा च दुर्गुण शिरला आहे. विनोबा दर प्रवचनात त्याबद्दल सांगतात कीं, दारू सोडल्यावाचून तुमची कधीं हि उन्नति होणार नाहीं त्यावर ते लोक म्हणतात कीं, पण देवाला दारूचा नेवेद्य दाखवावा लागतो ना ! लुवरसिंगीच्या प्रवचनात याचा उल्लेख करून विनोबा म्हणाले, " मीं वेदांचें, शास्त्रांचें चांगलें अध्ययन केलें आहे. त्याच्या आधारावर मी तुम्हाला सांगतो कीं देवाला दारू नको असते. ' पत्रम् पुष्पम् फलम् तोयम् '

इतें असतें." मग ते सभेतल्या सर्व लोकांना म्हणाले कीं, म्हणा सारे माझ्यामागून 'पुष्पम् पुष्पम्—' लोकांना खूप मजा वाटली. म्हातारे, तरुण, मुलें, स्त्रिया सारे उत्साहानें म्हणू लागले. संस्कृत शास्त्रवचन उच्चारण्याचा हा त्यांच्या जीवनातील पहिला च प्रसंग असेल!—ह्या लोकांत असलेल्या श्रद्धेच्या आधारावर त मद्य दारू गाडू शकतील अशा विश्वास वाटतो.

सध्याकाळीं झापडीच्या शेजारीं डोंगराच्या पायथ्याच्या हिरवळीवर आम्ही बसलों होतों सूर्यास्त-रूप इतकें आश्चर्य भासत होत कीं बाबासकट सर्वांची दृष्टि क्षितीतरा वळ त्यावर खिळून राहिली होती सधिप्रकाशात खुलून दिसणारे निळे डोंगर, गजराजाच्या ऐटींत विहार करणारे आकाशातील काळ्या पाढऱ्या ढगाच पुजक, पश्चिम क्षितिजाचें आरक्त वैभव — बाबा म्हणाले, "किती गभीर दृश्य आहे! जणू एखादा कवीन्द्र ध्यानस्थ बसला आहे!" हळूहळू काळोख पसरू लागला आकाशातील गभीरता वाढू लागली. पावरे घरच्यात दिवावर्नी नारत शांति मागें जगन्नाथपुरीला साहित्यिकांच्या सभेंत बाबा म्हणाले होत कीं, "जो रसास्वादन करताना इतरांना त्यात सहभागी करून घेतो तो च खरा रसिक मी तुम्हा साहित्यिकाना एवढ्या च करता आमत्रण देत आहें कीं जो रस मी चाखतों आहें त्यात तुम्हीं देखील सहभागी व्हावें असें मला वाटतें."

माणसाला आनंदाचा आस्वाद एकट्यानें च घेणें आवडत नाहीं. इथल्या सृष्टिसौंदर्याचा सहवास मला एकटीला च घडतो आणि कुसुमला मात्र तिकडे शहराच्या गजबजलेल्या वातावरणात मोटारींचें कर्णकटु भोंगे व कर्कश सिने सगीत ऐकत रहावें लागतें याची मला सारखी रुत वाटते. ब्रह्मपूरला मॅलिग्नट मलेरियानें आजारी पडल्यामुळें तिला विश्रांतीकरता घरीं जावें लागलें, आणि या अरण्यानेंतील प्रशान्त सौंदर्याच्या साक्षात्काराला मुकावें लागलें ब्रह्मपूरपूर्वी बाबा रोज आमचा उपनिषद् वर्ग घेत तो सध्या बद च पडला आहे वर्ग कधीं सुरू करायचा म्हणून मी परवा त्यांना विचारता च ते हसत म्हणाले, "कुसुमला येऊ द तिचें अर्धे च राहील ना मग" आज हि ते मला म्हणत होते कीं, "कुसुमला लिही कीं तू येईपर्यंत

बाबा उपनिषद् वर्ग सुरू करणार नाहींत तुम्ही वाट पहात थांबले आहेत ''
मीं मनात म्हटले, '' हा छान न्याय आहे ! आजारी पडायचें तिनं ना
उपनिषद् वर्ग बंद व्हायचा आमचा ! ''

या अरण्ययात्रेंत बाबांचा जितका सहवास मिळतो तितका गेल्या तीन वर्षांत कधीं लाभला नसेल अरण्य आणि आरण्यकांची एकत्र संगति हा एक अपूर्व योगायोग वाटतो ! आजकाल आमचें जेवण सूर्यास्तापूर्वीं च आटोपतें त्यानंतर अंधार पडण्याच्या सुमारास आम्ही सारे बाबांभोंवतीं गोळा होतों श्री राधाकृष्ण बजाज यांचा मुलगा गौतम सध्या यात्रेंत आहे बहुधा 'काय म्हणतोय गौतम' असें म्हणत बाबा बोलायला सुरवात करतात. मग कधीं उपनिषदातील गोष्टी सांगतील तर कधीं आकाशातील ताऱ्यांची माहिती सांगतील गेल्या सहा महिन्यांपासून आमच्या मध्य प्रदेशातील भंडाऱ्याचा बाळ टेंभेकर यात्रेंत आहे प्रत्येक परीक्षेंत प्रावीण्य मिळवीत मिळवीत त्यानें एम्.एस्‌सी परीक्षा आटोपली मग इतर डिप्लोमा मिळवून दोन वर्षेंपर्यन्त लोकांच्या भाषेंत 'चांगला पैसा' मिळवला. जगाच्या दृष्टीनें जें मिळवायचें त सारें तो मिळवून चुकला पण त्याच्या भारतीय मनाला तेवढ्यानें समाधान कुठलें होणार ? त्यामुळें इतरांना हुकूम सोडणारा हा 'बाबू', तें जीवन सोडून इथें आला नी आज बाबांचे कपडे धुणं, कमांड साफ करणें, बिछाना घालणें इत्यादि सेवाकार्य करीत ज्ञानप्राप्ति करीत आहे आपल्याकडे कुणाचं लक्ष जाऊ नये याचा तो नेहमीं प्रयत्न करतो पण तरी हि कुणाचें एखदा लक्ष गेलें कीं खिळून च राहतं आज बाबांनीं बाळच्या एका प्रश्नाच्या उत्तरात प्रजापतीच्या दोन शिष्यांची कहाणी सांगून म्हटलें कीं, '' पैसा प्रतिष्ठा इत्यादींनीं भारतीय मनाचें कधीं हि समाधान होत नाहीं. आध्यात्मिक जिज्ञासा हें भारताचें सर्वांत मोठें वैभव आहे. लोकांना भूदान एवढ्या च करता आवडतें कीं त्यात त्यागाचा संदेश आहे ''

'आठ वाजले बाबा,' बाळनें नित्याप्रमाणें सूचना दिली 'चला, आता झोंपायचें,' असें म्हणत बाबा उठले नी मग हसत म्हणाले, '' लहान मुलें सोडलीं तर माझ्याइतका लवकर झोपणारा माणूस हिंदुस्थानात दुसरा

नसेल ! रात्री जागणें त्याना अजिबात आवडत नाहीं. ते म्हणतात कीं, " ज्याप्रमाणें सध्याकाळ होता च सूर्य आपलीं सारीं किरणें खेचून घेतो त्या च प्रमाणें सूर्यास्त होता च आपण आपल्या साऱ्या भावना, कल्पना नी विचार खेचून घ्यावे नी मन आत्म्यात स्थिर करावें. ज्याच्या हातीं ही किल्ली लागेल तो सदैव निरोगी राहील."



## जंगलांतलीं पांखरें

छेलिगुद्दी, मुदरवा, धुमन
२३, २४, २५ मे १९५५

इथें खिस्ती लोक परेच आढळतात. खिस्ती मिशनरी या भागात जगलात अगदीं दूर दूर जाउन सेवा करतात. इथें जगलात माणसें राहतात हें च मुळीं आम्हा सुशिक्षिताना माहीत नसतें मग ते खातात काय, त्याच्या शिक्षणाची, औषधपाण्याची वगैरे व्यवस्था कशी आहे, याचा विचार करणें तर दूर च राहिलें. तिकडे आम्ही लिप्याविषयीं जोरजोरात वाद घालतों, कुणी नागरीची बाजू घेतो तर कुणी दुसर लिप्याची, पण या लोकाजवळ मनातले भाव व्यक्त करायला लिपि तरी आहे का हा प्रश्न कधीं आमच्यासमोर येत हि नाहीं. सारा च धर्म भाषेतील पुस्तकें रोमन लिपींत छापली गेलीं आहत. सुसस्कृत जगातून आलेलें च त्याच्या भाषेत लिहिलें गेलेलें पहिलें पुस्तक ' बायबल ' आहे हें आम्हाला माहीत देखील नसतें. शहरातल्या व्यासपीठावरून दूरध्वनिक्षेपकावरून भारतीय सस्कृतीच्या महानतेवर भाषणें देणाऱ्याना जाणीव हि नसते कीं या जगलात राहणाऱ्या भारतीयाना बायबलनें आधार दिला आहे, सातासमुद्रापलीकडून आलेले गोरे खिस्ती लोक त्याच्या आजारी मुलाना औषध देऊन बरे करतात.

छेलिगुद्दीच्या सभेंत खिस्ती बधु भगिनींनीं गोड भजनें म्हटलीं. विनोबानीं प्रवचनात प्रेमधर्माचा महिमा सागितला — " भिन्न भिन्न धर्मांत किंवा पथात मी काहीं भेद च मानीत नाहीं. सारे धर्म प्रेमाचें महत्त्व मानतात. प्रेमाच्या

प्रवेश झाला कीं जीवनाचें स्वरूप च बदलून जातें. कुटुंबात प्रेम असतें म्हणून तिथें परस्पराकरता त्याग व समानता या गोष्टी आढळतात. मी तुम्हाला एवढें च सांगायला आलों आहे कीं कुटुंब-प्रेम व्यापक करा."

तुमन हें एक आदिवासींचे गाव. बहुधा या गावाची रचना एकसारखी च असते. मध्यभागीं एक रुंद रस्ता व त्याच्या दोन्ही बाजूंना स्वच्छ, सुंदर, लहानशा झोपड्यांच्या रांगा. घर म्हणजे एखाद दुसरी खोली, समोर लहानसा गोठा व मागें अंगण. छान सारवलेल्या लाल पांढऱ्या रंगाच्या रांगोळींनें सुशोभित केलेल्या भिंती व जमिनी. मात्र वाघाच्या भीतीनें घरांना खिडक्या नसतात च व रात्रीं हे लोक दार बंद करून आंत झोंपतात. त्यामुळें आंत हवा व सूर्यप्रकाश दोन्हींचा हि अभाव आढळतो. एका च खोलींत एका कोपऱ्यात चूल असते. त्याजवळ च उखळ मुसळ. दुसऱ्या कोपऱ्यात बकऱ्या व कोंबड्या बांधलेल्या. गाय बैलाकरता मधल्या रस्त्यावर किंवा मागील अंगणात एक वाघापासून रक्षण करण्याकरता खोलीवजा गोठा बांधलेला असतो. बापूंनीं तुमनच्या घराघरांत जाऊन निरीक्षण केलें. चुलीवरच्या मातीच्या भांड्यात नाचणी किंवा सल्प वृक्षाच्या सालींचें पीठ शिजायला ठेवलें होतें मातीचीं भांडीं, लाकडी पळ्या व दुध्या भोपळ्याचे चमचे व्यवस्थित मांडून ठेवलेले. वाघ अस्वलापासून बचाव करण्याकरता तीरधनुष्य व ढोलकीं वगैरे वाद्यें एका कोपऱ्यात टांगलेलीं दिसलीं. मद्यपान व धूम्रपानांत हे लोक पाश्चिमात्यांच्या मुळीं च मागें रहायचे नाहींत. तोंडात जाडसा गावठी चिरूट धरून ऐटींत हिंडणारे आदिवासी पाहून चर्चिलची च आठवण येते.

बापूंनीं एका घरात जाऊन म्हातारींबरोबर दळून पाहिलें, तर दुसऱ्या घरात आजारी मुलाची नाडी पाहून उपचाराबद्दल माहिती सांगितली. बाहेरून कुठल्या हि प्रकारची मदत नसताना हे लोक निर्भयतेनें वाघाशीं, रोगाशीं सामना करीत आनंदानें नाचत गात जीवन जगतात याची बापूंना सतत प्रशंसा करीत असतात. इथें दारिद्र्य अपार आहे पण तरी हि या लोकांच्या जीवनात मस्ती आहे, नृत्य आहे, संगीत आहे, नवविचार ग्रहण करून तो अमलात आणण्याची क्षमता देखील आहे.

तुमनच्या सभेत ग्रामदानात मिळालेल्या शेजारच्या तीन गावाच्या जमिनींचे पुनर्वितरणाचा कार्यक्रम झाला. त्या गांवात आता जमिनीची मालकी राहिली नव्हती, पण सोयीकरता म्हणून प्रत्येक कुटुंबाला माणशीं एकर या हिशोबानें जमीन वाटली गेली. कालपर्यंत ज्याच्याजवळ जास्त जमीन होती त्याच्या कुटुंबात कमी माणसें असल्यामुळें पुनर्वितरणात त्याला कमी जमीन मिळाली, तर कालपर्यंत जो भूमिहीन होता त्याच्या कुटुंबात जास्त माणसें असल्यामुळें त्याला जास्त जमीन मिळाली. आता तीं सारीं गावें म्हणजे विशाल सामूहिक कुटुंबें बनलीं. सारे भाऊ भाऊ या नात्यानें सहकार्यानें काम करणार, परस्परांस मदत करणार.



## समाजाची चक्राकार गति

उदयगिरी
२५ मे १९५८

उदयगिरीच्या डोंगरावर आमच्या पुढें पुढें जाणाऱ्या पावलाबरोबर प्राचीची आरक्तता वाढत होती. सूर्योदय झाला अन् वाटलें कीं कुणीतरी पैलतीरावरचा कुशल कलावंत आकाशाच्या पटलावर प्रश्नोपनिषदातील एक मंत्र च रेखाटीत आहे. "उदीयमान आदित्यानें पूर्वक्षितिजावर प्रवेश करता च प्राचीच्या प्राणाना आपल्या रश्मिजालात अडकवलें. नंतर उदीची, प्रतीची, दक्षिणा, इतर अन्तर्दिशा, ऊर्ध्व आणि अधराना रश्मिजालात अडकवीत साऱ्या विश्वाला आलोकित केलें."

उदयगिरींत प्रवेश केला तेव्हा सर्वत्र मांगल्याचें मधुर दर्शन घडलें. प्रत्येक घर स्वच्छ सारवलेलें, अंगणात सुबक रांगोळी, आम्याच्या कोवळ्या पानानीं झाकलेले कलश, समया, हातीं मंगलारति घेऊन उभ्या असलेल्या प्रसन्न गृहिणी व आमच्या वाटेवर फुलांचा सडा टाकणारीं हसरीं मुलें !

दुपारीं 'नवजीवन मंडळा'च्या प्रमुख कार्यकर्त्यांची सभा झाली. ग्रामदानात मिळालेल्या गावात पुढील निर्माणकार्य करण्याची जबाबदारी

विनोबानीं या मद्रासात टागोर आहे. त्याने महुताग मदरय येथील विद्वान् विधायक कार्यकर्ते आहेत. त्या सभेत ख्रिस्ती मिशनऱ्याच्या सेवेची प्रशंसा करून विनोबानीं सर्वांच्या च चिंतनाला चालना देणारा एक विचार मांडला — "ख्रिस्ती लोकांत आपल्या गुरूच्या नावाचा प्रचार करण्याची जी वासना आढळते ती च त्यांच्या कार्यातील सर्वांत मोठी खोट आहे. माझें तर असें स्पष्ट मत आहे कीं गुरूच्या तत्त्वज्ञानाला सर्वांत अधिक बाधा त्याच्या नावाचा प्रचार करणाऱ्या त्याच्या शिष्यांच्या नावनेंतर निर्माण होते."

या भागातील परिस्थितीकडे लक्ष वेधीत विनोबा म्हणाले, "इथें माझ्या हें विशेष ध्यानात आलें कीं येथील लोक ग्रंथविहीन आहेत. ख्रिस्ती व मुसलमानानीं याना एक ग्रंथ देऊन एक प्रकारचा आधार दिला आहे. आम्हीं आजवर आपल्या वेद उपनिषद् गीता इत्यादि ग्रंथाना सामान्य जनतेपासून अडवून ठेवलें होतें ही आमची फार मोठी चूक आता या धर्मग्रंथाना मुक्त करण्याचा काळ आलेला आहे"

विनोबा जेव्हा येथील लोकाना म्हणतात कीं, 'तुम्हाला उपनिषदें, गीता, भागवत वगैरे सर्व वाचायचा अधिकार आहे' तेव्हा प्रथम तर त्या लोकाचा यावर विश्वास च बसत नाहीं. ते अत्यानंदानें विचारतात, 'खर च का आम्हीं भागवत वाचू शकतों?' गीता, भागवत वगैरे सारे ग्रंथ त्याचे आहेत पण आजवर त्याना त्या ग्रंथापासून दूर ठेवण्यात आलें, लेकराना गीता माऊलीपासून दूर ठेवलें गेलें हे लोक किती तरी शतकं वाचून गीता मातेच्या व भूमि मातेच्या प्रेमाला पारखे झाले होते आज जेव्हा एक वेदशास्त्रसपन्न पंडित त्याच्याकडे जाऊन त्याना सागतो कीं, तुम्हाला भूमातेची सेवा करण्याचा अधिकार आहे, तुम्हाला वेद-उपनिषदाचें अध्ययन करण्याचा अधिकार आहे, तव्हा त्याना वाटते कीं आपली युगानुयुगाची अभिलाषा पूर्ण होत आहे.

आजच्या प्रवचनात विनोबा म्हणाले, "समाजाची गति चक्राकार असते. त्यामुळें समाजात जे लोक सर्वांत मागासलेले असतात त्यानीं जरा आपलें तोंड फिरवलें कीं ते सर्वांत पुढारलेले बनतात मला तर अशी

त्यांनी वाटते की मी इथल्या लोकांना उपनिषद शिकवू शकेन व हे लोक तें तत्त्वज्ञान ग्रहण हि करू शकतील. शहरातल्या तथाकथित सुशिक्षितांच्या मात्र तें लवकर गळी उतरणार नाहीं."

आजकाल रोजच्या प्रार्थनासभेंत आसपासच्या ग्रामदानात मिळालेल्या गावाच्या जमिनींच्या पुनर्वितरणाचा कार्यक्रम असतो. आज तो नव्हता. तर विनोबा म्हणाले– "मला उपवास घडला"



## रत्नांची खाण

गुनि
२६ मे १९५.

दाट जंगलातील वाट. एकीकडे उंच डोंगर नी दुसरीकडे खोल दऱ्या सूर्याच्या प्रकाशात रमणीय भासणारी ही सृष्टि सूर्य अस्तास जाता च भयानक रूप धारण करते. दिवसा डोळ्यांना सुखविणारी ही सृष्टि रात्रीं वाघ अस्वलांची संचारभूमि बनते. घनदाट काळोख, रातकिड्यांचा किर्रऽऽ आवाज आणि वाघ अस्वलांच्या डरकाळ्या. वाघोबाच्या आगमनाची शक्यता असल्यामुळें काल रात्रभर आमच्या निवासस्थानाभोंवतीं पेट्रोमॅक्स ठेवले होते व आम्हीं सर्वांनीं पाळीपाळीनें पहारा केला. जागणाऱ्यांना निदान पहारा केल्याचें समाधान तरी मिळालें. झोंपणाऱ्यांना वाघ अस्वलांच्या गर्जनेमुळें झोंपेचें सुख कांहीं लाभलें नाहीं. एकटे बाबा च तेवढे नित्याप्रमाणें परमेश्वराच्या कुशींत नि शंकपणें झोंपले होते. गर्जनेचा आवाज कमी जास्त होण्यावर वाघोबा दूर आहेत कीं जवळ तें कळायचें. कधीं कधीं पावलांचा आवाज हि ऐकू यायचा. मात्र 'दर्शन' कांहीं घडलें नाहीं.

आज काल अरुणाच्या प्रकाशात उजळलेल्या सृष्टीच्या सौंदर्याचें पान करीत मी किंचित् मागें पडलें होतें. बाबा वाटेंत नाश्त्याकरता थांबले तेव्हा मला मागून येतांना पाहून बाप्पा (गोपबंधू चौधरी) नीं थट्टा करायला सुरुवात केली—" अरे तुम आ गई ! हम तो समझते थे कि शेरको नास्तेके

लिये तुम्हारा रसगुल्ला मिला होगा !" नाप्पाची भव्य मुद्रा नी आयाळी-सारखी दिसणारी दाढी पाहून बाबा त्याना 'सिंह' म्हणतात. वनराजा-प्रमाणे च ते हि उत्कलच्या जनतेच्या हृदयाचे अनभिषिक्त सम्राट् आहेत. त्यांची गर्जना हि सिंहाप्रमाणे च दणाणून सोडणारी असते ते रागावले म्हणजे मग कुणाची हि शब्द देखील बोलण्याची हिंमत होत नाहीं. एखादे काम नीट झाले नाहीं कीं बाप्पाचा पारा चढला च. पण त्याचा राग म्हणजे मेघाचा गडगडाट. क्षणभर भयभीत करील व दुसऱ्या च क्षणाला स्नेहवर्षावास आरंभ होईल पण प्राण्याना सिंहाचा दरारा असला तरी त्याचे छावे निर्भयपणे व निःसंकोचपणे त्याच्या अंगाखांद्यावर खेळतात. बाप्पाच्या पोटावर व पाठीवर ताव मारताना मला व गौतमला प्रश्न पडतो कीं लोक बाप्पाना एवढे घाबरतात तरी का ?

ओरिसातले 'चौधरी कुटुंब' म्हणजे एक हिऱ्याची खाण आहे. त्यातील एकेक हिरा आपल्या सर्व पैलूंसह चकाकत असतो. कुटुंबातील अग्रस्थानीं असलेल्या बाप्पाना लोक ओरिसाचे गांधी' म्हणून ओळखतात. त्यांच्या पत्नी रमादेवी म्हणजे निरलस, निष्काम सेवेची मूर्ति. बाप्पाच्या फटकाऱ्याने भेदरलेल्या कार्यकर्त्यांना 'बोऊ'(रमादेवी)च्या मायेच्या पांघरुणात लपता येतें. गेलीं पस्तीस वर्षे त्या खादी, नई तालीम, कस्तुरबा ट्रस्ट वगैरेचें काम करीत आहेत. नवबाबू हे नाप्पाचे धाकटे बंधु. जणू राम भरताची जोडी. बाप्पाचे सुपुत्र मनमोहनभाई यात्रेत विनोबाच्या रोजच्या भाषणाचा अनुवाद करण्याचें काम करतात. विनोबाच्या शेजारीं बसलेली त्यांची ध्यानस्थ मूर्ति विनोबाना फार आवडते. विनोबाच्या तोंडच वाक्य संपतें न संपतें तों च ते ओडिया भाषेत त्याचा अस्खलित अनुवाद करतात. विनोबा म्हणतात, 'मैं तो उसके अनुवादपर फिदा हूँ। यह ध्यानस्थ बैठता है इसलिये इतना सुंदर अनुवाद करता है।' मनमोहनभाई ओडियाचे एक चांगले लेखक हि आहेत. ते आणि त्यांची भगिनी अन्नपूर्णादेवी मिळून उत्कल भूदान समितीच्या मुखपत्राचें व साहित्य-प्रकाशनाचें सारें काम सांभाळतात. अन्नपूर्णादेवींचे पति शरचंद्र महाराणा हे उत्कल भूदान समितीचे संयोजक आहेत तर नवबाबूंचे जावई नारायण

दसाई गुजरातच्या भूदानकार्याचे एक आधारस्तंभ आहेत. निष्काम सेवेला वाहिलेले ग्रामसेवक कुटुंब दृष्टीस पडले कि आदळणे अशक्य च वाटते.

दुरून तालबद्ध, लयबद्ध सुस्वर ऐकू येऊ लागता च 'नुमा' (मालतीदेवी) माझा हात धरून पळत पळत पुढे निघाल्या व आदिवासी स्त्रियांच्या स्वागत नृत्यात सामील होऊन त्यांच्या तालाशीं पावलें जुळवू लागल्या. त्यांच्या वर्गाच्या स्त्रियांना शहरी साधनानीं सजविलेल्या स्टेजवरील लोकनृत्ये च तेवढीं माहीत! त्यामुळे लोकांत जाऊन लोकांच्या बरोबर नृत्यात भाग घेणारी ही मुख्य मंत्र्याची पत्नी आजच्या समाजरचनेला जबरदस्त धक्के देते! बाबा जवळ आले तेव्हा स्त्रिया नृत्य करीत सामोऱ्या आल्या. सर्वांना प्रणाम करीत ते पुढे निघून जाऊ लागले. तेवढ्यात महादेवीताई म्हणाल्या, 'मालतीदेवी व निर्मला देखील आहेत यांच्यात!' 'असं!' म्हणत हसत आमच्याकडे पहात त्यानीं दुसरा नमस्कार ठोकला!

रोज आम्ही ज्या खेड्यात जातों त्या खेड्याचा सर्व्हे करण्याचें काम यात्रीदलातील कांहीं लोक करतात. 'गुलि' गावासंबंधीं मिळालेले आकडे नुसते बोलके च नव्हे तर 'बोलायला लावणारे' होते. शोषणाच्या प्रक्रियेचें इथें अगदीं नग्न स्वरूप आढळलें. गावाची लोकसंख्या दीडशें नी जमीन अवघी तीस एकर. पण गावचा कपड्याचा वार्षिक खर्च सहाशें रुपये, मिठाचा चारशें रुपये व बिडीचा पाचशे रुपये. मीठ बंगालावरून आणावे लागलें तरी एवढे महाग पडणार नाहीं! विनोबानीं गावकऱ्यांना सांगितलें कीं "तुम्ही जंगलात रहाता व बाहेरचे व्यापारी तुम्हाला लुटतात. ही लूट थांबवायची असेल तर तुम्हाला तीन गोष्टी केल्या पाहिजेत—(१) गावात लागणारें सर्व कापड गावात च तयार केलें पाहिजे, कापूस पेरण्यापासून तों कपडा विणण्यापर्यन्तच्या सर्व क्रिया गावात च झाल्या पाहिजेत, (२) गावच्या सर्व लोकांचें मिळून एक सहकारी दुकान उघडायला हवे, व (३) बिडी पिणें अजिबात सोडून द्यायला हवें.



# क्रान्तीचा वणवा

खेजुरीपदर, नुआगड
२७, २८ मे १९५५

दुपारीं खूप जोराचें वादळ झालें अन् पाऊस पडूं लागला. पण सभेच्या वेळेपर्यन्त सारें शांत झालें. खिस्ती बधूंच्या सुंदर भजनानें सभेचा प्रारंभ झाला. 'आस आस बधु आस हे आनंदे, आस आजि एक होई वा' (बधूनो, सारे आनंदानें या नी एक व्हा) नंतर ग्रामदानातल्या दोन गावाचें पुनर्वितरण झालें. कालचा मालक आज मालक राहिला नव्हता, कालचा मजूर आज मजूर राहिला नव्हता. सारे भूमिपुत्र बनले होते, भूमातेची सेवा करणार नी तिच्या आशीर्वादानें सुखी होणार. विनोबा त्याना उद्देशून म्हणाले, "तुम्हीं आज जें कार्य केलें तें सरकारच्या कोणत्या च कायद्यानें होऊं शकत नाहीं. या जगात येऊन आपल्याला पैसा नव्हे तर प्रेम कमवायचें आहे. जेव्हा आपण हें जग सोडून जाऊं तेव्हा जमीन, धनदौलत घेऊन जाणार नाहीं, तर जें धर्मकार्य केलें असेल तें च बरोबर घेऊन जाऊं. आज तुम्ही सारे खऱ्या अर्थानें मानव बनलात व ईश्वरभक्त बनलात. मानवात नी पशूंत हा च तर फरक आहे कीं पशु स्वतःच्या च सुखानें सुखी व स्वतःच्या च दुःखानें दुःखी होतो. या उलट मानव दुसऱ्याच्या सुखानें सुखी नी दुःखानें दुःखी होतो. तसें च जो जमीन किंवा संपत्तीची पर्वा न करता सर्वांवर प्रेम करील नी सर्वांचें प्रेम मिळवील तो च खरा ईश्वरभक्त."

नुआगडला जाताना वाटेंत भ्रमरपुर नावाचें एक गाव लागलें तिथें बरे च खिस्ती व्यापारी आहेत. येथें खिस्ती होणाऱ्यांत 'पान' जातीच्या हरिजनांची संख्या अधिक आहे. त्यांतील बहुतांश पूर्वी भूमिहीन असतात, व खिस्ती झाल्यानंतर ते व्यापारी व सावकारी करून दुसऱ्याचें शोषण करूं लागतात असं बहुधा आढळून येतें आणि मग हळूहळू जमिनी देखील त्यांच्या हातात येऊं लागतात भ्रमरपूरच्या व्यापाऱ्यांना विनोबानीं संपत्ति दानाचा विचार समजावून सांगितला.

गुआगढ हा गंजाम जिल्ह्याचा अखेरचा पडाव. या यात्रेत या जिल्ह्यात एकूण २५ गावांचें ग्रामदान झालें व त्यांपैकीं १२ गावांचें पुनर्वितरण हि झालें. आजच्या प्रवचनांत ग्रामदानासंबंधीं बोलताना विनोबा म्हणाले – " आज इथें भूमिक्रांतीचा नुक्ता च आरंभ झाला आहे. पण पुढें हिंदुस्थानातल्या सर्व गावांना ग्रामदान देण्याची प्रेरणा मिळणार आहे. ज्यांना हृदय आहे त्यांना आम्ही हृदयाच्या मार्फत हें तत्त्वज्ञान समजावून सांगूं. तर बुद्धिमान म्हणणाऱ्यांना हे पटवून देऊं कीं ह्या विज्ञानयुगात ज्याप्रमाणें लहान राष्ट्रें टिकाव धरूं शकणार नाहींत त्या च प्रमाणें लहान कुटुंबें देखील टिकणार नाहींत. तेव्हा सबंध खेड्याचें एक कुटुंब बनविणें ही मुळीं आजच्या युगाची च आवश्यकता आहे. ज्यांच्याजवळ हृदय हि नाहीं व बुद्धी हि नाहीं असे लोक बहुधा प्रवाहाची दिशा पाहून काम करतात. तेव्हा त्यांना आम्ही सांगू कीं काळाचा प्रवाह या च दिशेनें चालला आहे. अशा रीतीनें आमच्याजवळ तिन्ही प्रकारच्या लोकांशीं सामना देण्यालायक शस्त्रें आहेत. आमचा हा असा त्रिशूळ आहे कीं ज्यापुढें कोणी च टिकाव धरूं शकणार नाहीं.

" एका घराला आग लागली कीं साऱ्या गावाला लागते. त्या च प्रमाणें एका गावात ग्रामदान झालें कीं विचारवह्नि निर्माण होतो आणि सर्वत्र पसरू लागतो. होळीच्या आगीप्रमाणें च ही आग देखील इतकी पवित्र आहे कीं ती आग लोक आपल्या च हातानें लावतील. कारण ह्या आगीनें सारे च मुक्त होणार आहेत. आणि ही आग इतकी शीतल आहे कीं ती विझवायला कुठल्या च पाण्याची गरज भासणार नाहीं. या भागात डोंगरात जी शेती चालते तिला ' पोडुचास ' म्हणतात. म्हणजे प्रथम आग लावली जाते नी मग शेती करतात. त्या च प्रमाणें आम्ही देखील आधीं ग्रामदानाची आग लावू नी मग निर्माणकार्य करूं. आग लावल्याचाचून शेती करण्याचे प्रयोग आम्हीं गेलीं तीस वर्षे वर्षांत करून पाहिले पण ते यशस्वी होऊं शकले नाहींत. तेव्हा माझ्या लक्षात आलें कीं आग लावल्याचून शेती होऊं शक्त नाहीं. नंतर मीं आगीचा शोध सुरू केला आणि भूदानाच्या रूपानें मला ती आग गवसली."

हे शब्द ऐकत असताना देशातल्या विधायक कार्यांचा गेल्या तीस वर्षांतला इतिहास डोळ्यांसमोर उभा राहिला. आजची विषमतेवर आधारित समाजरचना, सर्वत्र स्वार्थाकरता चाललेली धडपड, हे सारे तसें च कायम असताना काहीं खेड्यात खादी, ग्रामोद्योग व नई तालीमचे प्रयोग करण्याचे आजवर अनेक प्रयोग झाले. त्यामुळें जनतेला थोडाबहुत दिलासा मिळाला पण क्रान्ति होऊ शकली नाहीं. चर्खा हा अहिंसक क्रान्तीचा झेंडा आहे. मानवनिष्ठ अशा नव्या अर्थशास्त्राचें प्रतीक आहे. जुन्या मूल्यावर अधिष्ठित जुन्या समाजरचनेत 'लाचारीची खादी' निर्माण होईल. नव्या मूल्यावर अधिष्ठित नवी समाजरचना निर्माण केल्यावाचून तो चर्खा 'विचाराची खादी' निर्माण करू शकणार नाहीं. ग्रामोद्योग म्हणजे केवळ आजचा बेकारीचा प्रश्न सोडविण्यास एक उपयुक्त साधन नव्हे तर विकेन्द्रित अर्थ-व्यवस्थेचा तो एक अविभाज्य घटक आहे. नयी तालीम नवा मानव निर्माण करणारी शिक्षणपद्धति आहे. जुना समाज कायम राखून नई तालीमचा प्रयोग केला तर विनायकाचा वानर बनतो. जुन्या जगाला आग लावून नवें जग उभारण्याची मनीषा बाळगणारे चर्खा, ग्रामोद्योग नी नई तालीम क्रांति करू शकतील.

समतेच्या तत्त्वानुसार भूमीचे पुनर्वितरण करण्याच्या क्रान्तिकारी कार्याशीं निगडित झाल्याशिवाय खादी ग्रामोद्योगादिकात तेज निर्माण होऊ शकत नाहीं हे आता अनुभवानें च सिद्ध झाले आहे. तिकडे जगात सर्वत्र जमिनींची मालकी अस्तित्वात असून देखील ज्या गावचे लोक स्वेच्छेनें, विचारपूर्वक आपल्या गावातील जमिनीची मालकी नाहींशी करतील ते क्रान्तिपथावर पहिलें पाऊल टाकतील; मग तिथें नवसमाजरचनेचें अधिष्ठान निर्माण होईल. त्यानंतर त्या गावचे सारे लोक मिळून एकमतानें संकल्प करतील कीं 'तिकडे बाहेरच्या जगात खुशाल गिरण्या गरगर फिरू देत. आम्ही गावात तयार झालेली खादी च वापरू. आम्ही आपल्या गावात बाहेरच्या मिलचा कपडा येऊ देणार नाहीं. बाहेरच्या जगात मोठमोठे केन्द्रित यंत्रोद्योग खुशाल चालू देत, आमच्या गावात सर्वांना काम देणारे ग्रामोद्योग च चालतील. आम्ही आपल्या साधनात सतत सुधार करीत राहू पण माणसाना

बेकार बनविणाऱ्या यंत्रांना मात्र गावात थारा देणार नाही. बाहेरच्या जगात ज्ञानाचा खुशाल चालू दे. आमच्या गावात मात्र नव्या जीवनविद्येचे च शिक्षण मिळेल. आमच्या गावचा प्रत्येक मुलगा व मुलगी कोणता ना कोणता उद्योग करील व आत्मोन्नतीकरता ब्रह्मविद्येची कास धरील. विज्ञान आणि आत्मज्ञान या दोहोंच्या आधारे आम्ही आपल्या गावात स्वर्ग आणू."

केन्द्रीकरण, भौतिकवाद आणि महायुद्धाच्या दुष्चक्रात अडकलेल्या या जगात या तऱ्हेचा निर्णय घेणारा गाव स्वत मुक्त होत इतरांना मुक्तीचा मार्ग दाखवणार नाही का? कोरापुटमध्ये ग्रामदान झाले नव्हते, जमीन व संपत्तीच्या स्वामित्वाच्या कल्पनेवर आधारित जुनी समाजरचना जशीच्या तशी कायम होती, तोवर हे सारे एक निष्फळ सुंदर स्वप्न होते. पण आता एकामागून एक गावात सारी भूमि गोपालाची नी सारी संपत्ति रघुपतीची बनू लागली आहे. विमुक्त भूमिमाता भूमिपुत्रांना आशीर्वाद देत आहे—'यदिच्छसि ते तदस्तु।' (तू जे इच्छिशील ते होवो).



## विश्वशांतीचा लक्ष्यवेध

आयाडी, जुपापुर, मेरिंग, विक्रमपुर (जिल्हा—कोरापुट)
२९, ३०, ३१ मे व १ जून १९५५

नवनवीन दृश्यांनी नटलेल्या दाट दाट अरण्यात प्रवेश होत होता. सारी सृष्टि शांत चिंतनात मग्न होती. जणू ती ऋषींच्या शब्दात सुचवीत होती की, "हे सौम्या उपनिषदांनी वर्णिलेले महास्त्र धनुष्य हाती घे, उपासनेने तीक्ष्ण झालेला बाण त्यावर चढव आणि भावपूर्ण चित्ताने दोरी ओढ व त्या 'अक्षरा'चा लक्ष्यवेध कर."

'धनुर्गृहीत्वा औपनिषदं महास्त्रम् ।
शरं हि उपासानिशितम् संदधीत
आयम्य तद् भावगतेन चेतसा
लक्ष्यं तदेवाक्षरं सौम्य विद्धि ।'

——उपनिषदाचा उद्घोष आहे–' ईशावास्यमिदम् सर्वम् । ' अहिंसेचें महास्त्र हातीं घे, ' तेन त्यक्तेन भुंजीथाः ' ——ह्या मंत्राच्या उपासनेनें तीक्ष्ण झालेला ग्रामदानाचा शर त्यावर चढव आणि विश्व शांतीच्या लक्ष्याचा वेध कर.

आराडी हा कोरापुट जिल्ह्याचा पहिला पडाव. आराडीच्या सभेंत हिरव्यागार प्रशान्त वातावरणात विनोबाचें अरण्यवासीयांशीं हितगुज सुरू झालें ते म्हणाले, ' गेल्या दीड वर्षापासून मी कोरापुटचें नाव ऐकत आहें. इथल्या जंगलात राहणाऱ्या लोकांना भूदानाचें तत्त्वज्ञान रुचतें असें मी ऐकलें. माझी अशी इच्छा आहे कीं या जिल्ह्यातील सर्व च गावात ग्रामदान व्हावें. हवा, पाणी आणि सूर्यप्रकाश या च प्रमाणे जमीन देखील ईश्वरानें च निर्माण केली आहे आणि म्हणून तिच्यावर सर्वांचा समान अधिकार आहे. हवा सर्वांना हवी तितकी मिळते. कोणा हि तहानलेल्या जीव येवो गंगामाइ त्याला पाणी पाजते. सूर्याचीं किरणें राजाच्या प्रासादात हि प्रवेश करतात नी गरिबाच्या झोपडींत हि प्रवेश करतात हवेला, पाण्याला किंवा प्रकाशाला भेदभाव माहीत नाहीं. हवेचा नी पाण्याचा कधीं कोणी मालक होऊं शकतो का ? त्या च प्रमाणें आम्ही भूमीचे मालक होऊ शकत नाहीं. भूमीचा स्वामी, भूमिपति तर परमेश्वर च आहे. हा च माझा मंत्र आहे. म्हणून मी रोज त्याचा जप करतों.''

उदयगिरीचा डोंगर उतरून झाल्यामुळें आता जरा उन्हाळा भासायला लागला आहे. तापल्याविना निघून गेला तर तो उन्हाळा कसला ? उदयगिरीची यात्रा म्हणजे मात्र थंड हवेच्या ठिकाणची सहल च झाली. पण आज स्नान करताना वाढत्या उन्हाबरोबर महेन्द्रतनया नदीच्या पाण्याचा स्पर्श अधिक च सुखकर वाटला. त्यातल उत्कलमधील नद्या आपल्या नाम-सौंदर्यामुळें हृदयाला विशेष च आल्हाद देतात. सुवर्णरेखा, वैतरिणी, ब्राह्मणी, भार्गवी, ऋषितुल्या. '

वंशधारेच्या तीरावरील उंच झाडाच्या गर्द छायेंत विक्रमपूरच्या जनतेला विनोबा स्वराज्याचा अर्थ सांगत होते : " जिथें कोणी कुणाला भीत नाहीं नी कोणी कुणाला भीति दाखवीत नाहीं, कोणी कुणाला दबत नाहीं की

कोणी कुणाला दावीत नाही, तो च देश खऱ्या अर्थाने स्वतंत्र आहे. ज्या देशातील घरामध्ये पोपट पिंजऱ्यात आहेत तो देश स्वतंत्र नाहीं. ज्या क्षणीं तुम्ही त्या पिंजऱ्याचें दार उघडता, त्या च क्षणीं तुमच्या हि शृंखला गळून पडतात !"

## दीप्त दीपावली

कुजेन्द्री
२, ३ जून १९५८

आजवरच्या कुठल्या हि इतिहासकारान जिच्याकडे लक्ष दिलें नसतें अशी एक व्यक्ति भूमिक्रान्तीच्या इतिहासकाराचें लक्ष वेधून घेणार आहे ज्याने कधीं कुठल्या हि मोठ्या सभेत दणदणीत च काय पण साधें भाषण देखील क्वचित् च केलें असेल, लेखणीच्या आयुधानें क्रान्तीची धार तीक्ष्ण करण्याचा ज्यानें कधीं विचार हि केला नसेल कीं कधीं तुफानी दौरे काढले नसतील, वर्तमानपत्रवाल्याना ज्याचें नाव माहीत करून घ्यायची आवश्यकता हि भासली नसेल, अशा व्यक्तीला स्वामित्वनिरसनाच्या आजच्या युगाच्या क्रान्तिकारी विचाराला साकार रूप देण्याच्या कार्यात एक अग्रस्थान मिळणार आहे. जिथें बाहेरच्या जगांतून कधीं कुणी जात नाहीं अशा असंख्य खेड्यात, जंगलांतल्या वाटेनें उन्हापावसात, नद्यानाले डोंगर पार करीत एक माणूस जातो तो घराघरात जाऊन मुलाबाळांची विचारपूस करील, गांधीबाबाच्या चारदोन उपदेशाच्या गोष्टी सांगेल, बोलता बोलता चरखा उघडून सूत कातू लागेल, गावकरी त्याविषयीं विचारतील, मग तो त्याना चरख्याची माहिती सांगेल !—गेलीं कित्येक वर्षे त्याचा हा च कार्यक्रम अव्याहत चालू होता. दुष्काळ पडला, पूर आला कीं तो हटकून मदतीला धावणार च. आदिवासींचा जमिनीवर अधिकार आहे, त्याना जमीन मिळावी, म्हणून त्यानें पाच वर्षांपूर्वी एकदा एक यशस्वी सामूहिक सत्याग्रह हि केला होता.

त्याचे नाव विश्वनाथ पट्नाईक. पण येथील लोक त्याला 'आशा' या नावानें ओळखतात. त्याची आज्ञा त्याना प्रमाण आहे. तुरुणी च तिशी उलटलेली पण प्रौढाचें गांभीर्य व बालकाची ऋजुता दोन्हींचा त्याच्या ठिकाणीं संगम आढळतो. दरिद्रिनारायणाच्या क्षुधेने विनोबाच्या पायाना गति दिली तेव्हापासून विश्वनाथभाईचा हि नवा कार्यक्रम सुरू झाला. उत्तर प्रदेशातील मगरोठ नावाच्या गावातील लोकानीं सुमारें तीन वर्षांपूर्वी आपली सारी भूमि गोपालाची केल्याची वार्ता त्यानीं ऐकली होती.

सूर्यास्ताची वेळ. पाखरें घरट्याकडे परतू लागली. अरण्यातील निस्तब्ध वातावरणात थोडा वेळ किलबिल निनाद ऐकू येऊ लागला. शेतकरी घराकडे परतू लागले. 'आशा' आलेले पाहता च सारे त्याच्याभोंवतीं गोळा झाले. आशा पीकपाणी, आजार, मुलेबाळें इत्यादि विषयीं विचारपूस करू लागले. कुणीं तरी विचारलें, "आज इकडे कसे आलात?" मग आशा सागू लागले, "विनोबा नावाचा अेक संत पायीं पायीं हिंडून लोकाना सुखाचा मार्ग दाखवीत आहे. तो म्हणतो, 'भूमि तर आपली माता आहे. भूमिपति भगवान् आहे. आपण स्वत ला भूमिपति म्हणवून घ्यायचें म्हणजे पाप आहे, अधर्म आहे. आपण सारे भूमिपुत्र आहोत. सर्व पुत्राना आईच्या प्रेमाचा समान अधिकार आहे.' आपल्याजवळ असलेली सारी जमीन भूदानयज्ञात समर्पण करून देशाचा जमीन बनू या व गावाचें एक कुटुंब करून सारे भाऊ भाऊ म्हणून राहू या."

गुरुदेवाच्या एका गीतात मावळत्या सूर्यानें जगाला विचारलें, "आता माझें काम कोण करणार?" उत्तर देण्याची शक्ति कुणात हि नव्हती. पण एक इवलीशी मातीची पणती (माटीर प्रदीप) हळू च म्हणाली, "स्वामी, मला शक्य होईल तेवढा अंधकार लोपवीन मी!" — सूर्यास्त होऊन गेला. काळोख पसरू लागला.—"अगदीं खरें सागतात विनोबाजी, आम्हीं ग्रामदान देणार." गावकऱ्यानीं आपला निर्णय जाहीर केला. पण 'आशा' म्हणाले, "आज थाबा. रात्रीं नीट विचार करा. उद्या सकाळीं बोलू पुन्हा आपण." —गावकऱ्याना अधिक विचार करायची गरज

भासली नाहीं. दीप उजळला तर अंधार लोपतो का हा काय विचार करण्यासारखा प्रश्न आहे ? तें तर एक सनातन सत्य आहे.

कोरापुट जिल्ह्यात विषयस्टक ठाण्यातील गोवरपल्ली या गावात पहिली पणती उजळली विनोबाजी कोरापुट जिल्ह्यात प्रवेश करीपर्यंत सुमारें शभर गावात पणत्याचा सौम्य स्निग्ध प्रकाश पसरला होता. सुधारलेल्या जगाची पुढारलेली माणसें प्रथम या मातीच्या पणत्याकडे पाहून नाकें मुरडू लागली त्याना विद्युद्दीपाचा झगझगाट हवा होता 'कोरापुटमधील गावें लहान च आहेत तेथील बहुसख्य लोक अशिक्षित व आदिवासी आहेत मोठमोठ्या गावात ग्रामदान कुठें झालेंय् अजून ? आणि कारखाने तर भाडवलदाराच्या च हातीं आहेत ! '—तर्कवितर्क सुरू झाले. पण त्यानें काळोख थोडा च कमी होणार होता ! काळोखाच्या काळ्याकुट्ट रात्रींना लोपवीत चिमुकल्या पणत्याची रांग उजळू लागली. प्रकाशाला प्रकाशनाची आवश्यकता नसते. काळोखाच्या जगातून मानवानें त्या दीपावलीकडे पाहिलें ! तिच्यात अंधकार नाहींसा करण्याचें सामर्थ्य असल्याचें त्याला गवसलें.

कुजेंद्री गाव विश्वनाथभाईंचें तपस्यास्थान विनोबाजींनीं कुजेंद्रींत प्रवेश केला तेव्हा हार घालायला व स्वागत करायला ते पुढें आले नाहींत. लोकाच्या घोळक्यात कुठेतरी लपले होते. शब्दानीं स्वागत करण्याची जुन्या-जगाची रीत, पण नव्या जगात माणसाचें जीवन बोलकें होणार आहे. रस्त्याच्या दुतर्फा कुजेन्द्रीवासी उभे होते. बहुतेक सर्वांनीं स्वत च्या हातच्या खादीचीं वस्त्रें परिधान केलीं होतीं. एकेकजण पुढें येऊन विनोबाना सुताची गुंडी अर्पण करायचा जणू प्रत्येक व्यक्ति सुचवीत होती कीं ' सुताचे हे कच्चे धागे आम्हाला राष्ट्रपित्याच्या चरणाशीं जोडीत आहेत ' जुन्या जगाला घसा फोडून महात्मा गांधींच्या नावाचा जयजयकार करणें तेवढें माहीत. इथें मूकवाणीनें त्याच्या तत्त्वाचा जयजयकार होत होता. तो नव्या मूल्याचा सूचक होता.

विनोबा कुजेन्द्रीवासीयाना म्हणाले, " तुम्ही बहुतेक सारा कपडा गावातच तयार करता हें पाहून मला फार आनद झाला पण अजून हि

इथें बाहेरचा थोडा कपडा येतो च. तुम्ही देवाला साक्षी ठेवून प्रतिज्ञा करा कीं आम्ही आपल्या आपल्या गावात तयार झालेला कपडा च वापरू. गावाला लागणाऱ्या आवश्यक वस्तु इथे च तयार करण्याचें ठरवाल तर सर्वांना काम मिळेल. मग तुमचा गाव स्वर्गाहून हि सुंदर बनेल. स्वर्गातल्या देवाना कांहीं काम च नसतें त्यामुळे त्याच्यात मत्सर, ईर्षा, भाडणें वगैरे चालतात. भागवतात म्हटलें आहे कीं स्वर्गातल्या देवाना देखील मनुष्यजन्म घेण्याची इच्छा होते कारण फक्त मनुष्यजन्मात च पुरुषार्थ करता येतो. स्वर्गात नुसता भोग च असतो. पण मानव आपल्या पराक्रमानें देवत्व हि प्राप्त करू शकतो किंवा पशूहूनहि वाईट बनू शकतो. तो आपल्या इच्छेनुसार कांहीं हि करू शकतो. आपल्या जीवनाचा आदर्श म्हणजे हाता काम, मुखीं नाम नी हृदयात राम !"

दुपारीं बाबानीं गावाला प्रदक्षिणा घातली. घरोघर चरख्यांचा ओंकार-ध्वनि निनादत होता व मागावर कापड विणलें जात होतें. एका घरात एक दहा वर्षांचा मुलगा तन्मय होऊन विणत होता व त्याची थोरली बहीण त्याला मदत करत होती. कार्यकर्त्यांच्या सभेंत त्या मुलाची मुक्त कंठानें स्तुति करीत बाबा म्हणाले, "आता त्या मुलाचा गुणावर भार नाहीं कीं रोटीला त्याची काळजी नाहीं. पाण्यातल्या माशाप्रमाणें तो उद्योगात प्रवीण झाला आहे. आता त्याला एक च गरज उरली आहे, अन् ती म्हणजे ज्ञानाची." त्याला पाहून 'झिनी झिनी बिनी चदरिया' म्हणणाऱ्या भक्त कबिराचें स्मरण झालें.

"क्रान्ति म्हणजे जीवनाच्या मूल्यात परिवर्तन. क्रान्ति प्रथम हृदयात होते आणि मग समाजात. आणि म्हणून क्रान्ति ही अहिंसक च असू शकते" इत्यादि विनोबा-वचनें आजवर नुसतीं ऐकलीं होतीं पण या अरण्यात रोज घडणाऱ्या घटना पाहून सर्व जुन्या मूल्यांचा पाया च ढासळत असल्यागत भासतें आहे. शहरात राहणारे सुशिक्षित लोक सुसंस्कृत असतात असा आमचा आजवरचा समज. पण इथें काय दृश्य दिसतें ? संध्याकाळच्या सभेंत येडारच्या 'सर्वांचे' गावाचें पुनर्वितरण चालू होतें. सरपाटृत आता कोणी हि जमीनमालक राहिला नव्हता. सारे भूमिपुत्र झाले होते. नरसिंगदु हसत हसत पुढें आला. कालपर्यंत तो २४ एकर

जमिनीचा मालक होता आणि आज ३॥ एकर जमिनीचे वहिवाटपत्र घेत होता. एका भगिनीने त्याला गंध लावले व विनोबांनी त्याला एक कागद दिला. प्रसाद स्वीकारीत प्रणाम करीत तो बाजूला झाला. त्याचे स्मित जणू जगाला सांगत होतें की या भरतभूमींत दुर्लभ असा मनुष्यजन्म मला मिळाला आहे. समाजाला सर्वस्व समर्पण करुन च मी आज त्याचें सार्थक करीत आहें. दुसरा एक माणूस पुढे आला. तो कालपर्यंत दुसऱ्याच्या शेतावर खपणारा मजूर होता. त्याला गंधफुलासहित पात्र एकर जमिनीचें वहिवाटपात्र मिळालें. प्रसाद घेऊन प्रसन्न होऊन तो बाजूला झाला. भूमीचा मालक परमेश्वर, आम्हाला सेवा करायला जमीन मिळते आहे, ही गोष्ट दोघे हि जाणून होते. तिकडे शहरातले प्रगतिशील लोक तीस एकराची कमाल मर्यादा ठेवण्याचा कायदा करुन मोठी क्रान्ति करण्याच्या गोष्टी बोलत आहेत नी इथे खेड्यापाड्यात भूस्वामित्वाचे विसर्जन होते आहे. तिकडे विद्या विभूषितामध्यें स्वार्थाची स्पर्धा चालू आहे नी इकडे या अशिक्षितात स्वार्थत्यागाची स्पर्धा चालली आहे. मनात विचार येतो— संस्कृति कशाला म्हणायचें ?

सभेनतर बाबा म्हणाले, " हे सारें काय घडतें आहे ? २४ एकरवाला आपल्याजवळ ३॥ एकर ठेवतो नी भूमिहीनाला ५ एकर मिळते." दामोदरजी म्हणाले, " अगदी ' न भूतो न भविष्यति ' चालले आहे. बाबा लगेच हसून म्हणाले, " न भूतो म्हणा ! न भविष्यति कसें म्हणता ! "

काल जें अशक्य वाटतें तें आज शक्य होणें, कालचा आदर्श आज व्यवहार होणे, ही मानवाच्या प्रगतीची दिशा आहे. आजवर जग म्हणायचें, " माणूस स्वखुषीने आपला मालकी हक्क सोडील हें अगदी अशक्य आहे. तें फक्त महात्म्यांना च शक्य आहे ! " बापूंचे जग हि असं च म्हणत असे की अहिंसा फक्त महात्म्यांच्या करता आहे पण पाहता पाहता असंख्य मानव अहिंसक प्रतिकारास सज्ज झाले.

तिकडे बाबा गुणगुणत होते —

> " अशक्य तें तुम्हां नाहीं नारायणा ।
> निर्जीवा चेतना आणावया ॥ "

# ग्रामदान देणारे जगाचे नेते बनतील

चांडिपा, सुंदिमिणी, दुर्गी
४, ५, ६ जून १९५५

ग्रामदानात मिळालेलीं जमिनीचीं गावें दूर जंगलात आहेत. त्या गावात राहणाऱ्या आपल्या आराध्यदेवांना भेटण्याची विनोबाजींची फार इच्छा. त्यामुळें सध्या दाट जंगलातून मुद्दाम नवीन तयार केलेल्या कच्च्या रस्त्यानें यात्रा चालली आहे. वाटेतल्या नद्या नाल्यांवर लाकडी ओंडक्यांचे तात्पुरते पूल तयार केले आहेत. या भागात कंध व शौरा या आदिवासी जातींचे लोक आहेत. त्यांच्यापैकी बहुतेकांना ओडिया भाषा देखील समजत नाहीं. त्यामुळें आजकाल पुष्कळदा बाबांच्या हिंदीचा प्रथम ओडियात अनुवाद होतो आणि मग ओडियाचा शौरा किंवा कंध भाषेंत. बाबा येथील लोकांना म्हणतात, " आपल्याला एकमेकांची भाषा कळत नाहीं, पण हृदयाची भाषा हृदयाला कळते." रोजच्या सभेला खूप दूरदूरून जंगलातून लोक येतात. काहीं तर एक दोन दिवस आधीं च निघालेले असतात. सकाळ-पासून आपल्या निवासस्थानाभोंवतीं लोकांची गर्दी असते. एखाद्या जत्रेचें च स्वरूप येतें.

अर्पण करून गावाचे कुटुंब बनविणारे ते लोक कसे असतात जरा पाहून तर येऊ ! "

विनोबा भविष्य वाणी बोलत नव्हते. गेल्या महिन्या दीड महिन्यापासून एक अमेरिकन जोडपें आमच्या यात्रीदलात आहे. ते भूदानाची एक सुंदर फिल्म तयार करीत आहेत ग्रामदान देणाऱ्या ग्रामीणाचे फोटो घेताना त्याना विशेष च आनंद होतो.

सूटिढमिर्णीच्या प्रवचनात विनोबांनी ग्रामदानाचे फायदे सांगितले. ते म्हणाले, " (१) जमिनीची मालकी नाहींशी करून सारी जमीन गावाची करण्यात पहिला लाभ हा आहे कीं त्यामुळें गावची संपत्ति वाढविण्याला मदत होईल. गावचे सर्व लोक मिळून शेती सुधार, पाण्याची व्यवस्था, ग्रामोद्योगाविषयी चर्चा करून योजना तयार करतील, मग त्याना बाहेरची मदत देखील सुलभतेन मिळू शकेल. म्हणजे ग्रामदानानें आर्थिक स्वातंत्र्य प्राप्त होऊं शकेल. (२) दुसरा लाभ असा कीं त्यायोगें परस्परप्रेम वाढेल, जीवनातला आनंद व रुचि वाटेल. हा झाला सांस्कृतिक लाभ. (३) ग्रामदानामुळे लोकांचा नैतिक स्तर वर चढेल हा एक फार मोठा लाभ आहे. जमीन आणि संपत्तीच्या मालकीच्या कल्पनमुळें माणसाचे हृदय संकुचित बनतें आणि मग कलह सुरू होतात आज साऱ्या जगात परस्पर स्वार्थाची जी टक्कर चालली आहे तीमुळे सारें जग दु:खी आहे व परिणामस्वरूप हिंसा खूप वाढते आहे. तेव्हा सर्व जमीन गावाची करण्यानें जगाला नैतिक उत्थानाचा मार्ग मिळणार आहे. (४) ग्रामदानामुळें मानवाला मुक्तीचा मार्ग गवसेल. ' माझें घर, माझें शेत ' असें म्हणण्यानें माणूस आसक्तींत गुरफटला जातो. आपलें घर लहान न समजता व्यापक समजणें ही च मुक्तीची युक्ति आहे. सारा गाव हें च आपलं घर व त्यांना आपण आपलें घर मानतों ते घर देखील साऱ्या गावानें, माझें एकट्याचें नव्हे, असें मानायला हवें. आजवर आपल्या देशात मुमुक्षपरता चे प्रयत्न झाले त्यात घरदार सारें काहीं सोडण्याचा विचार होता. पण माणूस जेव्हा हें ओळखतो कीं मी साऱ्यांचा नी सारे माझे, तेंव्हा तो सदाच मुक्त होऊं शकतो "

मुक्त आकाशाच्या खालीं, भूमीच्या आधारवर, धर्माच्या सहवासात,

जनतेच्या च साधनाद्वारे जनतेकडे जाण्याकरता पदयात्रा करण्याने होणाऱ्या लाभाचे विनोबा नेहमी वर्णन करतात. दुर्गीला जाताना ते त्याविषयी प्रकट चिंतन करीत म्हणाले, "पदयात्रेचा सर्वात मोठा लाभ म्हणजे अहिंसेचा शोध. अहिंसेकरता तलवारीचा उपयोग करणे उचित नव्हे हे आम्ही मान्य केले आहे त्या च प्रमाणे अहिंसेचा पदयात्रेशी काही निकटचा संबंध आहे याकडे मात्र आमचे अजून लक्ष जात नाही. तसा आम्ही पदयात्रा करतो पण त्यात काही गुप्त शक्ति दडलेली आहे याची अजून आम्हाला जाणीव झाली नाही. आम्ही सारे दोर कापून टाकल्याशिवाय, वाहनाचा त्याग केल्याशिवाय आम्हाला त्या शक्तीचे भान होऊ शकणार नाही. मारे तर असे मत आहे की अहिंसेचा शोध करायचा असेल, अहिंसेची नवी-नवी शस्त्रे शोधून काढायची असतील, तर सारे दोर कापून पदयात्रेला निघायला हवे."

दुर्गीला एक जमीनदार विनोबाना भेटायला आले. त्यांनी भूदान पूर्वी च दिलेले आहे. पण त्यातील बरी च जमीन पडती होती. विनोबा त्याना म्हणाले, "त्या भूमिहीनाना ही जमीन मिळेल ते शेती कशी करू शकतील? तेव्हा तुम्ही असे करा की ती पडती जमीन उठवण्याकरता एक ट्रॅक्टर, व एका माणसाचा पगार एवढ्याचे दान द्या." बरा च वेळपर्यंत त्या दोघांचे हितगुज चालले होते. शेवटी जमीनदाराने विनोबांची मागणी कबूल केली. या प्रसंगाने उद्गार काढीत विनोबा प्रसन्नतेने म्हणाले, "या च भारतीय हृदयावर भरवसा ठेवून मी भूदानाची चळवळ चालवीत आहे."

## प्रकाशदायिनी अहिंसा

हजारीबाग, विषमकटक, कुटागुडा, टागसुरडा,
७, ८, ९, १० जून १९५५

कोरापुट जिल्हा मलेरियाकरिता प्रसिद्ध आहे. कोरापुटमध्यें बदली होण म्हणजे एक शिक्षा च आहे असें येथील सरकारी अधिकाऱ्याना वाटतें. कोरापुटमध्यें प्रवेश करता च आमच्या यात्रीदलातील चार पाच जणाना मलेरियाने पछाडलें. पहाता पहाता त्याची सख्या वाढत च गेली शेवटीं आम्ही तिघे चौघे च टिकलों व बाकीचे सारे वीर धडाधड पडले विषम-कटक व रायगडच्या दवाखान्यात भूदानकार्यकर्त्यांची गर्दी होऊ लागली. विषमकटकला मगलामावशींना भेटण्याकरिता म्हणून बाबा दवाखान्याकडे जायला निघाले. जाताना हसत म्हणाले, " तसा काहीं मी अगदीं च निर्दय नाहीं बर का ! कुणी आजारी पडल तर भेटायला जातों मी. पण मला कुणाची काळजी मात्र वाटत नाहीं कुणी मेल कीं लोक म्हणतात ' अरेरे ! बिचारा मेला. आता रडा. ' पण काय रे, कुणी मुबईला गेला तर काय आपण अस म्हणतों कीं, ' अरेरे ! तो मुबईला गेला, आता रडा ! '. मृत्यूत शोक करण्यालायक आहे तरी काय ? "

मगलामावशी म्हणजे उत्तराच्या मावशी. पण त्या जणू आम्हा सर्वांच्या च आईची पाठची बहीण आहेत. आजवर त्यानीं बाबाच्या आईशीं हि बहिणीचें नातें जोडलें आहे ' गौतमला दूध मिळालें कीं नाहीं, निर्मलाचा घसा दुखतो आहे तर तिला गरम पाणी द्यायचें आहे, बाळ नीट जेवला ना ' —साऱ्या गोष्टींची मावशींना काळजी ! पण जेव्हापासून बाबा हि ' यस काय मंगलामावशी ? ' म्हणू लागले तेव्हापासून ' बाबाच्या तुम्ही कोण ? ' गावकऱ्याच्या या प्रश्नाला मावशी गभीरपणें उत्तर देतात, ' मी त्याची मावशी ! ' आणि हें उत्तर ऐकून गावकरी हि समाधानानें माना डोलावतात

बिहार, बगाल, आसाम, ओरिसा नी सारा दक्षिण हिंदुस्थान भात खाणारा प्रदेश आहे. आमच्यापैकीं काहीं लोकाना रोज पोळी खायची

सजय झालेली असणार हें ओळखून कुठून तरी कणीक आणवून आम्हाला गरम पोळ्या खाऊ घालणें हें सगळ्यांवरचें एक आवडतें काम. घरीं माझ्या आईला काळजी वाटते कीं जंगलयात्रेत पोरींचें कसें होत असेल! पण इथें आम्हाला घरापासून दूर असल्यासारखें कधीं भासत च नाहीं. रमादेवी (आमच्या 'बोऊ'. ओडियात आईला बोऊ नी वडिलांना बाप्पा म्हणतात) व मालतीदेवी (आमच्या 'नुमा') यांच्या मातृवात्सल्याचा चारा खाऊन आम्ही पाखरासारखीं आनंदात उडत असतों. बाबेची सारी व्यवस्था त्या च करतात. बाबांकरता दूध वेळेवर आलें नाहीं कीं नुमा जीप घेऊन धावल्या च. कधीं कधीं तीस चाळीस मैलावरून त्यांनीं दूध आणलें आहे. एखादा कार्यकर्ता आजारी पडला, कुठलासा जमीनदारा कडून दान आणायचें असले, कीं बोऊ निघाल्या च. त्यांना विश्रांति म्हणून ती कशी माहीत च नाहीं.

कुद्रागुडाला जाताना वाटेंत लोकशाहीविषयीं चर्चा चालली होती. बाबा म्हणाले, 'लोकशाही हा काहीं अंतिम आदर्श नाहीं.' त्यावर एकानें विचारलें कीं, 'मग अंतिम आदर्श काय आहे?' बाबा हसत उद्‌गारले, "अंतिम आदर्श आहे आरसा— ज्यांत आपलें स्वरूप दिसतें!" नंतर गंभीर होत म्हणाले, "भारतीय मन म्हणतें कीं अन्तिम आदर्श म्हणजे मुक्ति. जे सुशासनाचा आदर्श मानतात ते मुक्तिवादी नसून स्वर्गवादी, वैकुंठवादी आहेत."

मागें एकदा या विषयावर ते म्हणाले होते कीं, "मुक्तीचा मार्ग आक्रमिणाऱ्यांना दुर्जनांकडून विरोध होत नाहीं तर सज्जनांकडून च विरोध होतो. बिचारे दुर्जन काय विरोध करणार? शुकदेवाचे वडील म्हणजे व्यास महर्षि. पण जेव्हा शुकदेवानीं घर सोडून मुक्तीचा मार्ग धरला तेव्हा व्यास देव पुत्रवियोगाच्या शोकानें व्याकुळ झाले!"

डागमुरडा हें दाट जंगलांतलें गाव. तिथें जीप देखील जाऊ शकत नाहीं. पण पदयात्रीला कोण अडवणार? घनदाट वृक्षांनीं वेढलेल्या डोंगरांना वळसे देत, चार नद्या ओलांडीत विनोबा तिथें पोहोंचले. या साऱ्या भागांत हवा, पाणी आणि प्रकाशाप्रमाणें जमीन देखील देवाची मानली

होती. ग्रामदानात मिळालेल्या गावातील लोकांना भेटायला म्हणून विनोबा मुद्दाम इथे आले होते.

टागमुरुडाचा रस्ता फार च रमणीय होता. पाऊस पडला म्हणजे नद्या या भागाला बाहेरच्या जगापासून अलग करतात. आकाश ढगाळलेलें, मधून मधून पावसाची भुरभुर. त्यातून हा प्रदेश भृगराज व सारिकेच्या साम्राज्यातील आहे. आज साऱ्या रस्ताभर त्या दोघांच्या संगीताच्या कार्यक्रमामुळे आमचें मनोरंजन होत होतें. व्याघ्रराज आणि गजराजाची तर ही संचारभूमि. अमक्या तमक्याला वाघानें खाल्ल्याची बातमी रोज कानीं येत असते. या वाटेवर रानाच्या पानलामागून पावलें टाकीत जाण्यात च जीवनाची सुरक्षितता होती. त्यांच्यामधलें नी आपल्यामधलें अंतर वाढलें कीं शेजारच्या दाट झाडींतून एखादी स्वारी यायची आणि मग आपल्याला भगवान् पाणिनीचें स्मरण करीत तिच्या मुखात प्रवेश करण्यास तयार व्हावें लागायचें ! हत्तींचे कळप येऊन पिकाची नासधूस करतात म्हणून कित्येक गावें उजाड झालीं आहेत. सापाचे तर कितीतरी प्रकार. एका जातीचा साप पाच सहा फूट लांब असतो व माणसासारखा उभा राहतो असें म्हणतात.

'जाम गॉरे भूमिमालिक, रहिबे नाही, रहिबे नाही 'च्या गर्जना ऐकू येऊ लागल्या. सारे स्त्री पुरुष हातीं मंगलारति व सूत्रमाला घेऊन ओळीनें उभे होते. टोकाशीं एक व्यक्ति उभी होती. तिच्याजवळ संपत्ति, सत्ता, विद्या यापैकीं कसलें च बळ नव्हतें. आजच्या समाजरचनेंत 'अबला' म्हणविली जाणारी कनिष्ठ मध्यमवर्गातील अल्पशिक्षित विधवा होती ती पुढच्या हि प्रकारच्या नेतृत्वाची भिचा कीर्तीची स्वप्नात सुद्धा अभिलाषा बाळगणें शक्य नव्हतें तिला. रमादेवींच्या आश्रमात दोन वर्षे शिक्षण घेऊन जेव्हा ती प्रथम कोरापुटच्या जंगलात आली तेव्हा तिला वाघासापाच्या भीतीनें घराबाहेर पडण्याची देखील हिंमत होत नसे. आणि नदीला पाणी चढून गावाबाहेर जायचा रस्ता बंद झाला कीं रात्री रात्री रडून घालवल्या आहेत तिनें. जवळ जवळ नग्नावस्थेंत राहणारे काहीं आदिवासी स्त्री पुरुष पाहून प्रथम तिला इतका धक्का बसला कीं आल्या पावलीं च परत जायचा

विचार तिच्या मनात आला होता. पण इकडे येताना रमादेवींचा वात्सल्य-रसानें थबथबलेला हात तिच्या पाठीवरून फिरला होता. 'चांगलं काम कर' हा त्यांचा आशीर्वादात्मक आदेश तिला मिळाला होता. त्यामुळें इथून परत जाण्याचा विचार सतरादा मनात येऊन हि ती जाऊ शकली नव्हती. थोड्या आदेशानुसार ती सेवा करूं लागली. आम्हाला जवळ आलेले पाहतां च तिनें दुरून च बाप्पांना प्रणाम केला. 'ही कोण माहीत आहे तुला?' बाप्पांनीं मला विचारलें. 'मालती विशाल,' मीं म्हटलें. बाप्पा लगे च उद्गारले, "बस्. एवढें च! अग, हिच्या तपस्येमुळें आज बाबांना इथें यावें लागलें आहे. ह्या भागातील प्रत्येक ग्रामदानामागें हिची प्रेरणा आहे." रमादेवी आणि मालतीदेवींच्या अनेक वर्षांच्या तपस्येचीं गोड फळें निर्भयतेनें व निष्ठेनें काम करणाऱ्या भगिनीसेनेच्या रूपात पहायला मिळत आहेत. स्त्रीला आपल्या शक्तीचें भान होत नाहीं तोंवर च ती स्वतःला अबला समजते. अहिंसेचें सामर्थ्य परमाणु स्फोटकांत नाहीं. काळोखाच्या दाट्याकुट्ट राशी किती हि भयानक भासल्या तरी त्यांत सामर्थ्य नाहीं. प्रकाशाचा एक च किरण काळोखाचा नाश करण्यास समर्थ आहे. स्त्रीला आपल्यातील प्रकाशदायिनी अहिंसेच्या शक्तीची जाणीव होण्यास च तिच्या खऱ्या स्वातंत्र्याचा व समानतेचा उदय होणार आहे.

ऊन थोडेंसें लागलें आणि आकाशात मेघांची गर्दी जमूं लागली. प्रचंड वादळ, विजांचा कडकडाट. सृष्टीनें रौद्र रूप धारण केलें. गौतम धावत आला व माझ्या हातातलें पुस्तक घेऊन म्हणाला, 'चला निमाताई, व्हरांड्यावर जाऊं.' खोल दरींतून दाट झाडींतून वाहणारी जलधारा झंझावाताला ताल देत नृत्य करीत होती. आता मुसळधार पाऊस पडणार नी आपण चिंब भिजणार असें वाटत होतें. पण पाहता पाहतां रौद्रानें सौम्यांत रूपांतर झालें आणि मग एकदम सारें शांत शांत झालें. नाजुक आकाशी रंगांच्या पटांच्या पार्श्वभूमीवर अधिक च सुंदर दिसणारा पर्वतांना तेव्हां पाहवलं! जणू परमेश्वरानें आकाशाला शान्तिमय कान्तीनें प्रदीप्त व निखारलें होतें. हळू हळू आरक्तता लोपूं लागली. वर निरभ्र निळें आकाश व खालीं दाट निळ्या पर्वतांच्या रांगा. सारी सृष्टि शांतीनें

निळें निलय बनली. सायंकाळनीं संध्या नाचत निळ्या वर्णात शान्तिगीत लिहून गेली—

' द्यौः शान्तिः अन्तरिक्षं शान्तिः पृथिवी शान्तिः
विश्वेदेवाः शान्तिः सर्वं शान्तिः ब्रह्म शान्तिः
शान्तिरेव शान्तिः सा मा शान्तिरेधि । '

[ स्वर्ग, अंतरिक्ष आणि पृथ्वी शांतिमय आहेत. विश्वेदेवाः शान्तिमय आहेत. सर्व च शान्तिमय आहे. ब्रह्म शान्तिमय आहे. शांति म्हणजे शांति च. ती शांति मला प्राप्त होवो. ]



## भूदानाचें काम ही च आपली पूजा

कुद्रागुडा, विपमरटक
११, १२ जून १९५५

कालच्या च रमणीय रस्त्यानें परतायचे होतें. कालचे संध्येचें निळे शांतिगीत मनात घोळत होतें तों च इकडे उषेची आरक्त आनंद-अर्चना सुरू झाली. तेजाच्या लेखणीने उषा लिहू लागली, “ आनंद हें च ब्रह्म आहे. सर्व भूतें आनंदातून निर्माण झालीं, आनंदावर जगतात आणि अखेरीस आनंदात विलीन होतात. ”

आनन्दो ब्रह्मेति व्यजानात् । आनंदाद्ध्येव खल्विमानि
भूतानि जायन्ते । आनन्देन जातानि जीवन्ति ।
आनन्दं प्रयन्त्यभिसंविशन्तीति । '

आनंदाच्या अधिष्ठानावर निर्माण होणाऱ्या नव्या दिनाचा संदेश देत जगाला जागवणें हें प्राचीचें नित्याचें काम. पृथ्वीवर प्राचीचें प्रतिबिंब भरत-भूमीवर उमटतें. या च भूमींतून प्रतीची, उत्तरा, अधरा साऱ्यावर विचार-किरण कुसुमें उधळलीं जातात.

उषेच्या अशब्द आनंदार्चनेचें प्रतिबिंब बाबांच्या प्रार्थनाप्रवचनातील शब्दात उमटलें.

" भूतप्रियहितेहा धर्मोऽय सार्वर्णिकः । सर्व भूताचें हित आणि प्रिय करणें हा च सार्ववर्णिक धर्म आहे. या धर्माचा लोप झाला तर सर्व धर्मांचा, पथांचा, वर्गाचा नी आश्रमाचा लोप होईल. धर्माची एक सार्वभौम कसोटी ही आहे की तो सर्वांना प्रिय होतो. 'हृदयेन अभ्यनुज्ञात' त्याला हृदयाची अनुज्ञा ममति मिळते तो च खरा धर्म भूदान ग्रामदानाच्या कार्याला सर्वांच्या हृदयाची अनुज्ञा मिळालेली आढळते. तेव्हा हें काम लागलें तरी काहीं हरकत नाहीं. पूजा लागली तर भक्त कधीं कंटाळतो का? आमचें हें काम लवकर सपलें तर परमेश्वराचें दर्शन लवकर घडेल नी लवकर नाहीं सपलें तर त्याची च सेवा करण्याची सधि मिळेल याप्रमाणें ज्याला दोन्ही बाजूंना आनद च आनद आढळतो अशा माणसाला दु खाचा स्पर्श तरी कसा होणार? जेवण मिळालें तर द्वादशी नी नाहीं मिळालें तर एकादशी! या जगात स्त्री कार्यकर्त्यांनीं फार बहादुरीनें काम केलें आहे. आता तुम्ही च विचार करा कीं अबला म्हणवणाऱ्या स्त्रियामध्यें हें एवढें बळ आलें कुठून? तें धर्माचें बळ आहे. तें ज्याला लाभलें त्याला या जगात कधीं च कशाची हि उणीव भासणार नाहीं."

विषमकटकच्या प्रवचनात क्रान्ति, नवसमाज रचना आणि धर्मोत्थान याची कृति-सूत्रात गुफण करीत विनोबाजी म्हणाले, " या भागात नव्या च गावाचें ग्रामदान झालें आहे इथें एक सेवा निदान निर्माण व्हावें अशी माझी इच्छा आहे. त्याच्या द्वारें इथें ग्रामराज्याची स्थापना करण्याचें कार्य होऊ शकेल. पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं ज्या त्यागभावनेनें व धर्म-दृष्टीनें या लोकांनी ग्रामदान दिलें, त्याची ती त्यागभावना नी धर्मदृष्टि सतत वाढत राहील, या दृष्टीनें आमचें सारे काम झालें पाहिजे आपल्या खेड्याच्या सेवेकरता जीवन अर्पण करणारे ग्रामसेवक खेड्याखेड्यात निर्माण होतील तर च उत्थानाचें काम जोरात पुढ चालेल

" हा सारा भाग मागासलेला आहे. तेव्हा इथें शेती सुधार, पाटबंधा-ऱ्याची योजना, स्वच्छता, ग्रामोद्योग, नई तालीम, व्यसनमुक्ति वगैरे सारीं कामें करायचीं आहेत. देशभरच्या सर्व विधायक कार्यकर्त्यांना इथें येण्या विषयीं मी आवाहन करीत आहें. ग्रामोद्योग, नई तालीम वगैरे कार्ये म्हणजे

भूदानवाल्यांनाच एक प्रश्न आहे. म्हणून च मी म्हटलें आहे की आपल्याला भूदानमूलक, ग्रामोद्योगप्रधान, अहिंसक क्रांति करायची आहे. परंतु येथील लोकांची आध्यात्मिक श्रद्धा वाढण्यावर सर्वांत जास्त भर द्यायला हवा. त्याकरता इथें उत्तम सद्ग्रंथांचा खूप प्रचार करायला हवा. माझ्या समोर जे पुढचे चित्र आहे त्यात लोक रामायण गात गात आजाऱ्यांची शुश्रूषा करतील, हातीं झाडू घेऊन गांवसफाई करताना उपनिषदांच्या मंत्रांचे पठन करतील. याप्रमाणें कार्य चालेल तर इथें प्रभु रामचंद्राच्या वानरसेनेप्रमाणे एक सामर्थ्यशाली धर्मांची सेना निर्माण होईल. हनुमाना सारखे सेवक निघतील तर इथें नवें रामायण रचलें जाईल."



## समाजदेवो भव

चाटिकोना, भातपुर
१३, १४ जून '१९५५

आज उंच झाडाच्या शीतल छायेंत डोंगरावरून पडणाऱ्या धबधब्याच्या फेसाळ पाण्यात स्नान करताना वाटलें रोज त्याच त्या स्नानगृहात ऊन पाण्यानें स्नान करणाऱ्यांना या सुखाची कल्पना कोठून येणार? हवेंत किंचित् गारवा होता तरी देखील धबधब्याच्या थंडगार पाण्याचा स्पर्श सुखकर वाटला. आमचें रोजचें स्नानगृह म्हणजे कधीं दाट जंगलात एकान्त निर्जन स्थानीं वाहणारा निर्झर, तर कधीं काठावरील ताडामाडांचीं चित्रें आपल्या शांत पटलावर रेखाटणारा विस्तीर्ण जलाशय, कधीं संथ गंभीर वाहणारी गंगामातेची भगिनी तर कधीं लाटांवर झेलणारा सागर. मधून मधून झाडाच्या पायथ्याशी किंवा रस्त्याच्या स्नानगृहात अर्ध्यापाऊण बादलींत स्नान करण्याची वेळ आली तरी 'भिंती'च्या भल्या मोठ्या झरोक्यातून दिसणारीं भाताचीं हिरवींगार शेतें पाहून प्रसन्न वाटायचें. कित्येकदा तर वाट चालताना परमेश्वर माउलीच्या वात्सल्यानें जलाभिषेक करून आम्हाला न्हाऊ घालतो!

चाटिकोन्याला एक गुजराथी व्यापारी आंब्याची भेट घेऊन आले. विनोबा त्यांना हसत म्हणाले, "मला आंब्यापेक्षा ज्या मातीतून आंबे निर्माण होतात ती 'माती' अधिक गोड लागते." नंतर प्रवचनात याचा उल्लेख करून ते म्हणाले, "दानाचा जो प्रकार आजवर चालला त्याहून आमची कल्पना सर्वथा भिन्न आहे. आजवर लोक स्वतःला मालक समजत व गरिबांना यथाप्रसंग थोडीशी मदत देण्यात धर्माचें सार्थक समजत. पण मालकी सोडण्यात च खरा धर्म आहे. मालकी सोडणें म्हणजे च सर्वोत्तम दान, खरी दया. आजवर गृहस्थाश्रमी लोकांसमोर 'अतिथिदेवो भव' हा आदर्श होता. आता 'समाजदेवो भव' हा आदर्श ठेवायला हवा."

व्यापाऱ्यांना स्वधर्माची जाणीव करून देत विनोबा पुढे म्हणाले, "आपल्या शास्त्रांत म्हटलें आहे की वैश्याचा देखील एक धर्म आहे. आणि तो म्हणजे समाजाची सेवा करणे. परंतु आजकाल व्यापाराला धनार्जनाचें एक साधन मानतात. वास्तविक पाहता शेतकरी स्वामी आहे व व्यापारी सेवक आहे. तेव्हा सेवकाच्या जीवनाचा स्तर स्वामीच्या जीवनस्तरापेक्षा मुळीं च उच्च असता कामा नये. जो खरा व्यापारी असेल तो तर शेतकऱ्यापेक्षा अधिक अपरिग्रही असेल. व्यापाऱ्यांना मी हें सांगू इच्छितो की तुम्ही स्वतःकरता कमाई कराल तर आपल्या दोन च हातांनीं कमाई कराल पण या दोन हातांनीं समाजाची सेवा कराल तर समाज आपल्या हजार हातांनीं तुमची सेवा करील."

व्यापाराकरता दूरदूरच्या प्रांतांत जाणाऱ्या गुजराथी लोकांसमोर विनोबांनीं ईश्वरलाल व्यास यांचा आदर्श ठेवला. गांधीजींच्या प्रेरणेमुळें व्यासजी गुजरात सोडून सेवा करण्याकरता ओरिसांत आले व गेलीं पंचवीस वर्षे अत्यंत निष्ठेनें सेवा करीत ते येथील जनतेशीं अगदीं एकरूप होऊन गेले आहेत. विनोबा म्हणाले, "गांधीजींच्या गुजराथेंतून आलेल्या व्यापाऱ्यांनीं ईश्वरलाल व्यासांप्रमाणें अखंड सेवा करीत उत्कलच्या जनतेच्या हृदयांत स्थान मिळवलें पाहिजे."

व्यासजी म्हणजे निरहंकार सेवेची मूर्ति. त्यामुळें च आज सासष्टाव्या वर्षी देखील त्यांचें निष्कपट हास्य व उत्साही तारुण्य सरलें नाहीं. बाबा

त्याना ' बासट साल का जवान ' म्हणतात. वाटेत रोज बाबाच्या समोर काहीं वाटांवर फ़ंदील घेऊन चालणाऱ्या या 'नताजी'वर ( व्यासजी ) बाबा भलते च खुश आहेत. ते नेहमीं थट्टेत म्हणतात कीं ' या नेत्याकडे पाहिल्यावर एक्दम असा विश्वास निर्माण होतो कीं हा नीट रस्त्यावर नेईल.' व्यासजींच्या फ्लॅक्सो येरीसारख्या दिसणाऱ्या शरीराकडे पाहून बाबा त्याना ' गुब्गुबीत ', ' गोलमटोल ' वगैरे पदव्या हि बहाल करतात.

आजच्या प्रवचनात आम्हीं बाबाचें विवेचन ऐकलें कीं आंब्यापेक्षा मातीचें महत्त्व अधिक आहे आणि लगे च सध्याकाळीं बापी व नुमानीं भुवनेश्वरहून आणलेल्या आंब्यावर ताव मारला. या पोराचे जगतात हाल तर होत नसतील ना अशी त्याना काळजी वाटते. पण इकडे पोरांचें बाळसें वाढते च आहे.

भातपुरची वाट बाबाच्या राज्यातली पण अतर जास्त म्हणून आज अंधार असताना च चालायला सुरुवात केली. जीपने पुढे गेलेल्या काहीं लोकाना बाघोबाचें दर्शन झालें देतील. पण आमच्यावर काहीं त्याची कृपा-दृष्टि फिरेना. विनोबा व बाघोबा यांच्यात काहींतरी गुप्त करार झालेला दिसतोय ! सभोंवतालचे गुबगुबीत हिरवे डोंगर उदयगिरीची आठवण करून देत होते त्यातून नाप्पा व बापी असले म्हणजे तर काव्यशास्त्रविनोदाला भरतें येतें. तरी हि आज चुकल्याचुकल्यासारखें वाटत होतें कारण खोड्या करणारा गौतम सुट्टी संपल्यामुळें काल च वर्ध्याला परत गेला होता. गौतम बरोबर असला म्हणजे बाबासघला शिक्षक जागृत होत असे. वाटेत गणित, व्याकरण, काव्य, संस्कृत, वाऱ्या विषयावर हसतखेळत धडे मिळायचे. मोरोपंत तर बाबाना विशेष च प्रिय. बाबानीं आम्हाला रबरर झापण्याचा आदेश दिल्यामुळें रात्रीं मी जरा थोडा वेळ जास्त लिहू किंवा वाचू लागलें कीं गौतम बाबाच्या प्रतिनिधीचा आव आणून मला सतराद। हटकायचा, " निमाताई, आठ वाजून सदतीस मिनिटें झालीं आहेत ! "

आषाढ सुरू होऊन गेला होता. ग्रीष्माच्या दाहकतेनें तपलेली धरणी पावसाकडे डोळे लावून बसली होती. भातपुरला डोंगराच्या पायथ्याशी एका एकान्त स्थानीं नित्याप्रमाणें प्रार्थनासभा चालली होती. सारे वनवासी

विनोबांबरोबर एकाग्र चित्तानें परमेश्वराचें चिंतन करीत होते. एवढ्यांत वादळ सुरु झालें सोसाट्याचा वारा पावसाच्या आगमनाची सूचना देऊं लागला. पण कोणी हलल देखील नाहीं. प्रार्थना चालू च होती कडाडणाऱ्या विजेनें पुन्हा पावसाचा संदेश आणला आणि अखेरीस पावसाच्या रूपानें ईश्वराच्या करुणेचा वर्षाव सुरू झाला. तृषार्त धरणीचे प्रतिनिधि बनून विनोबांनीं वेदसूक्तें गाऊन त्या ' इंद्रलोकाहून आलेल्या अमृत वारि वर्षे 'चें स्वागत केलें.



## हिमालयाला आणि सागराला विचारा

बुधुनी, देवदळ, रायगडा,
१५, १६, १७ जून १९५५

महाराष्ट्रांतल्या एकनाथी भागवताप्रमाणें उत्कलमध्यें घरोघर जगन्नाथदास यांच्या भागवताचें पठन होतें. भागवतांतल्या वचनाचा आधार घेऊन विनोबा अपरिग्रहाचा धडा देतात—" भागवतांत म्हटलें आहे, संग्रह करणाऱ्या माणसाच्या मागें पधरा दोष लागतात. मी तुम्हाला हें च सांगू इच्छितों कीं चोरीप्रमाणेंच संग्रह देखील पाप आहे. चोरी करणाऱ्याच्या मागें दहा पधरा पोलीस लागतात तर संग्रह करणाऱ्याच्या मागें दहा पधरा दोष ! " भागवताबरोबर गीतेच्या तत्त्वज्ञानाचा हि धडा दिला आहे— " आपण देह नसून आत्मा आहोत. देह तर केवळ वरचा कपडा आहे. आपण चरख्याला तेल देतों पण चरखा हा तेल खाण्याकरता नसून सूत कातण्याकरता असतो. त्या च प्रमाणे खाऊं घातल्याशिवाय देह काम देऊं शकणार नाहीं म्हणून त्याला खाऊं घालायचें असतें. पण देह खाण्याकरता नसून सेवेकरता आहे." भागवत व गीतेबरोबर ईशावास्य उपनिषदाचें स्मरण झाल्याचून कसें राहील ? मग विनोबा उपनिषदाच्या भाषेंत बोलूं लागतात— " ऋषि म्हणतो, ' ईशावास्यमिदम् सर्वम् ' ( जगांत जें कांहीं जीवन आहे,

तें हें सर्व ईश्वराने वसविलेलें आहे.) आपल्याजवळ संपत्ति, बुद्धि, शक्ति जें कांहीं असेल तें सर्व ईश्वराची देणगी म्हणून आम्हाला मिळालेलें आहे. तें आपल्याजवळ आहे, पण आपण त्याचे मालक नाहीं. म्हणून त्या देणग्याचा उपयोग समाजाच्या सेवेकरता करणें हें आपलें कर्तव्य आहे.''

देवदळला एका नदीच्या कांठीं नवीन च तयार केलेल्या मातीच्या कुटींत बाबाचा निवास होता व आमच्याकरता पानाच्या तात्पुरत्या झोंपड्या होत्या. नदीच्या पलीकडे उंच डोंगर होता. या यात्रेंत रोजचें निवासस्थान इतकें आकर्षक असतें कीं रोज असें वाटतें कीं हें सोडूं नये. बाबा म्हणतात कीं, 'या यात्रेंत तुम्हाला चांगलें शिक्षण मिळतें. चांगलें घर मिळालें तरी आसक्ति वाटायला नको कीं वाईट मिळाल्याचें दुःख वाटायला नको. कसें हि घर असो, उद्या सोडायचें च आहे.'

उन्हाळा सरलेला असतो, पावसाळा सुरु व्हायचा असतो, अशा मधल्या तीन दिवसात उत्कलचे शेतकरी सारीं कामें बंद ठेवून उत्सव करतात व नंतर कामाला सुरुवात करतात. या सणाला इकडे 'संक्रान्ति' म्हणतात. त्यात लोक निरनिराळे खेळ खेळतात व गोडधोड करुन खातात. आज आमच्या यात्रीदलातले सर्व लोक संक्रान्तिनिमित्त नदीच्या वाळूत गेळले. मुख्य मंत्र्यापासून तों ड्रायव्हरपर्यंत सारे खेळाडू बनले होते. बापींकडे पाहून विचार आला कीं स्वराज्यातला मंत्री कसा असावा यासंबंधच्या गांधीजींच्या कल्पना त्याच्यात साकार झालेल्या आढळतात. आपण साधे आहोंत, सामान्य शेतकऱ्याच्या नी आपल्या जीवनात कांहीं फरक नाहीं, त्याची जाणीव देखील नाहीं. सध्या यात्रीदलात या प्रांताचे मुख्य मंत्री आहेत असें कुणा नवीन आलेल्या पाहुण्याला सांगितलें तर त्याचा त्यावर विश्वास च बसणार नाहीं. तो म्हणेल, ''इथें तर सर्वांचा वेष खेडवळ च दिसतो. पाणी भरणें, वाढणें, वगैरे सर्व कामें सारे च लोक करताना दिसतात. यातला कुणी हि मुख्य मंत्री असणें शक्य च नाहीं.'' मग जर त्या पाहुण्याला सांगितलें कीं, 'त्या समोरच्या झाडाखालीं बसलेल्या लोकामध्यें जो माणूस इतराना कांहीं तरी समजावून सांगतो आहे ना, ते च

आहेत मुख्य मंत्री !' यावर तो पाहुणा म्हणेल, 'अहो, अजून सर्वोदय समाज अस्तित्वात आलेला नाहीं, याचा तुम्हाला विसर पडलेला दिसतोय !'

रायगडला साखरेचा कारखाना आहे. वाटेंत उसाचीं शेतें लागलीं. त्यांतील बहुतेक कारखानदाराच्या च मालकीचीं आहेत. कारखान्यात काम करणारे मजूर शेजारच्या दारूच्या भट्टींतून दारू पितात व त्याच्या पगाराचा अर्ध्याहून अधिक हिस्सा पुन्हा मालकाकडे परत जातो. शोषणाचे अगदीं व्यवस्थित तंत्र आहे! उसाचीं शेते पाहून सुमा म्हणाल्या, "मला गुरुदेवांच्या एका गीताची आठवण होते. त्यात ते म्हणतात कीं वृक्ष आपलीं फळें जगाला देतो म्हणून तो जिवंत राहतो, पण ऊस सारा रस आपल्यात च साठवून ठेवतो म्हणून तो समूळ च उखडला जातो व शेवटीं त्याला चरकात जावे लागतें. संपत्तिदानाचें तत्त्वज्ञान सांगायला फार उपयुक्त उपमा आहे ही !"

'उत्तरेची सहा वर्षांची संघमित्रा नावाप्रमाणे च चुणचुणीत आहे. बाबांच्याजवळ मुलाखती, चर्चा वगैरेंची भाषा ती नेहमीं ऐकते. आज ती उत्तरेला गंभीरपणें म्हणाली, "मी कालपासून विनोबांना भेटण्याचा प्रयत्न करतें आहें पण माझी भेट च होत नाहीं. मला त्यांची मुलाखत घ्यायची आहे." हें ऐकून आमची हसता हसता पुरेवाट झाली पण ती तितक्या च गंभीरतेनें म्हणाली, "मला त्यांना म्हणायचें आहे कीं बडोद्यात जन्म घेऊन साऱ्या हिंदुस्थानभर हिंडता पण गुजरायेंत मात्र येत नाहीं." शेवटीं तिनें दामोदरभाईंना पत्र लिहून वेळ मागितला व संघमित्रा देसाईंना सकाळीं नऊचा वेळ मिळाला. जातांना ती म्हणाली, 'मला बाबांशीं अगदीं एकान्तात बोलायचें आहे. फक्त नोट्स् घ्यायला निर्मलाताईशी हवी तिथें.' मात्र ऐन मुलाखतीच्या वेळीं बाईसाहेब काहीं तोंड उघडू शकल्या नाहींत. ते हा मी च तिची प्रतिनिधि बनलें. बाबांनीं तिला अगदीं मोठ्या माणसा-सारखें उत्तर दिलें: "गुजरायेंत तर कितीतरी थोर सेवक आहेत. शिवाय तिथें घराघरात गांधीसाहित्य गेलें आहे. तेव्हा मला तिथें जायची काहीं आवश्यकता च नाहीं."

सध्याकाळच्या सभेंत सोसाट्याचा वारा सुटला होता. वादळाचीं चिन्हें दिसत होतीं. ग्रामदानातील गावाच्या वाटपाचा समारंभ चालू होता.

ग्रामवासी नागरिकाना कृतीनें क्रान्तीचा पाठ देत होते. ही क्रान्ति प्रथम हृदय-क्षेत्रात झाली होती. मग जीवनक्षेत्रात प्रकटली आणि आता समाजक्षेत्रात उमटत होती. एक सत्य विचार प्रेमानें समजावून सांगितला गेला आणि क्रान्तिचक्राला चालना मिळाली. त्यातून तें हृदयक्षेत्र असंख्य ऋषिमुनींच्या व साधुसंताच्या तपस्येमुळें सत्यविचार ग्रहण करण्यास समर्थ होतें च. विनोबाजी म्हणाले, " मी कांहीं तुम्हांला कोणती नवीन गोष्ट सांगत नाहीं. आपल्या साधुसंतांनीं वेळोवेळीं हें च सांगितलेलें आहे. मात्र मधल्या काळांत आपल्याला त्या शिकवणीचा विसर पडला होता. इंग्रज येण्यापूर्वी आपल्याकडे जमिनीची मालकी अस्तित्वात च नव्हती. खेड्यात शेतकरी, सुतार, शिक्षक सारे राहत. शेतकरी जमिनीची मशागत करीत. पण प्रत्येक शेतकरी आपल्या पिकाचा एक एक विशिष्ट भाग लोहार, सुतार, चाभार, गावचा शिक्षक या सर्वांना देत असे. सुताराच्या लायक प्रत्येक घरात जें कांहीं काम असेल, तें सुतार करी. कुणाचें किती काम केलें याचा तो हिशोब ठेवीत नसे, पैसा मागत नसे. वर्षाच्या अखेरीला त्याला पिकाचा त्याचा ठरलेला भाग मिळत च असे. म्हणजे यामागें अशी कल्पना होती कीं जमिनीवर सर्वांचा हक्क आहे व प्रत्येकानें आपापल्या स्वधर्मानुसार सर्वांची सेवा करावी. गावच्या बहुतेक सर्व गरजा गावात च पुऱ्या होत. पण पुढें इंग्रज आल्यानंतर ग्रामोद्योग नाहींसे होत गेले. त्यामुळें लोकाना कपडा, तेल, जोडे इत्यादि आवश्यक वस्तु विकत घेण्याकरता पैशाची गरज भासू लागली. त्यामुळें ते जमीन विकू लागले. होता होता जमीन सावकाराच्या व बड्या लोकांच्या घशात जाऊं लागली आणि जमिनीच्या मालकीची कल्पना रूढ झाली. पण मी तुम्हाला हें सांगू इच्छितों कीं जमीन ही खरेदी विक्री करण्याची वस्तु च नव्हे. जमिनीची खरेदी विक्री करणें हें पाप आहे. जमीन तर आपली आई आहे. आईची किंमत कुणी पैशात मोजतात का ? ती तर अमूल्य आहे. जमिनीचा मालक ईश्वर आहे. तेव्हा स्वत: मालक बनणें म्हणजे ईश्वराची जागा घेणें होय. तो फार मोठा अधर्म आहे "

नागरिकाना समाजाची व्याख्या सांगताना विनोबा म्हणाले, " जिथें व्यक्तीची मालकी अस्तित्वात आहे तिथें समाज निर्माण च होऊं शकत

नाहीं. मी तर समाजाची व्याख्या च अशी करतों कीं जिथे कोणी हि आपला व्यक्तिगत स्वार्थ राखत नाहीं, सारे मिळून आपला एक संघ बनवितात, तो समाज होय. व्यक्तीनें आपली सारी सेवा समाजाला समर्पण करावी व समाजाकडून व्यक्तीच्या स्वातंत्र्याला व विकासाला पुरेपूर संधि मिळावी. भारतीय लोकांच्या मनात प्राचीन काळापासून कांहीं कल्पना दडलेल्या आहेत. त्याला आपण 'धर्म' या नावानें ओळखतों. त्यांत फार मोठी शक्ति दडलेली आहे. त्यामुळें च तर भारतीय मनाला जमीन व संपत्तीचा मालक ईश्वर आहे हा विचार ग्रहण करायला वेळ लागत नाहीं.''

परदेशातील लोकांना प्रश्न पडतो कीं भारतातील लोक स्वेच्छेनें भूदान कसे देतात? ग्रामदान देऊन स्वामित्व विसर्जन कसें करतात? या प्रश्नाचें उत्तर हिमालय देत आहे. तो आकाश व पृथ्वी याना साधणारा सेतु आहे. त्याचे पाय धरणीवर नी मस्तक गगनात आहे. इकडे तो 'बहुजनहिताय, बहुजनसुखाय' अखंड करुणा-प्रवाह पाठवीत असतो नी तिकडे विश्वाच्या खेळापासून अलित, अनासक्त अशा अवस्थेंत सदैव राहतो. या प्रश्नाचें उत्तर ॐकाराची गंभीर गर्जना करणारा सागर देत आहे. इकडे तो म्हणतो कीं ऊर्मि मिथ्या आहेत, जीवन सत्य आहे, पण ऊर्मि जीवनाहून भिन्न नाहींत नी तिकडे त्याचें राष्ट्र हृदयें जोडण्याचें कार्य अखंड चाललेलें असतें.

# जीवनाचा जादूगार

जयपाल, गुमा, कुर्भी
१८, १९, २० जून १९५५

भारताच्या क्षितिजावर जीवनाच्या जादूगारानें पदार्पण केलें अन् असंख्यांचीं जीवनें उजळलीं गेलीं. त्याच्या जादूचा स्पर्श होता च स्वार्थाचें, भोगाच, वैभवाचें ज्यापलेलें जीवन क्षणात नाहींसें व्हायचें व त्यागाच्या, सेवेच्या, शाश्वत आनंदाच्या नव्या प्रकाशमय जीवनाला आरंभ व्हायचा. जीवरामभाई हे त्या असंख्यांतील एक होते. भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर व्यापार करीत वैभवात वाढलेल्या जीवरामभाईंच्या जीवनाला महात्म्याच्या जादूचा स्पर्श झाला मात्र अन् त्यो च काळचा शोषक आज सेवक बनला. बापू नेहमीं म्हणत कीं भारतात सेवा करण्यालायक जर कोणता प्रांत असेल तर तो ओरिसा हा आहे. कारण तिथें अपार दारिद्र्य नी दुःख आहे. महात्म्याच्या आज्ञा अपेक्षाच्या लाटावर आपली जीवन नौका सोडून दिल्यानंतर जीवरामभाईंना एका लाटेनें पूर्वकिनाऱ्यावर आणून सोडलें. ओरिसांत बालेश्वर जिल्ह्यातील भद्रक या गावीं त्यांनीं एक आश्रम स्थापला, आपली लाखो रुपयांची संपत्ति जनसेवेला वाहिली आणि ते 'ओडिया' बनून ओरिसाच्या सेवेंत तन्मय झाले. ईश्वरलाल व्यास हे त्यांच्या च प्रेरणा-परिवारातले. १९ जून ही त्यांची पुण्यतिथि ओरिसाचे लोक मोठ्या श्रद्धेनें साजरी करतात. त्यानिमित्त आमच्या यात्रेंत दुपारीं सूतकताई व प्रार्थनेचा खास कार्यक्रम झाला. संध्याकाळच्या प्रवचनात विनोबा म्हणाले, "गांधीजींच्या ट्रस्टीशिपच्या कल्पनेचें साकार रूप जीवरामभाईंच्या जीवनात दृष्टीस पडतें. त्यांनीं केवळ आपली संपत्ति च जनसेवेला वाहिली नाहीं तर तन, मन, प्राण देखील वाहिले. आपल्याला स्वराज्य मिळालें तें एका धार्मिक साधनानें मिळालें. स्वराज्यानंतर देशात पुण्य वासनेचा उदय झाला. त्या च मुळें मला असा विश्वास वाटतो कीं भूदानाप्रमाणें च संपत्तिदानाची चळवळ देखील खूप जोर करील. माझा तर असा अनुभव आहे कीं हिंदुस्थानातल्या लोकांना त्यागाचा विचार ऐकून आनंद होतो, परोपकार करण्यानें त्यांच्या हृदयाला समाधान वाटतें."

हिरवीगार सृष्टि, उंच उंच पहाड, झुळझुळ वाहणारे झरे नी खळखळ करणाऱ्या नद्या, या सर्वांचा सुखद सहवास घडत होता व बाबा अंत सौंदर्य-निर्मितीचा धडा गिरवीत होते. इतरांवर नेहमी टीका करणाऱ्या एका कार्य-कर्त्याला ते म्हणाले, "सर्वत्र परमेश्वर पहायला शिका. सारी त्याची लीला आहे. अमुक माणसाचा अमुक दोष आहे असें म्हणण्यापेक्षा, सारी त्रिगुणा-त्मक लीला चालली आहे. आणि अमुक दोष म्हणजे रजोगुणाचा किंवा तमोगुणाचा परिणाम आहे असें म्हणावें. वाणीनें वाईट उच्चार कधीं करू नये. तोंड शिवून टाकायला शिका. दुसऱ्याचे दोष पाहणें, त्याच्यावर टीका करणें वगैरे करून उगीच आपल्या शक्तीचा क्षय करू नका. त्यातून लेखणीनें तर अशा गोष्टी मुळीं च लिहू नयेत कारण त्यायोगें त्या वज्रलेप होतात व मग मरतानां असल्या च गोष्टी आठवतात."

जपाखाल हें स्थान म्हणजे बाबांच्या भाषेंत 'जणू काय एखाद्या ऋषीच्या आश्रमाकरतां मुद्दाम तयार केलेलें स्थान' होतें. एका उंच टेकडीवरच्या झोपडींत आमचा निवास होता. सध्याकाळच्या प्रार्थनासभेचें दृश्य तर अद्भुत च होतें. आकाशाचें छत व डोंगराच्या भिंती! एक विशाल प्रार्थनामंदिर तयार झालें होतें! ईश्वरानें डोंगराच्या भिंतीवर हिरव्या रंगात तऱ्हेतऱ्हेचीं चित्रें चितारलीं होतीं. नदीचें गोड गुंजन ऐकू येत होतें व वनवासीयांच्या मध्यें एका उंच आसनावर बाबा ध्यानस्थ बसले होते!

सध्याकाळीं इतका जोरदार पाऊस आला कीं जणू आकाश च कोसळलें! आमच्या पानांच्या झोपड्यांत न गळणारी अशी फूटभर देखील जागा मिळणें मुश्किल झालें. सभोंवतालचे सारे नद्यानाले अगदीं तुडुंब भरून वाहू लागले. चहूंकडे पाणी च पाणी. बाबा म्हणाले, "पाऊस जितक्या वेगानें पडेल तितक्या च वेगानें दान वर्षा देखील व्हायला पाहिजे." जणू इशारावर बाबांचा दूत झाला! आज च बातमी आली कीं बालेश्वर जिल्ह्यांत ७३ व मयूरभंज जिल्ह्यात २२ गावात ग्रामदान झालें. कोरापूट जिल्ह्यातील ग्रामदानाची संख्या तर सारखी वाढते च आहे. ओरिसात ग्रामदानात मिळालेल्या गावांची संख्या २३२ झाली आहे.

---

## अमेरिकन वार्ताहराशीं चर्चा

मुटली, कुटिंगा, लक्ष्मीपूर
२१, २२, २३ जून १९५५

मुटलीच्या वाटेवर एका गावचे लोक ढोलकी व वाजे वाजवीत स्वागताला उभे होते. विनोबा थांबले व एका माणसाच्या पाठीवर हात ठेवीत त्यांनी विचारलें, "ग्रामदान देणार का? हवा, पाणी आणि प्रकाश प्रमाणें जमीन देखील परमेश्वराची च देणगी आहे. माणूस मूठभर माती देखील निर्माण करू शकत नाहीं. तो स्वतः च तर मातींतून निर्माण होतो व अखेरीस मातींत मिसळून जातो." गावकरी म्हणाले कीं, "आम्ही सारे मिळून यावर विचार करू व मग आमचा निर्णय तुम्हाला कळवू." प्रार्थनासभेच्या वेळेला त्यांनीं आपला ग्रामदान देण्याचा निर्णय जाहीर केला.

'महात्मा गांधी की जय!' विनोबांना पाहतां च मुटलीच्या लोकांनीं आनंदानें जयघोष केला. ग्रामदानाचें तत्त्व समजावून सांगितल्यावर विनोबांनीं त्या लोकांना विचारलें, "काय पसंत पडतो का हा विचार?" लोकांनीं तत्काळ उत्तर दिलें, "हो हो!" नंतर विनोबांनीं विचारलें कीं गावचा नाईक कुठे आहे? तर कळलें कीं नाईक आजारी असल्यामुळें स्वागताला येऊ शकला नाहीं. "बरें, नाइकाला माझा नमस्कार कळवा नी माझी समग्र ग्रामदानाची मागणी देखील त्याच्यासमोर ठेवा." असें म्हणून विनोबा आपल्या निवासस्थानाकडे निघून गेले. नंतर सभेच्या वेळीं गावकऱ्यांनीं त्यांना सांगितलें कीं, "आम्हीं सर्वांनीं नाइकाबरोबर चर्चा केली. आम्हाला तुमचा विचार पटला. आम्ही सर्वजण आपली सारी जमीन देवाला अर्पण करीत आहोंत!"

बाडुंगला नुकती च आशियातील राष्ट्रांची परिषद झाली होती. तिथून आलेले एक अमेरिकन वार्ताहर– होमर जॅक– कांहीं दिवस भारतात राहून अमेरिकेला परतणार होते. गेल्या दोन दिवसापासून ते आमच्या यात्रेंत आहेत नी असल्या अद्‌भुत घटना पाहून फार च प्रभावित झाले आहेत. त्यांनीं विनोबांना विचारलेले प्रश्न फार उद्‌बोधक होते. चर्चा चांगली च

रगली. त्याचा पहिला प्रश्न असा होता कीं, "भूदानाची चळवळ ही मुख्यतः भारताकरतां च आहे कीं आशियातील इतर राष्ट्रांचे प्रश्न सोडविण्यात देखील तिचा उपयोग होऊ शकतो?"

विनोबा—भूदानयज्ञ ही एक नैतिक चळवळ आहे. त्यात खास भारतीय असें कांहीं नाहीं. त्याकरता नुसतें एक तत्र पुरेसें नसून मानवाच्या हृदयावर श्रद्धा असणे आवश्यक आहे. वर्गाच्या रूपानें समाजाचे तुकडे करणे सर्वथा अयोग्य आहे. प्रत्येक माणूस ही एक व्यक्ति आहे, ईश्वराची प्रतिमा आहे, अशी भावना हृदयात बाळगून कुणाकडे हि जाल व प्रेमानें त्याला दरिद्रनारायणाचा हिस्सा मागाल तर तो दिल्यावाचून राहणार नाहीं. प्रभु येशूनें म्हटलें च आहे ना कीं 'जरा दारावर थाप मारा कीं तुम्हाला हवें तें मिळेल.' मात्र ती थाप मारण्याची क्रिया अंत.करणातील प्रेमामुळें व्हायला हवी. भारतीय परंपरेमुळें या चळवळीला इथें विशेष च जोर चढला असेल हें शक्य आहे पण तरी हि मानवहृदय तर सर्वत्र समान च आहे.

प्रश्न—पाश्चात्य धर्मांमध्यें आज जो exclusiveness (एकांडेपणा) दिसतो तो नाहींसा होऊन ते धर्म अधिक सहिष्णु कसे बनतील?

विनोबा—पूर्वेकडच्या धर्मांमध्यें फार मोठी सहिष्णुता आहे असें कांहीं म्हणता येणार नाहीं. मात्र भारतीय संस्कृतीच्या बाबत बोलायचें झाल्यास मी असें म्हणेन कीं ती संस्कृति exclusiveness (एकांडेपणा) च्या दोषापासून मुक्त आहे. कुठल्या हि एका विशिष्ट व्यक्तीशीं निगडित न होणें हें च भारतीय संस्कृतीचें वैशिष्ट्य आहे असें मी मानतों. इस्लाम धर्म म्हणतो कीं महंमद हा अखेरचा 'प्रेषित' आहे, तर ख्रिस्ती धर्म येशू ख्रिस्ताच्या व्यक्तित्वावर उभारला गेला आहे. परंतु अशा रीतीनें विशिष्ट व्यक्तींना महत्त्व देण्यामुळें एक प्रकारच्या भिंती निर्माण होतात. तेव्हा नेहमीं व्यक्तींना बाजूला ठेवून तटस्थपणें विचार केला पाहिजे.

प्रश्न—गांधीवादातील सर्वांत मोठी उणीव (weakness) कोणती?

विनोबा—इंग्रजांनीं साऱ्या हिंदुस्थानला नि शस्त्र केलें होतें. त्यामुळें तशा स्थितींत नि.शस्त्र प्रतिकाराची आवश्यकता निर्माण झाली होती.

परंतु गांधीजींना त्या तऱ्हेचा प्रतिकार हवा होता तसा काही होऊ शकला नाही. लोकांची त्यांच्यावर श्रद्धा होती आणि म्हणून लोक त्यांच्यामागे गेले. पण लोकांची ती अहिंसा शूराची अहिंसा नसून दुबळ्याची अहिंसा होती.

*प्रश्न*— *जागतिक शांतता प्रस्थापित करण्याच्या बाबत भारतानें स्वीकार-लेल्या सध्याच्या धोरणाबद्दल आपले काय मत आहे?*

विनोबाजी – भारत हा शांतिवादी देश आहे. शांतिवादी तर भाग्यवान च असतात पण शांतीची इच्छा करणारे देखील भाग्यवान च आहेत. जगात सर्वत्र शांतता प्रस्थापित व्हावी अशी भारताची इच्छा आहे. पण जोंवर तो पाकिस्तान – हिंदुस्थान यात निर्माण होणारे प्रश्न शांततेच्या मार्गानें सोडवू शकत नाही तोवर त्याच्यात जागतिक शांतता प्रस्थापित करण्यास लागणारी नैतिक शक्ति निर्माण होऊ शकणार नाही. पण मीं भूदान-यज्ञावर श्रद्धा ठेवली आहे. मला असें वाटतें कीं भूदानाचें काम योग्य रीतीनें चालत राहिलें तर येथील जनतेच्या मनात अहिंसेविषयीं पूर्ण श्रद्धा निर्माण होईल. भूमिसमस्येसारखा कठीण प्रश्न अहिंसेनें सोडविला गेल्यास जनतेत आन्तरिक शक्ति निर्माण होईल. म्हणून च मीं पुरी व महापूरच्या प्रवचनात म्हटलें होतें कीं ' जो भूदान देतो तो विश्व शांतीच्या बाजूनें मतदान करतो. '

प्रश्न—कोणत्या अर्थानें आपण गांधीजींचें काम पुढें चालवीत आहात असें आपल्याला वाटतें ?

विनोबा— मी कोणाचें काम पुढें चालवीत आहें असें मला वाटत नाही. मात्र स्वराज्यानंतर ओघाने च भूदानाचें काम पुढे येते व गांधीजी असते तर त्यांनीं हा च प्रश्न हातीं घेतला असता असें मला वाटते. भूमि-समस्या सोडविण्यापेक्षा ती सोडविण्याच्या पद्धतीला मी अधिक महत्त्व देतों. आणि पद्धतीच्या बाबतींत बोलायचें झाल्यास मला असें वाटतें कीं गांधीजींच्या तत्त्वज्ञानाचें जें सार आहे ते अमलात आणण्याचा च प्रयत्न मी करीत आहें.

चर्चा संपत आली. विनोबांनी प्रश्नाच्या कागदाकडे दृष्टि वळवली. त्यातला अखेरचा प्रश्न असा होता कीं "गांधीजींच्या मृत्यूची बातमी ऐकल्यावर पहिल्या च क्षणाला तुमच्या मनात कोणते विचार आले ?"

विनोबा खोल आवाजात म्हणाले, "माझ्या मनात हा च विचार आला. गांधींजी गेले च नाहींत. आज या क्षणाला देखील माझ्या मनात तो च विचार कायम आहे कीं गांधीजी जिवंत आहेत. सज्जन कधीं मरत च नाहींत व दुर्जन कधीं जगत च नाहींत. फक्त कल्पनेच्या जगात च दुर्जनाचें अस्तित्व असतें."

इकडे वाणी आत्म्याच्या अमरतेचें तत्त्वज्ञान बोलत होती तर तिकडे पाण्याने डबडबलेल्या डोळ्यांतून भक्त-हृदयाचे दर्शन घडत होतें. कांहीं क्षण अगदी शांति. मग विनोबांनीं अमेरिकन बंधूकडे पाहत स्मित करीत म्हटलें, "तुम्ही इथें आलात हें फार चागलें झालें." अमेरिकन वार्ताहरानें नमस्कार करीत म्हटलें, "तुमच्याशीं झालेली मुलाखत ही माझ्या भारता च्या च नव्हे तर साऱ्या आशियाच्या यात्रेंतील सर्वांत महत्त्वाची घटना आहे."

लक्ष्मीपूरच्या सभेंत बाबांनीं खूप गमत केली. गावच्या छोट्या मुलांना आपल्याजवळ बसवून घेतलें व त्यांना सूतकताईचा अभिनय करून दाखवला. मग एका मुलाला तें च करायला सांगितलें, तर त्यानें अगदीं हुबेहूब तस्साच अभिनय केला. नंतर बाबा म्हणाले, "हीं सारीं छोटीं मुलें सूत कातून आपला कपडा तयार करू शकतात. आमच्या आश्रमात एका चार वर्षांच्या मुलानें त्याला वर्षभर लागणाऱ्या कपड्याला पुरेल इतकें सूत कातलें. आज खेड्यात कांहीं मुलांच्या अंगावर चांगले कपडे दिसतात तर कांहींच्या अंगावर फाटके कपडे. पण सगळीं मुलें सूत कातनील तर सर्वांच्या अंगावर चांगले कपडे दिसतील."

गेले कित्येक दिवस बाघोबाच्या साम्राज्यात हिंडून हि त्याचें दर्शन न झाल्यामुळें आम्हीं सारे जरा रुष्ट झालो होतों. शेवटीं लक्ष्मीपूरला रात्रीं बाबा झोंपल्यानंतर आम्हीं कांहीं मंडळी जीपनें वाघ पहायला निघालों. जिथें तो हटकून भेटेल अशी अपेक्षा होती तिथें न भेटल्यामुळें आज

निराश होऊन परतावें लागणार असें वाटूं लागलें. परंतु परतताना एक वळण ओलांडून जीप पुढें जाऊं लागता च कुणीतरी आनदानें ओरडले, 'तो पहा वाघ!' सर्वांचे डोळे एका च दिशेकडे वळले. रस्त्याच्या कडेला वाघोबा आरामात बसले होते. त्या वेळीं आमची जीप त्याच्यापासून पधरा वीस फुटावर असेल. पण आमच्यापैकीं काहीं आनदानें ओरडले व तो आवाज ऐकून वाघ शेजारच्या झाडींत निघून गेला. थोड्या वेळानें दुसऱ्या ठिकाणीं दुसरा वाघ भेटला. दिव्याच्या उजेडात त्याचे चमकणारे डोळे मोठे मजेदार दिसत होते. मला आमच्या घरच्या नेरी कुत्रीची आठवण झाली. तिचें भव्य नी भयानक रूप पाहून आल्यागेल्याला तिची भलती च भीति वाटते. आता कधीं घरीं गेलें कीं 'चवे, तुझ्या भावाला भेटून आलें मी' असें तिला सागता येईल. 'दर्शन' झाल्यामुळें आपली ट्रिप सफल झाल्याच्या आनदात आम्ही निवासस्थानीं परतलों!



## आजचे स्थितप्रज्ञ अधिक उंच आहेत

डुमरीपदर, माकरीगुमा, अविली अवगुडा
२४, २५, २६ जून १९५५

" जिथें कोणी उच्च नाहीं कीं कोणी नीच नाहीं, सारे भाऊ भाऊ, सारे परमेश्वराचे सेवक, सारे मिळून श्रम करतील, मिळून खातील नी मिळून ज्ञानार्जन करतील असा समाज बनवायचा आहे आपल्याला. याला च 'साम्ययोग' म्हणतात. चला, माझ्याबरोबर म्हणा सारे जण 'साम्ययोग की जय!'... जनतेनें आनदानें गर्जना केली— 'साम्ययोग की जय!'

सर्वसेवासघाच्या कार्यकारिणींतील काहीं प्रमुख व्यक्ति सध्या बाबाना भेटायला म्हणून आल्या आहेत. त्यांच्या निमित्तानें खूप ज्ञानचर्चा ऐकायला मिळते. अविली अवगुडाला जाताना सिद्धराज दढ्ढानीं बाबाना प्रश्न विचारला कीं, " तुम्हीं गीता प्रवचनात म्हटलें आहे कीं समाजाचा उत्तरोत्तर

विकास होत असतो. पण उत्क्रान्तीच्या एका सिद्धान्तात तर असें म्हटलें आहे कीं विकासाची गति चक्राकार असते."

बाबा—" पुढच्या पिढीला मागच्या सर्व पिढ्यांचे ज्ञान फुकटांत च मिळते. जरी प्रत्येक व्यक्तीच्या जीवनात उत्तरोत्तर विकास दिसला नाहीं तरी सर्व समाजाच्या दृष्टीनें विचार करता असें आढळून येतें कीं समाजाची पातळी उत्तरोत्तर उंच उठते आहे. उदाहरणादाखल महाभारतांतली च गोष्ट घ्या. त्या काळात धर्मराजासारखे महापुरुष देखील आपल्या पत्नीला एखाद्या जड वस्तूप्रमाणे जुगारात पणास लावीत. आणि जेव्हा द्रौपदीनें भर सभेंत प्रश्न विचारला कीं पतीला असे करण्याचा अधिकार आहे का तर 'भीष्म द्रोण विदुर भये विस्मित'— भीष्मद्रोणासारखे, महाज्ञानी देखील त्याचें उत्तर देऊं शकले नाहींत. त्याच्यासमोर धर्मसंकट उभें राहिलें. पण या काळचें पोर देखील चटदिन म्हणेल कीं, 'त्यांत एवढें धर्मसंकट उभें राहायचें कारण तरी काय? स्त्री ही काहीं जड वस्तु नाहीं. त्या पणाला लावल्या जाऊं शकत नाहींत.'

" त्या काळात मोठमोठे लोक दुसऱ्याच्या बायकाना पळवून नेत. त्यावर युद्धें होत. आजच्या काळात एका राष्ट्राच्या प्रधानमंत्र्यानें दुसऱ्या राष्ट्राच्या प्रधानमंत्र्याची बायको पळवून नेली नी त्यामुळें दोन राष्ट्रांत युद्ध झालें असें आपण कधीं ऐकतों का? तसें च कुणाच्या दोन बायका असल्या अन् त्याला त्याबद्दल विचारलें तर बिचारा खालीं मान घालून म्हणतो, 'त्याच असं झालं कीं परिस्थिती च अशी निर्माण झाली...' वगैरे वगैरे. म्हणजे एकाहून अधिक बायका असणें हें आज प्रतिष्ठेचें नव्हे तर अप्रतिष्ठेचें लक्षण मानलें जातें. म्हणजे प्राचीन काळाच्या मानानें आज समाजात बरेंच कामनियमन झालेलें आहे. आता अर्थनियमन करायचें आहे. यापुढें शेकडों एकर जमीन बाळगणें हें प्रतिष्ठेचें नव्हे तर अप्रतिष्ठेचें लक्षण होईल. पुढच्या पिढ्या म्हणतील, 'काय त्या काळात एकेका माणसाजवळ हजारों एकर जमीन होती?' आज आपण नाहीं का म्हणत, 'काय पूर्वीच्या राजांच्या शेकडों राण्या होत्या! भलते च मागासलेले लोक बुवा ते!' आजवर लोक असें समजत कीं अपरिग्रह वगैरे खास सन्याशाकरतां च आहे. पण आतां

आपल्याला अपरिग्रहाच्या आधारावर नवी समाजरचना निर्माण करायची आहे. शेवटी समाजाचा स्तर मापला जातो तो त्यातील थोर व्यक्तींवरून च. तेव्हा आम्ही हें निश्चितपणे म्हणू शकतों कीं प्राचीन काळच्या स्थितप्रज्ञापेक्षा आजचे स्थितप्रज्ञ हे अधिक उच्च आहेत."

---

## पावसाचें तांडव

कोटागुडा, डोंगरी
२७, २८ जून १९५५

क्रान्तिपथ आक्रमिण्यास उत्सुक असलेले पथिक रोज घनदाट जंगलातून पाण्यापावसाचा मार खात विनोबाची अमृतवाणी ऐकण्यास्तव येत असतात. कोटागुडाच्या प्रार्थनासभेचें दृश्य तर अद्‌भुत च होतें. ईश्वराचा आशीर्वाद घेऊन येणाऱ्या असंख्य जलबिंदूमुळें आकाश पुलकित होत होतें नी इकडे नवविचाराच्या तुषारानीं हृदयाकाश अभिमंत्रित होत होत. वृद्ध, तरुण व बालकांच्या रूपानें भूत, भवत् आणि भविष्यत् तिन्ही काळाचे प्रतिनिधी कालातीत विचारांचें श्रवण करीत होते. विनोबा बोलत होते, "पावसाला भेद माहीत नाहीत. गरीबाचें शेत असो कीं श्रीमंताचें, तो दोहोंना भिजवील. त्या च प्रमाणें परमेश्वराच्या कृपेचा हि सर्वांवर समान वर्षाव होत असतो. याचा अर्थ असा कीं सर्वांनीं प्रेमानें भाऊ भाऊ या नात्यानें रहावें अशी देवाची च इच्छा आहे. मालकीच्या कल्पना बाळगणें म्हणजे त्याच्या इच्छेविरुद्ध वर्तन करणें होय. पूर्वी इंग्रज देखील म्हणत असत कीं आम्ही हिंदुस्थानचे मालक आहोंत. पण अखेरीस त्याना मालकी सोडून इथून निघून जावें लागले राजेमहाराजे व जमीनदार याना देखील आपली मालकी सोडावी लागली. हें सर्व घडलें ते हा परमेश्वराला आनंद झाला. आता आपण हि सारे आपापली लहान मोठी मालकी सोडून देऊन परमेश्वराचे भक्त बनू या."

कोटागुडाला दिवसभर पावसाचें उल्हास नृत्य चालले होतें. पण रात्र होता च बाबा म्हणाले, "आता तांडव सुरू झालें आहे!" सोसाट्याचा

वारा वाहत होता व मुसळधार पाऊस आमच्या पानाच्या झोपडीचें छप्पर कोसळत असल्याचा सारखा भास होत होता. पाणी गळत होतें च. ब्लँकेट पांघरून झोपायचा प्रयत्न केला पण शांत झोंप लागणें शक्य नव्हतें पहाटे तीनची उठावणी घंटा झाली. झोपडीबाहेर पडल्यास वारा पाऊस कुठें पर्यंत याचा नेम नव्हता. पण नित्यक्रमाप्रमाणें प्रार्थना झाली व साडे-पाचच्या सुमारास आमची यात्रा सुरू झाली. वाऱ्याची गति थोडी देखील कमी झाली नव्हती. वाऱ्याचा सारा प्रयत्न आम्हाला आकाशात उडवून लावण्याचा चालला होता आणि त्याच्या जोडीला पाऊस होता. पण धरतीमातेनें आपल्या बाळांना पोटाशीं घट्ट धरून ठेवलें. त्यामुळें वाऱ्या-पावसाच्या प्रयत्नांना यश आलें नाहीं व आमचीं पावलें जमिनीवर च पुढें पुढें पडत गेलीं. बाबांनीं हसत विचारलं, " आनंद आहे कीं तक्लीफ ? " फडफड उडणारे कपडे सावरीत आम्हीं म्हटलें—" आनंद !"



## तर मग वाऱ्याला फांशी द्या

कोरापुट, देवदळ
२९, ३० जून १९५५

कोरापुट हें तीन हजार फुटावर वसलेलें या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. आम्हीं वाऱ्यापावसाशीं झुंजत ओल्याचिंब कपड्यांनीं कोरापुट शहरात प्रवेश केला. स्वागतार्थ आलेल्या पांढरे कपडे घातलेल्या नागरिकांना हि आमच्या आनंदाची चुणूक अनायास मिळाली कोरापुट जिल्ह्यावर वरुण राजाची विशेष च कृपा असते. पण बाबा म्हणतात कीं, ' पाऊस, ऊन, थंडी, हे सारे आपले दोस्त आहेत, दुश्मन् नव्हेत !' सध्या बाबांच्या यादीत एक दोस्त आमच्यावर मैत्रीचा अगदीं अक्षरशः वर्षाव करीत आहे. चार चार सहा सहा दिवस सतत पावसाची झड लागलेली असते. त्यामुळें स्वतंत्र आघोळ करण्याची आवश्यकता च नसते कपडे वाळणें शक्य नसतें. दोन ओल्या कपड्यांचे गट्ठे बांधून पुढच्या पडावावर न्यायचे व तेथेही कपडे

वाळवण्याचा प्रयत्न करीत कसें तरी निभावून न्यायचें हा आमचा कार्यक्रम बनला आहे. अशा वेळीं मधून च कधीं तरी सूर्यनारायणाचें दर्शन झालें म्हणजे अक्षरशः नारायणाचें दर्शन घडल्यागत वाटतें.

कोरापुट जिल्ह्यातल्या ग्रामदानाच्या गावांची संख्या आता पावणे दोनशेंवर पोहोचली आहे. या ग्रामदानानीं बाबाच्या पायाला खीळ घातली. ओरिसाच्या नेत्यानीं पूर्वी यात्रेचा असा कार्यक्रम आखला होता कीं फार पाऊस सुरु होण्यापूर्वी च म्हणजे जुलैच्या दुसऱ्या आठवड्यात बाबा कारापुट जिल्ह्यातून बाहेर पडून कमी पावसाच्या भागात जाऊ शकतील. पण बाबानीं आज जाहीर केलें कीं मी सारा पावसाळाभर या च जिल्ह्यात हिंडणार ! कवि दुलारायलजींनीं म्हटलें च आहे.

'हिम आतप वर्षा भी जिसके बढते पैर न रोक सकी।
हरि का काज बिना साधे उस संतको कहाँ विश्राम ॥'

थंडी, ऊन, पाऊस कोणी हि त्याच्या सतत पुढें चालणाऱ्या चरणाना अडवू शकत नाहीं. देवाचें काम पूर्ण झाल्याशिवाय तो संत विसावा घेणार नाहीं.

कोरापुटच्या सभेंत वर्षेच्या अभिषेकपात्राखालीं उभे राहून विनोबा खूप खुलून बोलू लागले. "सरकार जमीन हिरावून घेऊं शकेल पण परस्परप्रेम नाहीं निर्माण करूं शकणार. आम्ही तर जमीन मागतों नी त्या च बरोबर बैलजोड्या, बीं बियाणें, नांगर इत्यादिकांचें हि दान मागतों. पण सरकार कायदा करून जमिनींसोबत बैलजोड्या हि मागू शकेल का ? उलट सरकार कायद्यानें जमीन घेतें तर त्याच्या बदल्यात त्याना जमीनवाल्याना भरपाई (compensation) द्यावी लागते. बिहारच्या पूर्णिया जिल्ह्यातून मला नुकतें च श्री. वैधनाथप्रसाद चौधरी यांचें पत्र आलें. त्यात त्यानीं आपले वाटपाचे अनुभव कळवले आहेत. ते वाटपाच्या सभेंत सर्व उपस्थित लोकाना विचारतात कीं, 'गरिबाना जमीन तर मिळाली पण त्यासोबत बैलजोडी नको का द्यायला ?' नी मग लोक जेवढ्या बैलजोड्याची आवश्यकता असेल तेवढ्याचें दान लगे च देऊन टाकतात. तेव्हा भूदानयज्ञाचें कार्य हें हृदयें जोडण्याचें, हृदयशुद्धीचें, धर्म प्रतिष्ठापनेचें कार्य आहे, हें लक्षात घ्या.

"तुमच्याजवळ जमीन, संपत्ति, बुद्धि, श्रमशक्ति, यिंवा यांपैकीं जे काही असेल त्याचा एक हिस्सा समाजाला अर्पण करा. अशा तऱ्हेने दानाची परंपरा सतत चालत राहिली तर देश सुखी झाल्याखेरीज राहणार नाहीं. तुम्ही बाबाची ही मागणी कबूल तर करून पहा अन् मग जर तरी हि देश सुखी झाला नाहीं तर बाबाला फाशीं द्या."

आजकाल लोक दिवसभर सभेची वाट पाहत पावसात तासन्तास शांत बसलेले दिसतात आदिवासी लोक उन्हापावसापासून बचाव करण्याकरता बांबूच्या इंटत् व पानाच्या ढाली वापरतात पण पावसाचें तांडव सुरू झालें की, हीं सारीं साधनें अगदीं बकाम ठरतात. देवदळची प्रार्थना सभा देखील मुसळधार पावसात झाली काठीचा आधार घेऊन जगलाची वाट चालत आलेल्या म्हाताऱ्याना व आईच्या मांडीवर शांतपणे झोपलेल्या बाळाना देखील पावसाचा पर्वा वाटत नव्हती. विनोबा त्याचें कौतुक करीत म्हणाले, "वरून पाऊस कोसळतो आहे अन् तरी हि आया मुलाना पोटाशीं धरून शांत बसल्या आहेत मुलाच्या गालावर पाण्याचे थेंब पडताहेत अन् तरी हि तीं शांत च आहेत. ही सामान्य घटना नव्हे अशा लोकाना जंगली म्हणणें सर्वथा चूक आहे. जें काम मोठमोठे ज्ञानी देखील करू शकत नाहींत, तें काम भक्त करू शकतात. परमेश्वरानें तुम्हाला भक्तिप्रेम दिलें आहे. तुम्ही रोज वाघा सापाशीं सामना देता, काट्याच्या वाटेनें चालता, तुम्हाला थंडी-उन्हाची भीति नाहीं की पावसाची पर्वा नाहीं, असे बहादुर लोक आहात तुम्ही! त्यामुळे तुम्ही ग्रामदानाचा पराक्रम अवश्य कराल अशी मला खात्री वाटते"

या युगाचा सर्वांत क्रांतिकारी विचार म्हणजे भूमि व संपत्तीच्या स्वामित्वाचें विसर्जन हा आहे. कायद्याच्या किंवा सक्तीच्या आधारावर करता यायला स्वामित्व विसर्जन ही काहीं एखादी बाह्य किंवा कृत्रिम प्रक्रिया नाहीं हे अनुभवानें च सिद्ध झालें आहे. आजवर झालेल्या अशा सर्व बाह्य प्रयत्नांची परिणति मानवहृदयाला हवा असलेल्या नव्या समाजाच्या निर्मितींत झाली नाहीं. स्वामित्व विसर्जन ही एक आंतरिक प्रक्रिया आहे.

जगाचा स्वामी ईश्वर आहे याचें जेव्हा माणसाला भान होतें तेव्हा त्याच्या हृदयात वास करणाऱ्या स्वामित्व भावनेचें आपोआप विसर्जन होऊन जातें. या प्रक्रियेनें हृदयक्षेत्रात होणारी क्रांति च शाश्वत काळपर्यंत टिकू शकते. ग्रामदानाच्या रूपानें इथें भूदानचळवळीच्या सर्वोच स्थितीचें दर्शन घडू लागलें आहे व सर्वोदयसमाजाच्या स्थापनेकरता भरभक्कम पाया तयार होत आहे. आता त्यावर ग्राममंदिर निर्माण करावयाचें आहे

समग्र ग्रामदानात प्राप्त झालेल्या गावासमोर विनोबानीं एक पंचसूत्री कार्यक्रम ठेवला आहे. (१) पहिलें सूत्र असं आहे कीं जमिनीचा मालक ईश्वर. ईश्वरातर्फे गाव हा जमिनीचा ट्रस्टी म्हणून राहील. कायद्यात व्यक्तीची मालकी न मानता साऱ्या गावाची मानली जाईल प्रत्येक कुटुंबातील किती माणसें आहेत तें पाहून साधारणत माणशीं एक एकर या हिशोबानं सर्व कुटुंबाना शेती करण्याकरता म्हणून जमीन दिली जाईल दर पाच किंवा दहा वर्षांनीं कुटुंबातील माणसाची संख्या कमी अधिक झाली असेल त्याप्रमाणें पुन पुन्हा पुनर्वितरण होईल. काहीं जमीन सामूहिक शेतीच्या प्रयोगाकरता म्हणून राखली जाईल त्यातील उत्पन्नाचा विनियोग सरकारचा सारा भरण्यात आणि गावाच्या विकासाच्या कामात केला जाईल गावकरी आपल्या इच्छेनुसार सारी शेती सामूहिक सुद्धा करू शकतील निरनिराळे प्रयोग करण्यास ते पूर्णपणें स्वतन्त्र राहतील. आज फक्त सोयीच्या दृष्टीनें म्हणून प्रत्येक कुटुंबात जमीन वाटली जाईल परंतु सर्व परस्परास मदत करतील. एखाद्याच्या शेतात काहीं मोठें काम निघालें तर सगळे गावकरी त्याला मदत करतील. प्रत्येक जण आपल्या उत्पन्नाचा एक भाग गावाच्या कामाकरिता म्हणून सतत देत राहील. एखाद्यावर काहीं अचानक आपत्ति कोसळली किंवा त्याचें पीक बुडालें तर त्याला त्यातून मदत दिली जाईल. कुणी कुणाला कर्ज देणार नाहीं कीं कुणाचें घेणार नाहीं. सारं एका च विशाल कुटुंबाचें घटक म्हणून काम करतील

(२) ग्रामोद्योगाच्या द्वारें गावाला स्वावलंबी करण्याचे व पैशाच्या मायेतून मुक्त होण्याचे प्रयत्न केले जातील सर्वांत आधीं सारे गावकरी मिळून असें ठरवतील कीं कापूस पेरण्यापासून तों कपडा विणण्यापर्यंतच्या

सार्‍या क्रिया गावात च होतील. ह्यायोगें अनेकाना काम मिळू शकेल. गावची लक्ष्मी गावात च राहील. नतर या च प्रमाणे इतर हि गरजाची पूर्ति गावात च करण्याच्या योजना आखल्या जातील. गावात खाजगी दुकान राहणार नाहीं, सहकारी दुकान राहील. बाहेरच्या वस्तूची खरेदी व गावात गरजेहून अधिक निर्माण झालेल्या वस्तूची बाहेरच्या बाजारात विक्री इत्यादि कामें त्या दुकानामार्फत होतील. समजा या वर्षी सहकारी दुकानात इतक्या रुपयाचें बाहेरून आलेलें तेल खपलें तर मग सारे गाववाले मिळून ठरवतील कीं आता पुढल्या वर्षी तितकें तेल गावात च काढायचें.

( ३ ) गावच्या सर्व मुलाना समान शिक्षण दिलें जाईल. सर्वांना शिक्षित करण्याच्या दृष्टीनें विनोबानी 'एक तासी शाळे'ची योजना माडली आहे. गावचा जो शिक्षक असेल तो रोज सकाळीं एक तास मुलाना शिकवील, सध्याकाळचा एक तासभर प्रौढाना शिकवील व दिवसभर आपला उद्योग करील. विनोबा म्हणतात, भारताच्या शिक्षणपद्धतीचीं दोन अगें म्हणजे उद्योग आणि ब्रह्मविद्या. त्याच्या योगानें शरीर, मन, बुद्धि या सर्वांचाच उत्तम विकास होईल. रोज सध्याकाळीं सारे गावकरी एकत्र जमून गीता, रामायण वगैरे उत्तम धर्मग्रथाचें पठन करतील व गावाच्या विकासासबधीं चर्चा वगैरे करतील. देवाचें नाव घेऊन ते मद्यपान, धूम्रपान इत्यादि व्यसनापासून मुक्त होण्याचा हि निर्णय घेतील. आज ज्याना कर्ज आहे त्याच्या सावकाराना कर्जाच्या रकमेचें किंवा कमींत कमी व्याजाच्या रकमेचें तरी दान देऊन त्याना कर्जमुक्त करण्याविषयीं विनति केली जाईल. यापुढें पैशाची गरज पडल्यास सारे गाववाले मिळून सरकारकडून किंवा एखाद्या सस्थेकडून कर्ज घेतील. कोणी हि व्यक्तिश कर्ज घेणार नाहीं. गावात होणारे सारे विवाह गावाच्या वतीनें साजरे केले जातील. त्यात प्रत्येक जण थोडी थोडी मदत करील. तेव्हा विवाहाकरता कर्ज काढण्याचा प्रश्न च उरणार नाहीं.

( ४ ) सामाजिक क्षेत्रातून जातिभेद, स्पृश्यास्पृश्यता, स्त्री पुरुषभेद वगैरे भेदाचें उच्चाटन होईल. प्रत्येक माणूस हा परमेश्वराचा पुत्र आहे व म्हणून त्याला समान अधिकार आहेत असें मानलें जाईल. सर्व उद्योगाची आर्थिक, सामाजिक व आध्यात्मिक प्रतिष्ठा समान राहील. विनोबा म्हणतात

की भूमातेची सेवा केल्याशिवाय मानवजीवनाला पूर्णता येऊ शकत नाहीं. त्यामुळे आमच्या आदर्श समाजरचनेंत प्रत्येक माणूस दिवसातून एखाद दुसरा तास तरी शेतात काम करील व बाकीच्या वेळात आपले इतर उद्योग करील. गावांतील लोहार, सुतार, विणकर वगैरे प्रत्येक घरात जेवढें काम असेल तेवढें करतील, त्याचा हिशाब ठेवणार नाहींत, व प्रत्येक शेतकरी आपल्या उत्पन्नाचा एक निश्चित हिस्सा वर्षाच्या अखेरीस त्याच्या घरात नेऊन पोहोंचता करील. आपली पूर्वीची ग्रामरचना याच प्रकारची होती. अशा रीतीनें 'वसुधैव कुटुंबकम्' चा आरंभ ग्राम-कुटुंबापासून होईल.

(५) ग्रामनिर्माणकार्याचा मुख्य आधार जनशक्ति हा आहे असें विनोबाजी नेहमीं सांगत असतात. ते गावकऱ्यांना म्हणतात कीं, 'तुमचा उद्धार तुम्हाला च करायचा आहे.' सारे मिळून खेड्याचें एक कुटुंब बनवतील तर त्यायोगें त्यांची आंतरिक शक्ती हि वाढेल व त्यांना बाहेरची मदत हि सुलभतेने मिळू शकेल. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे अशा गावावर ईश्वराची कृपा होईल. आज खेड्यात प्रत्येकजण आपापल्यापुरतें च पाहतो पण ग्रामदानानंतर प्रत्येकजण साऱ्या गावाच्या दृष्टीनें विचार करील.

समग्र ग्रामदानामुळें गावाची भौतिक व नैतिक दोन्ही प्रकारची उन्नति होईल. धान्य, दूध, लोणी, फळें, भाज्या खूप वाढतील, उद्योग वाढतील नी गाव समृद्ध होईल. पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं त्यामुळे मानव जीवनाच्या अंतिम उद्दिष्टाकडे सर्वांचे लक्ष्य वेचलें जाऊ शकेल. 'भूमि व संपत्तीचा स्वामी परमेश्वर हा आहे, आम्ही सारे भूमिपुत्र आहोत' या तत्त्वाला साकार रूप देणाऱ्या ग्रामवासीयांनीं ममतेच्या विसर्जनाच्या दिशेनें एक पाऊल टाकलें च आहे. आता ते अहंतेच्या विसर्जनाची मनीषा बाळगून स्वतःला विश्वरूप, समाजरूप परमेश्वरात लीन करण्याचा प्रयत्न करतील. हातीं सेवेचें काम, हृदयात सर्वत्र हरि दर्शनाची अभिलाषा व बुद्धीला विश्वाचें कोडें उकलण्याची तीव्र लालसा बाळगून सतत पुढें पुढें च जात राहण्याचा सुपथ आता गवसला आहे!



# शक्तीचें अधिष्ठान

जयपूर
१ जुलै १९५५

कोरापूटहून दीड हजार फुटांची उतरण उतरीत जयपूरला जायचा मार्ग होता. खालचे नागमोडी रस्ते, हिरवीं शेतें, लाल मातीचीं मैदानें, छोटया छोटया झोपडया हे सारें दृश्य वरून फार च रमणीय भासत होतें. बाबा म्हणाले, "बघा, उंचावर उभें राहिल्यामुळें सारें जग कसं सुंदर वाटतें तें ! या च प्रमाणें जीवनातून वर उठून जीवनाकडे पहायला शिका" जयपूर हें या भागातलें सर्वांत मोठें शहर, पूर्वीच्या एका संस्थानाची राजधानी शहरातल्या इमारतींवर त्याची छाप दिसत होती.

सध्याकाळीं जंगी सभा झाली. नागरिक अत्यंत शांततेनें व एकाग्रतेने नवविचारांचें श्रवण करीत होते "आपण एका महान् देशाचे नागरिक आहोंत त्यामुळें आपली जबाबदारी नी कर्तव्य देखील तितकें च महान् आहे. हिमालयापासून सागरापर्यंत पसरलेला हा एक देश केवळ अर्वाचीन काळात एक बनला असें नाहीं. आमची एकराष्ट्रीयता ही प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. ती स्वयंभू आहे, कृत्रिम, नकली किंवा उपाधिजन्य नाहीं. युरोपातील लहान लहान देशांत आपापसांत ज्या लढाया झाल्या त्यांना 'राष्ट्रीय युद्ध' (National wars) म्हटलें जातें. याउलट युरोपसारख्या च खण्डप्राय असलेल्या भारतात ज्या लढाया झाल्या त्यांना गृहयुद्ध (Civil wars) म्हटलें जातें. याचा अर्थ असा कीं युरोपमध्यें आमच्यासारखें विशाल हृदय आढळत नाहीं, व तो च आमचा फार मोठा वारसा आहे. भारताचें आणखी एक वैशिष्टय हें आहे कीं भारताने आपल्या दहा हजार वर्षांच्या इतिहासात, अगदीं उत्कर्षाच्या काळात देखील, कधीं हि दुसऱ्या देशावर आक्रमण केलें नाहीं. ही जी व्यापकता, बुद्धीची विशालता किंवा अहिंसा म्हणू या, आहे, तिच्या च मुळें भारतदेश महान् बनला आहे.

"ज्या क्षेत्रात स्वाभाविकरीत्या त्याग व तपस्या करण्याची सिद्धि मिळू शकते तिथें च शक्तीचें अधिष्ठान असतें. म्हणून स्वराज्य मिळाल्या-

नतर शर्त्तीचें अधिष्ठान* राजकारण हे नसून सामाजिक व आर्थिक क्षेत्र हे आहे आज सामाजिक व आर्थिक स्वतंत्रता मिळवण्याच्या कार्यात च शक्ति दडलेली आहे. गांधीजींनीं देशाला भीति सोडण्याचा धडा शिकवला. आता भूदानाद्वारें लोभ सोडण्याचा धडा मिळत आहे. आपण निर्भय तर झालों. आता निर्लोभी व्हायचें आहे. काम, क्रोध आणि लोभ हे नरकाचे फार मोठे दरवाजे आहेत असें गीतेंत सागितलें आहे. पण माणसाचा सर्वांत मोठा शत्रु लोभ आहे. माणूस किती हि क्रोधी झाला तरी वाघाहून अधिक क्रोधी होऊ शकणार नाहीं नी किती हि कामी बनला तरी चकवाक पक्ष्याहून अधिक कामी कांहीं बनणार नाहीं पण माणसाच्या लोभाला मात्र सीमा नसते. ज्या देशातील तरुणासमोर त्याग व तपस्येचा कार्यक्रम असतो त्याच्यासारखे भाग्यवान् कोणी नाहीं. भूदान-यज्ञातून एक यज्ञपुरुष निर्माण झाला आहे. तो साऱ्या देशाला सागत आहे कीं आपली जमीन व सपत्ति याचा सहावा हिस्सा दान द्या."

सभा आटोपल्यावर येथील कॉलेजचे शिक्षक व विद्यार्थी विनोबाना भेटायला आले. त्यानीं कांहीं शका माडल्या. पहिली च शका अशी होती कीं, "तुम्ही म्हणता कीं शासनमुक्त समाजाची स्थापना हें आमचें अंतिम उद्दिष्ट आहे. पण इथें तर सरकार तुमच्या कार्यांत मदत करीत आहे. हा असा विरोधाभास का ?"

विनोबा— आपलें अंतिम उद्दिष्ट मोक्ष किंवा देहमुक्ति हें आहे असें मानलें जाते. परतु ती देहमुक्ति या च देहाच्या आधारें मिळवायची असते कुऱ्हाडीचा दाडा गोत्यास काळ म्हणतात च ना! लाकडाचा च दाडा आणि कुऱ्हाडीनें झाडाचें लाकूड च तोडायचें! त्या च प्रमाणें चागल्या सरकारनें अशी च इच्छा करावी कीं सरकार च नाहींसें होवो व जनता आपल्या पायावर उभी राहो. म्हणून सरकार भूदानाच्या कामात मदत करील तर ती मदत घेण्यास कांहीं च हरकत नाहीं. पण आमच्या जवळ कुऱ्हाड नसती आणि नुसता च दाडा असता तर मात्र आमचें काम सफल होऊ शकलें नसतें. पण आमच्याजवळ वगळी च कुऱ्हाड देखील आहे. ही चळवळ कार्यकर्त्यांच्या तपस्येच्या आधारावर फोफावत आहे.

आज हिंदुस्थानात भूदानाचे शेंकडों कार्यकर्ते घरदार सोडून खेडयापाडयात हिंडत आहेत. तेव्हा अशा परिस्थितींत सरकार जर थोडी फार मदत करूं इच्छितें तर आम्हीं ती मदत का घेऊ नये ? ''

## दैव आणि प्रयत्न

रेंडापल्ली, बोरीगुम्मा, कमारा
२, ३, ४ जुलै १९५५

कोरापूट जिल्हा एखाद्या अजगरासारखा अजस्र पसरला आहे. त्यात जगलें, डोंगर, नद्या, मैदानें सारें कांहीं आहे त्याच्या पश्चिमेला मध्य प्रदेशाचा बस्तरचा विभाग व दक्षिणेला आंध्रचा श्रीकाकुलम् जिल्हा आहे. युरोपातलें एखादें लहान राष्ट्र याच्या पोटात सहज सामावलें जाईल. यात रामपुर ते विजयानगरमला जाणारा एकुलता एक रेल्वे मार्ग आहे. ओरिसाच्या कटक, पुरी वगैरे इतर भागातून इकडे यायचें म्हणजे आंध्रातल्या विजयानगरमला जायचें व तिथून मोटरनें शेंदीडशें मैल जगलातल्या रस्त्याने यायचें. त्यातून हे तर पावसाळ्याचे दिवस. तेव्हा बाहेरून विनोबाना भेटायला येणाऱ्याला हि त्याच्या तपस्येचा थोडा प्रसाद मिळतो च. या आठवड्यात बडया पाहुण्याच्या भेटींचा योग दिसतो आहे. सुप्रसिद्ध समाजवादी पुढारी श्री. अशोक मेहता व बिहारमधील रामगढचे राजेसाहेब विनोबाना भेटायला आले अशोक मेहताशीं चार तासपर्यंत अनेक विषयावर चर्चा झाली.

भूदान चळवळीची प्रक्रिया समजावून सागताना विनोबा नेहमीं म्हणतात कीं, '' लोकाना बहुधा हा च प्रश्न पडतो कीं आधीं बड्या जमीनदाराकडून नी श्रीमताकडून दान कसें मिळवायचें? पण आमची प्रक्रिया त्याहून अगदीं च भिन्न आहे. आम्हीं प्रथम गरिबाना दान मागतों. गरीब लोक हजारोंच्या सख्येनें दान देऊ लागले कीं एक नैतिक हवा तयार होते व मग श्रीमतावर त्याचा प्रभाव पडतो नी ते आपणहून दान द्यायला येतात.'' बिहार यात्रेत

अगदीं असे च घडलें. '१९५२ च्या १४ सप्टेंबरला बिहारात प्रवेश केल्या-नंतर पहिले चार महिनेपर्यंत रोजच्या सभेत छोट्या दानांची एक भली मोठी यादी ऐकायला मिळायची. याप्रमाणे पांच सहा महिने सतत गरिबांच्या दानाचा वर्षाव झाल्यानंतर मग चांडिलच्या सर्वोदय संमेलनाच्या सुमारास एक दिवस एक गृहस्थ विनोबांना भेटायला आले. विनोबांना नमस्कार करीत त्यांनीं एक कागद समोर टेकला. विनोबांनीं तो कागद हातीं घेऊन पाहिला. एक लाख एकर जमिनीचें दानपत्र होतें तें! गरिबांनीं भूदानयज्ञात आपल्या काळजाचे तुकडे अर्पण करून निर्माण केलेल्या पायाच्या आकडयावर आता बडे जमीनदार आपापलीं शून्यें चढवू लागले! विनोबा त्या गृहस्थांना म्हणाले, "तुमची तुमची जमीन मिळाल्यानें माझें समाधान होऊ शकत नाहीं. तुमचें हृदय देतील हें आहे मला." कत्तलींच्या मार्गानें जमीन हिरावून नेता येईल पण हिरावण्याकरता हृदय कदाचित् अस्तित्वात च राहणार नाहीं. कायद्याच्या मार्गानें जमीन मिळेल पण हृदयें दुरावतील, दुखावतील. करुणेच्या मार्गानें मात्र नुसती जमीन च नव्हे तर हृदय देतील हिरावून नेता येतें.

ते गृहस्थ रामगढचे राजेसाहेब होते. त्यांनीं विनोबांची मागणी मान्य करून भूदान कार्यात हृदय अर्पण करण्याचा निश्चय केला व आपल्या कुटुंबीया-कडून तीन लाख एकरांचें दान आणलें व इतर जमीनदार मित्रांना हि या कामाकडे वळवलें. शून्याकाचीं दानपत्रें विनोबांना अर्पण करणें हा त्यांचा तेव्हापासून एक नित्यक्रम च झाला होता. बिहारमधील रकाच्या राजे-साहेबांचें एक लाख दोन हजारांचें व पालकोटच्या लालसाहेबांचें पंचेचाळीस हजारांचें दान विनोबांच्या भाषेत 'पूर्ण दान' ठरलें. त्यात उत्तम जमिनीचा सहावा हिस्सा व सर्व पडित जमिनींच दान होतें. बिहारमध्यें एकूण तीन लाखाहून अधिक लोकांनीं तेवीस लाख एकरांचें दान दिलें. "हृदयपरि-वर्तन, जीवनपरिवर्तन, समाजपरिवर्तन ही क्रांतीची त्रिविध प्रक्रिया आहे. क्रांति हिंसेनें किंवा कायद्यानें होत नाहीं, तर विचारानें होते." विनोबा सूत्रें लिहितात व जनता त्यावर आपल्या जीवनाची भाष्यें रचते!

राजेसाहेबांनीं जीवनाच्या अनेक प्रश्नांविषयीं चर्चा केली. त्यांनीं देव व

पुनर्जन्माविषयीं विचारलेल्या एका प्रश्नाचें बाबांनीं विस्तृत विवेचन करीत उत्तर दिलें. ते म्हणाले, "शेतकरी एक खुंटा गाडतात व त्याला एक दोरी बांधून ती दोरी बैलाच्या गळ्यात अडकवतात. मग बैल त्या दोरीच्या लांबीनुसार कमीअधिक क्षेत्रात गोल गोल हिंडून चारा खातो. त्या च प्रमाणे परमेश्वरानें आमच्या गळ्यात एक दोरी बांधून आम्हाला एका खुंट्याला बांधलें आहे. एकाच्या गळ्यातली दोरी पाच फूट लांब असेल तर दुसऱ्याच्या गळ्यातली दहा फूट असेल. जर माझ्या गळ्यातली दोरी दहा फूट लांबीची असेल, तर मी बारा फूट जाऊ शकणार नाहीं. ती माझी मर्यादा आहे. पण त्या दहा फुटाच्या वर्तुळात मात्र मी कोणत्या हि दिशेनें किती हि हिंडू शकतो. म्हणजे परमेश्वरानें आपल्याला कांहीं स्वतंत्रता दिली आहे व कांहीं मर्यादा ठेवल्या आहेत. त्यानें आपल्याला मुळीं च स्वतंत्रता दिली नसती तर आपल्याला आपल्या कर्माचें फळ चाखता आलें नसतें. पण आपला हा नित्याचा च अनुभव आहे कीं आपल्याला आपल्या बऱ्यावाइट कर्मांचीं फळें चाखावीं लागतात.

"तेव्हां आता प्रत्येकानें आपापल्या दृष्टीने विचार करावा कीं माझ्या गळ्यातल्या दोरीची लांबी किती आहे. प्रत्येक माणूस जर गामा पहेलवान किंवा राष्ट्रपति होण्याची इच्छा करील तर तसें होऊं शकणार नाहीं. पण कोणी हि जर स्थितप्रज्ञ होण्याची इच्छा करील तर तो स्थितप्रज्ञ होऊ शकेल. स्वतःचें हृदय शुद्ध करून स्थितप्रज्ञ होण्याला व ईश्वराचें दर्शन घेऊन मुक्त होण्याला लागणारी शक्ति प्रत्येक माणसात दडलेली आहे. आपल्या दोरीच्या लांबीच्या बाहेर जाणं हें कांहीं आपल्याला शक्य नाहीं पण दोरी च कापून टाकणें हें मात्र शक्य आहे. हृदयातील सर्व वासनांचा समूळ छेद करून टाकल्यास माणूस ईश्वरात लीन होउन ईश्वराइतका च स्वतंत्र बनू शकतो.

"दोरीच्या लांबीविषयीं विचार करीत असताना पूर्वजन्माविषयीं विचार करावा लागतो. तुमच्या पूर्वकर्मामुळें तुम्हाला या जन्मात गाढवाचा जन्म मिळाला नाहीं नी दुसऱ्या कुणाला तरी त्याच्या पूर्वकर्मांमुळें गाढवाचा जन्म मिळाला. ते हा पूर्वकर्मानुसार माणसाला नवें शरीर प्राप्त होतें. पण शरीर प्राप्त होता च पूर्वकर्म समाप्त होऊन जातें. नंतर या जन्मात काय

करायचें तें आपल्या पुरुषार्थावर अवलंबून असतें. इथें आपण जें कर्म करूं त्यानुसार आपल्याला पुढचा जन्म मिळेल. हा जन्म घेताना आपण जें भांडवल घेऊन येतो तें वाढवणें किंवा कमी करणें आपल्या हातीं असतें.

" ईश्वरानें घातलेली मर्यादा ओळखण्याचें साधन हे च कीं आपण ती मर्यादा तोडूं शकत नाहीं. गाढवानें किती हि प्रयत्न केला तरी तो घोडा बनूं शकत नाहीं. पण तेवढ्या मर्यादेच्या आत मात्र तो चांगलीं किंवा वाईट कर्में करूं शकतो. मनुष्य जेव्हा आपल्या अहंकाराची व ममतेची दोरी कापून टाकतो तेव्हा मग तो परमेश्वराच्या हातातील साधन बनतो. पण तोंवर तो स्वतःच्या च प्रेरणेनें भलींबुरीं कर्में करीत असतो.

" आपण ह्या जन्मांत जीं कर्में करूं त्याचें फळ पुढच्या जन्मांत अवश्य मिळेल. पण कांहीं पापपुण्यें इतकीं उत्कट असतात कीं त्यांचीं फळें या च जन्मात भोगायला मिळतात. ' अत्युत्कटैः पापपुण्यैः इहैव फलमश्नुते । ' जिथें कर्म व कर्मफल यामध्यें कार्यकारणसंबंध दाखवता येतो तिथें तें या च जन्मींच्या कर्माचें फल आहे असें समजावें व जिथें कार्यकारणसंबंध दाखवता येत नाहीं तिथें तें पूर्वजन्मींच्या कर्माचें फल आहे असें समजावें. एका मुसलमानाशीं चर्चा करताना मीं म्हटलें कीं एक जीव जन्माला येतो नी लागली च एक मिनिटानें मरून जातो तर काय तो ' रोजेकयामत ' ( अखेरचा निवाड्याचा दिवस ) पर्यंत वाट च पाहत राहील का ? आणि आपल्या एक मिनिटाच्या जीवनात त्यानें असें काय पापपुण्य केलेलें असणार कीं त्याचा निवाडा त्या अखेरच्या दिवशीं होणार ? तेव्हा याप्रमाणें विचार करीत असताना आपल्याला हें मान्य करावें लागतें कीं तो जीव आपल्या पूर्वकर्मांमुळें एक मिनिटात मरून गेला. एकदा पूर्वजन्म मानला कीं मग पुनर्जन्म हि मानावा च लागतो कारण ती एक साखळी च आहे.

" आज विज्ञानाला देखील याविषयीं अधुकसें दर्शन होऊं लागलें आहे. पूर्वजन्म पुनर्जन्म मानल्यावाचून मनुष्यजन्माची साखळी तयार च होऊं शकणार नाहीं यात मला तिळमात्र हि शंका नाहीं. याचा अर्थ असा नाहीं कीं आपण दैववादी बनावें. मी तर असें म्हणतों कीं ज्याला आपण ' दैव '

म्हणतों तो आपला कालचा प्रयत्न आहे, जी त्याला आपण 'प्रयत्न' म्हणतों ते उद्याचें 'दैव' आहे.

"माणसाला आपल्या पूर्वकर्मानुसार देह प्राप्त होतो व आईवडील देखील प्राप्त होतात. माणूस आपली पत्नी या जन्मात निवडू शकतो पण आईवडील नाहीं निवडू शकत. तेव्हा ज्या ठिकाणीं अशी निवड करण्याचें स्वातंत्र्य नसते ती पूर्वजन्मींची बाब आहे व जिथे निवड करण्याचें स्वातंत्र्य असतें ती या जन्मीची बाब आहे असें समजावें. माणसाला आपापल्या वासनेनुसार नवा जन्म मिळतो. समजा, एक सुंदर व विद्वान् जोडपें आहे. त्याच्या दोन मुलांपैकीं एक सुंदर आणि ढ आहे तर दुसरा कुरूप व विद्वान् आहे. याचा अर्थ असा कीं एक जीव असा होता कीं त्याला सौंदर्याची तहान होती. त्यामुळे त्यानें आपल्या आईवडिलांकडून नेमकें सौंदर्य च तेवढें घेतलें. याउलट दुसरा जीव असा होता कीं त्याला ज्ञानाची तृष्णा होती. त्यामुळें त्यानें आपल्या आईवडिलांकडून ज्ञान च निवडून घेतलें. आई-वडिलांजवळ तर दोन्हीही गोष्टी होत्या. पण प्रत्येकानें आपापल्या वासनेनुसार हवें तें निवडून घेतलें. एका च शेतात ज्वारी व भुईमूग दोन्ही पेरल्यास ज्वारीचा दाणा जमिनींतून कार्बो हाईड्रेट्स् शोषून घेतो तर भुई-मुगाचा दाणा त्या च जमिनींतून चरबी (फॅट) शोषून घेतो. जमिनींत तर दोन्हींही होतीं पण प्रत्येकानें आपल्याला हवें तें शोषून घेतलें. आमच्या आश्रमात विणाई शिकायला म्हणून दोन मुलें आलीं होतीं. आश्रमात प्रार्थना, गीतापाठ वगैरे कार्यक्रम हि चालत. त्यातल्या एकानें आश्रम सोडल्यानंतर विणाईचें काम चालू ठेवलें पण प्रार्थना करणे सोडून दिलें, तर दुसऱ्यानें प्रार्थना चालू ठेवली व विणाई सोडून दिली. आश्रमात तर नित्येक गोष्टी असतात पण प्रत्येक जण आपापल्या वासनेनुसार जें घ्यायचें असतें तेवढें च नेमकें घेऊन जातो.

"दोर कापायला फार मोठी हिंमत लागते. सिंहगडाची कहाणी प्रसिद्ध च आहे. सूर्याजीनें दोर च कापून टाकले. त्यामुळें मराठे सैनिक हिरिरीनें लढले आणि जिंकले. ११ सप्टेंबर १९५२ ला जेव्हा मीं जाहीर केलें कीं हिंदुस्थानची भूमिसमस्या सुटल्याशिवाय मी आपल्या आश्रमात परत जाणार

नाहीं तेव्हा मीं दोर कापले. त्याचे असें आहे कीं जेव्हा आपण परमेश्वराला आळवून म्हणतो की तू आम्हाला मार्ग दाखव तेव्हा तो मार्ग दाखवल्यावाचून राहत नाहीं पण जेव्हा आपण स्वत:च्या च आधारावर काम करतों तेव्हा तो म्हणतो ठीक आहे, चालवा आपली अक्कल! म्हणून च तर कठीण प्रसंग आला कीं मी आपली अक्कल वापरीत नाहीं तर कात्री च वापरतो।"

रेंडापल्लीच्या सभेंत संग्रह आणि चोरी याचा कार्यकारणसंबंध समजावून सांगताना विनोबा म्हणाले, "आज काहीं लोक जमिनीचे मालक होऊन बसले आहेत. म्हणून बऱ्याच लोकाना जमिनीपासून वंचित राहावें लागतें. दारिद्र्यामुळें असे लोक कधीं कधीं चोरी देखील करतात व मग त्याना शिक्षा मिळते. वास्तविक पाहता संग्रह करणारे लोक हे चोराचे बाप आहेत. ते च चोराना जन्म देतात. पण आजचा समाज मुलाना तुरुंगात पाठवतो व बापाना गादीतक्क्याशीं बसवतो. आज चोरी करणाऱ्याला दोन तीन वर्षांचा कारावास भोगावा लागतो पण त्यात खरी शिक्षा भोगावी लागते ती त्याच्या बायकामुलाना. कारण त्याला तर तिकडे तुरुंगात जेवण मिळते पण त्याच्या बायकामुलाना मात्र उपाशी मरावें लागतें. मी जर न्यायाधीश असतों तर चोरानें चोरी केली हें सिद्ध झाल्यानतर मी त्याला म्हणेन 'तू चोरी केली आहस तेव्हा तुला मी तीन एकर जमिनीची शिक्षा देत आहे. खूप मेहनत करून जमिनींतून पीक काढून आपल्या बायकामुलाना खाऊ घाल."

चोरीगुम्माच्या सभेंत विनोबाजी म्हणाले, "तुम्ही पाच पांडव असाल तर दरिद्रनारायण हा तुमचा सहावा भाऊ आहे त्याला त्याचा हिस्सा द्यायला हवा. तुम्हाला माहीत च असेल कीं पांडव देखील पाच नसून सहा होते. सहाव्या भावाचें नाव होतें कर्ण. पण पांडवाना कर्णाचा विसर पडला आणि म्हणून महाभारत युद्धाच्या रूपानें महाभयंकर संहार झाला. इतिहासाची पुनरावृत्ति होऊ नये म्हणून च मी तुम्हाला आजेवून सांगत आहें कीं त्या सहाव्या भावाची उपेक्षा करू नका. त्याला त्याचा न्यायोचित हिस्सा द्या."

परिवर्तन करायला हवें. आजच्या शिक्षणात उद्योग हि नाहीं कीं ब्रह्मविद्या हि नाहीं ब्रह्मविद्येच्या अभावामुळें बुद्धि नेकाम बनते आणि माणूस भोग परायण व इन्द्रियाचा गुलाम होऊन जातो, तर उद्योग नसल्यामुळें हात बेकार राहतात आमच्या देशातील विद्यार्थी तर शेतात काम करीत करीत ब्रह्मविद्येचें गायन करणारे असे असायला पाहिजेत."

स्त्री पुरुष समानतेविषयीं ते पुढें म्हणाले, "आज पुरुषाना वाटतें कीं स्वयपाक करणें हें स्त्रियाचें च काम आहे आणि आम्हा पुरुषाचें काम म्हणजे खाणें ! पण माझे तर असं मत आहे कीं खाणाऱ्याला स्वयपाक करता आला पाहिजे. आज पति आपल्या पत्नीला म्हणतो की मी तुझा देव आणि तू माझ्या पायाची दासी पण यापुढें असला तत्त्वशून्य धर्म नाहीं चालणार. यापुढें पति हा पत्नीचा देव मानला जाईल तर पत्नी पतीची देवता बनेल. पत्नी पतिव्रता असल तर पति देखील पत्नीव्रत असेल

"भूदानयज्ञामागें प्रेम आणि विचार याची शक्ति आहे. विचार आहे आमचा ईश्वर नी प्रेम आहे भक्त. योगेश्वर कृष्ण नी पार्थ धनुर्धर दोन्ही हि असल्यामुळे विजयश्री मिळाल्यावाचून राहणार नाहीं"

नवरगपूरचा भाग हा फार जाग्रत प्रदेश आह १९४२ च्या चळवळींत येथील ग्रामीण अशिक्षित लोकानीं फार मोठा पराक्रम केला होता. आज हि ते च लोक भूमिक्रान्तीच्या आघाडीवर आहेत आज दुपारीं या ठाण्यातील सुमार तीन चारशें कार्यकर्त्यांची सभा झाली कोणीं तरी म्हटल कीं, "या भागात खेडोपाडीं हिंडून विचार प्रचार करीत भूदान आणणारे कार्यकर्त तर आहेत पण त्यातील बहुतक सर्व अशिक्षित आहेत त्यामुळें त्याना दानपत्रें भरून घेता येत नाहींत तरी लिहू शकणारे काहीं लोक हवे आहत इथें" मनमोहनभाई (आमचे 'गुरुभाई') यहेन म्हणाले कीं, "बर, लिहू वाचू शकणारे मजूर पाठवून देऊ इथें !" या विभागातील तीनश खेड्यानीं गावच्या जमिनीचा सहावा हिस्सा दान दिला होता. अशिक्षित नेत्यानीं क्रांति तर करून टाकली होती आता फक्त तिला कागदावर अंकित करायला सुशिक्षित अनुयायी हवे आहेत अहिंसक क्रान्तीच्या अद्भुत तत्राचें इथें प्रत्यक्ष दर्शन च घडतें आह.

परवा एकदा बाबा आम्हाला तुकारामाचे अभंग वाचून दाखवीत होते. " तुका म्हणे माझें सर्व भांडवल, बोलविले बोल पांडुरंगें । "—हा अभंग वाचताना वाणी अडखळली, वाणींतून उमटणारे शब्द नेत्रातल्या अश्रूंत ओघळले.

तुकारामाच्या या अनुभूतींचें दर्शन भूदानयज्ञात क्षणोक्षणीं घडतें. ' आजवर मला जे सुख मिळालें तें आता दुसऱ्याला मिळू दे. माझी सारी जमीन–तीन बिघे–घ्या व एखाद्या भूमिहीनाला द्या. मी मजुरी करून पोट भरीन ' असें म्हणणारा गरीब शेतकरी असो, हजारों एकराचें दान • देऊन भूदानयज्ञात उडी घेणारा जमीनदार असो, ग्रामदानात आपलें सर्वस्व देऊन स्वामित्वविसर्जन करणारा जमीनवाला असो, कीं वैभवाचें व आरामाचें जीवन सोडून जनसेवेकरता खेड्यात जाणारी व्यक्ति असो—प्रत्येकाची अनुभूति जणू हें च सुचवीत असते कीं प्रेरणा देणारा तो च आहे. तो कर्ता आहे, आम्ही करण आहोंत. तो शिल्पकार आहे, आम्ही दगड आहोंत दगडातून देवाची मूर्ति बनविणारा तो च आहे.

तो हृदयातील चिंतन चक्राला प्रेरित करतो आणि मग पाय नकळत चालू लागतात. आमच्याच्या राजकीय जीवनात नावाजलेले उत्तर प्रदेश विधान सभेचे सदस्य बाबुलालजी मित्तल सत्ता, संपत्ति आणि मानमान्यतेचें जीवन सोडून विनोबाकडे आले व यात्रेंत काहीं महिने राहून त्यांनीं विनोबांच्या सल्ल्यानुसार कोरापूटच्या जंगलात ग्रामदानाच्या गावाची सेवा करण्याकरता राहण्याचा निर्णय घेतला. हें सर्व पाहून मनात विचार यायचा—त्याना इथें आणणारा कोण आहे ? नवरंगपूरहून बाबाचा आशीर्वाद घेऊन जेव्हा ते मुनीगुडाच्या विभागात काम करण्याकरता जायला निघाले तेव्हा वाटलें कीं याना इथें काय मिळणार आहे ? अनेक नाहते, आप्त व मित्र या सर्वांना सोडून त्याना आपली भाषा देखील समजत नाहीं, त्यांच्या व आपल्या जीवनप्रकारात दोन ध्रुवाइतकें अंतर आहे, अशा लोकांत ते कशाला आले ? पण त्यानें प्रेरणा दिली, त्यानें च शक्ति दिली, त्यानें च हृदयात भक्ति निर्माण केली व शाश्वत शांतीचा मार्ग दाखवला.

—※—

## गरिबीचें वांटप नव्हे

पापडाहडी, तुरला
६, ७ जुलै १९५५

पापडाहडी हें गाव चेचाळीसच्या लढ्यात फार गाजलें होतें. २५ ऑगस्ट १९४२ ला इथें गोळीबार झाला व त्यात तेरा वीर 'शहीद' झाले. सत्याकाळीं आम्ही बाबांच्या बरोबर नदीच्या काठचीं ती जागा पहायला गेलों. मावळत्या सूर्याची आरक्तता नदीच्या पाण्यात प्रतिबिंबित झाली होती. जणू ती सुचविन होती कीं गोळ्या एके काळीं शहीदांच्या पवित्र रक्तानें नदीचें पाणी असें च आरक्त झालें होतें. बाबांनी गावकऱ्यांना म्हटलें कीं, "साऱ्या जगाला तुमच्या पराक्रमाची गाथा माहीत नसली तरी हि ती देवाच्या जवळ केव्हा च जाऊन पोहोंचली आहे. तुमच्यासारख्या अगणित अनामिक वीरांच्या त्यागामुळें आपला देश स्वतंत्र झाला पण अजून स्वराज्य दिल्ली च कटक पयन च येऊन पोहोंचलें आहे. अजून खेड्याखेड्यात आलें नाहीं इंग्रजाचें स्वामित्व तर नाहींसें झालें पण अजून हि लहान मोठे जमीन व संपत्तीचे मालक कायम च आहेत. सारे लोक आपणहून आपला मालकी हक्क सोडून देतील व खेड्याखेड्यातून स्वामित्व नाहींसें होईल व प्रत्येक खेड्याचें एक कुटुंब बनेल तेव्हा च खऱ्या स्वराज्याची स्थापना होईल."

भूदान यात्रेला बाबा 'चालतें फिरतें विद्यापीठ' म्हणतात. या विद्या पीठात नाना त ह्रेचे गुरु चोवीस तास अखंड ज्ञान देत च असतात पर्वत, नद्या, निर्झर, झाडें, आकाश हे सारे आमचे गुरु आहेत. पर्वत गीतेच्या भाषेत बोलू लागतो कीं 'मी स्थिरात हिमालय'. नद्या उपनिषद् गात पुढें जातात 'समुद्रात विलीन होण्यात च आमच्या जीविताचें साफल्य आहे. एकदा समुद्रात लीन झाल्यावर आमचीं वेगवेगळीं नावें नी रूपें उरत च नाहींत.' निर्झर म्हणतो, 'मी ल्हानसा असन पण माझें पाणी बघा किती स्वच्छ, शुद्ध, निर्मल आहे तें!' झाडें तुलसीदासाचे दोहे म्हणतात— 'तुम्हीं आम्हाला दगड मारलेत तरी हि आम्ही तुम्हाला गोड फळें च

देऊ' आणि आकाश तर ऋषींचे आराध्य दैवत. 'माझें हृदयाकाश बाहेरच्या असीम, अनंत आकाशासारखें होऊ दे' अशी ते सतत प्रार्थना करीत.

पण सकाळीं चालताना बाबांचा खास तास असतो. तुबरलाच्या वाटेवर चळवळणारा साप दिसला अन् ते एमे च म्हणाले, "नवा तो चेतन्याचा विलास! आपले वैदिक ऋषि सापात हि देवाचें रुप बघतात." चर्चा सुरु झाली. बाबा पुढे बोलू लागले, "मानव आणि पशु या दोघामध्यें हि स्वजाति-सेवा, स्वजाति वृद्धि, स्वत:ला मदत करणाऱ्या इतर जातींची सेवा आणि आपल्या जातीचा नाश करणाऱ्याशीं वैर या गोष्टी सारख्या च आढळतात. पण त्या दोहोंत सर्वांत मोठा फरक हा च आहे कीं मानव-देहात च मुक्ति होणं संभवनीय आहे. मानवाला वाटतें कीं विश्वात्म्याशीं एकरूप होण्यामध्यें हा देह आड येतो. म्हणून या देहाचा उपयोग निष्काम-सेवेंत करून मुक्त होण्याचे प्रयत्न करणं हें च आपल्या जीवनाचें अंतिम उद्दिष्ट आहे."

तुबरलाच्या भाषणात विनोबा म्हणाले, "आजकाल कांहीं लोक माझ्यावर अशी टीका करतात कीं हा माणूस दारिद्र्याचें वाटप करायला निघाला आहे. पण अशी टीका करणाऱ्याच्या हे लक्षात येत नाहीं कीं देशात दारिद्र्य असेल तर दारिद्र्य च वाटूं. संपत्ति असेल तर संपत्ति वाटूं. जे काय असेल ते वाटून खाऊ. दारिद्र्याचें वाटप करणें हा आमचा उद्देश नसून हृदयें जोडणें हा उद्देश आहे. जेव्हा हृदयें जुळतात तेव्हा मग देशाचें सामर्थ्य हि वाढतें व संपत्ति हि वाढते. देशात उत्पादन खूप वाढावें असें मला हि वाटतें. पण माझें असें म्हणणें आहे कीं जमीन व संपत्तीच्या वाटपानें उत्पादन वाढविण्याच्या कार्याला मदत च होईल."

'आपल्या देशात उत्पादन च मुळीं फार कमी आहे तोंवर समान विभाजन कसलें करायचें? उत्पादन खूप वाढल्यानंतर मग च विभाजना-संबंधीं विचार करणें योग्य ठरेल.' अशा आशयाचा विचार मोठमोठे लोक, अर्थशास्त्रज्ञ वगैरे नेहमीं मांडत असतात. यावर विनोबा म्हणतात

कीं, " समजा, तुमच्या कुटुंबात पाच माणसें आहेत नी तुम्ही फार गरीब असल्यामुळें घरात खायला फक्त तीन च माणसाना पुरेसें आहे. तर काय तुम्ही तिघाना खाऊ घालून दोघाना उपाशी ठेवता का? 'आपण कुटुंबाचें उत्पन्न वाढवायचा प्रयत्न करू या उत्पन्न वाढल्यावर तुम्हाला खायला मिळेल' असें म्हणून त्या दोघाची समजूत घालण्याचा प्रयत्न करता का? श्रीमताचें घर असो कीं गरिबाचें असो, घरात जे काहीं असेल ते सारे लोक वाटून खातात. मी जास्त काहीं म्हणत नाहीं. फक्त एवढे च सागतों कीं कुटुंबाचा हा न्याय साऱ्या समाजाला लागू करा "

विनोबा विज्ञानाच्या व यत्राच्या अजिबात विरुद्ध आहेत असा हि कित्येकाचा गैरसमज झालेला असतो. बिहारच्या एका प्रवचनात आपली यत्रासबधींची भूमिका समजावून सागताना ते म्हणाले होते कीं, " आधीं हें लक्षात घ्यायला हवें कीं विज्ञान आणि यत्र या दोन वेगवेगळ्या गोष्टी आहेत. विज्ञानाची खूप प्रगति व्हावी असें मला हि वाटतें. पण यत्राचा उपयोग करताना मात्र सारासारविवेक ठेवायला हवा.

" यत्रें हीं तीन प्रकारचीं असतात—(१) समय साधक यत्रें. उदा० मोटर, आगगाडी, विमान वगैरे. अशीं यत्रें आम्हाला हवीं आहेत. दहा हजार घोडे काहीं एका विमानाची बरोबरी करू शकत नाहींत. तेव्हा विमाना सारख्या साधनाचा आम्ही अवश्य उपयोग करू. (२) सहारक यत्रें. उदा० तोफा, बदुका, ॲटम बॉम्बस् इत्यादि तीं आम्हाला अजिबात नकोत. (३) उत्पादक यत्रें. ह्या यत्राचे दोन प्रकार आहेत—पूरक आणि मारक. एक च यत्र एका देशात पूरक तर दुसऱ्या देशात मारक ठरेल, तसें च एका काळात पूरक तर दुसऱ्या काळात मारक ठरेल. तेव्हा यत्राचा उपयोग करताना देशकालपरिस्थितीचा विचार करायला हवा. अमेरिकेंत जमीन खूप व त्या मानानें लोकसख्या कमी आहे. तिथें माणशीं बारा एकर जमीन पडते. त्यामुळें तिथें शेतीकरता ट्रॅक्टरचा उपयोग करणें योग्य आहे. पण हिंदुस्थानामध्ये जमीन कमी व लोकसख्या जास्त आहे. इथें माणशीं जेमतेम पाऊण एकर जमीन आहे. तेव्हा इथें शेतीकरता ट्रॅक्टरचा उपयोग करणें अयोग्य आहे. फक्त पडती जमीन उठवण्याच्या कामात ट्रॅक्टर वापरावा. लोकसंख्या

जास्त असेल तर माणसाचीं कामें हिरावून घेऊन त्यांना बेकार करणारीं यंत्रें मारक ठरतात."

उत्तर प्रदेश बिहारच्या यात्रेंत पडदापद्धतीमुळें सभेत स्त्रिया क्वचित् च दिसत. पण बंगाल ओरिसांत मात्र स्त्रिया खूप मोठ्या संख्येनें सभेला येतात. या विभागात तर स्त्रियांची संख्या पुरुषांच्या बरोबरीची दिसते. या भागातल्या स्त्रिया आरोग्यवान, धष्टपुष्ट व कांतिमान दिसतात. त्यांची राहणी देखील मोठी नीटनेटकी असते. सुडौल बांधा, रोज हळद लावून स्नान केल्यामुळें किंचित् पिवळसर झाक मारणारा तेजस्वी श्यामल वर्ण, खूप तेल लावून केस व्यवस्थित विंचरून डाव्या कानाजवळ घातलेला अंबाडा, त्यांत रानफुलें खोचलेलीं, अंगावर एखाद दुसरा दागिना, एक च वस्त्र पण नीटपणानें गुंडाळलेलें, खांद्यावर पदराची गांठ मारून तयार केलेल्या झोळींत तान्हें मूल ठेवलेलें अन् नेत्रांत मुक्त जीवनाचा आनंद नी निर्भयता!



## भूमिसेवेशिवाय मानवजीवन अपूर्ण

नुआगुडा, डाबूगॉंव
८, ९, १० जुलै १९५५

जंगलातल्या वाटेनें, वाघोबाच्या पदचिन्हांचा मागोवा घेत, उंच झाडांच्या छायेंत पाखरांचीं गाणीं ऐकत यात्रा चालली होती. एका कार्यकर्त्यानें विचारलेल्या प्रश्नाच्या उत्तरात बाबा म्हणाले, " वेदान्त म्हणतो कीं जग हें मिथ्या आहे, एक खेळ आहे, असें माना. खेळातल्या जय-पराजयाबद्दल आपल्याला फारसें सुखदुःख वाटत नाहीं, तर खेळण्यातला आनंद च आपल्याला फार मोलाचा वाटतो. अनेकांना वाटतें कीं एकदा सृष्टीला मिथ्या म्हटल्यावर माणसांत कर्म करण्याची प्रेरणा च उरणार नाहीं. पण वस्तुस्थिति अशी नाहीं. खेळ हा मिथ्या आहे हें माहीत असून

देखील आपण खेळण्याच्या आनंदाकरता म्हणून खेळत नाही का ? त्या च प्रमाणे जग ही माया आहे असे समजून अनासक्त होऊन कर्म करीत रहावे."

बिहारच्या यात्रेत रात्रीच्या प्रवचनात बाबा म्हणाले होते कीं, 'नीतीचें अधिष्ठान शेती हें आहे.' याविषयींच्या चर्चेंत ते एका कार्यकर्त्याला म्हणाले कीं, "भूमि आणि इतर संपत्ति याच्यात मुळीं अगदीं मूलभूत स्वरूपाचा असा फरक आहे. भूमीला वास्तविक मूल्य आहे पण इतर संपत्तीला काल्पनिक मूल्य आहे. त्यामुळें त्या संपत्तीला आपण बेकाम बनवूं शकतो. समजा, उद्या असे झालें कीं खेड्यातील लोकांनीं ठरवून टाकलें कीं आम्ही आपल्या श्रमाने उत्पन्न केलेली लक्ष्मी पैशाकरता म्हणून शहराच्या बाजारात नेऊन विकणार नाही. आज ते दुधातुपासारख्या वस्तु निर्माण तर करतात पण आपल्या पोराबाळाना खाऊ न घालता शहरात नेऊन विकतात. कारण त्याना कपडे, तेल यासारख्या आवश्यक वस्तु विकत घ्याव्या लागतात. पण जर ग्रामोद्योग उभे करून खेड्यातील लोक आपल्या सर्व प्राथमिक गरजा खेड्यात च पूर्ण करू लागले तर मग त्याच्यावर दूधतूप विकण्याची पाळी येणार नाहीं. मग तुमच्या बड्या बड्या पगारवाल्याना व श्रीमंताना दूधतूप विकत घ्यायला खेड्यात जावें लागेल. पण श्रमिक त्याना म्हणतील कीं, 'आमचें दूधतूप विकण्याकरता नसून आमच्या मुलाबाळाना खाण्याकरता आहे. तुम्ही आमच्यासमोर पैशाचा ढीग ओतलात तरी आम्ही तुम्हाला दूधतूप देणार नाहीं. आम्ही सर्वांनीं खाऊन जे काय अर्धा पावशेर उरेल तेवढें तुम्हाला देऊं शकू. पण ते हि पैसा घेऊन नव्हे. तुम्ही जर आमच्या-बरोबर दोन चार तास शेतात काम कराल, गाईंची सेवा कराल, तर च तुम्हाला दूधतूप मिळेल.' जर उद्या असें झालें तर तुमच्या पैशाच्या ढिगाचा काय उपयोग ? तुमच्या त्या संपत्तीला बेकाम बनविण्याचें च काम आम्ही करीत आहोंत. आम्ही लोकाना सांगू कीं बंदुकीच्या भीतीने किंवा पैशाच्या प्रलोभनानें आपल्या दूध, तूप, भाज्या, फळे, धान्य इत्यादि मूल्यवान् वस्तु विकू नका. जो श्रम करील त्याला च ह्या वस्तु मिळतील."

कार्यकर्त्यानें विचारलें कीं सर्वांना जमीन द्यायची काय गरज आहे ? काहींना जमीन द्यावी व काहींना उद्योग द्यावे.

बाबा म्हणाले, " आज काहीं मी सर्वांना च जमीन द्यायला निघालों नाहीं. आज भूदानात तर फक्त त्याना शेती करता येते, करण्याची इच्छा आहे पण हातीं जमीन नाहीं कीं दुसरा कोणता धंदा हि नाहीं, अशाना च जमीन दिली जाईल. पण माझ्या स्वप्नातील आदर्श समाजात मात्र प्रत्येक व्यक्तीचा शेतीशीं संबंध राहील. मी स्वत: उत्तम विणाई जाणतों व मीं आठ आठ तास सतत विणाईचें काम केलें आहे. पण मला जर कोणी म्हणेल कीं तू दिवसभर विणाई च कर तर मी त्याला मुळीं च तयार होणार नाहीं. कारण चार तास एका जागीं बसून विणाईचें काम केल्या-नंतर चार तास शेतात मोकळ्या हवेंत काम करावें असें मला वाटतें. मी हें मान्य करतों कीं आजच्या समाजरचनेंत बरी च कृत्रिमता आलेली आहे. त्यामुळें सर्वांना शेतात काम करण्याची इच्छा होणार नाहीं. परंतु आमच्या आदर्श समाजरचनेंत मात्र प्रत्येक माणूस रोज चार तास शेतात काम करील व चार तास इतर उद्योग करील. मीं तर अनेकदा म्हटलें आहे कीं प्रधानानीं रोज दोन चार तास शेतात काम करायला हवें. त्यायोगें त्याना स्फूर्ति, विचाराचा ताजेपणा व उत्तम आरोग्य इत्यादींचा लाभ होईल.

" हिंदुस्थानात आज जेवढी जमीन आहे ती येथील सर्व लोकाना पुरेशी आहे की नाहीं असा मी कधीं विचार च करीत नाहीं. कारण माझें असें मत आहे कीं इथें राहणाऱ्या सर्व माणसाचा या भूमीवर अधिकार आहे. एवढें च नव्हे तर पृथ्वीवरील भूमीवर सर्व मानवाचा समान अधिकार आहे. आज काहीं राष्ट्रात वाटेल तितकी जमीन पडली असून देखील ते इतराना तिथें येऊ देत नाहींत. ते म्हणतात कीं आम्ही या भूमीचे मालक आहोंत. पण भूदानयज्ञ भारतात सफल झाला कीं त्याचीं तत्त्वें आंतरराष्ट्रीय क्षेत्रात लागू करण्याचें काम आपोआप सुरू होईल. भूदानाचें मूलतत्त्व हें कीं भूमीचा मालक ईश्वर, सारे मानव भूमिपुत्र, सर्वांना समान अधिकार. तेव्हा मग आशियातल्या चीन जपानसारख्या दाट लोकसंख्येच्या प्रदेशातल्या लोकाना ऑस्ट्रेलिया कॅनडात जाऊन राहता येईल, सारी पृथ्वी देशाची बनेल नी प्रत्येक माणूस विश्व-नागरिक या नात्यानें जगात कुठें हि मुक्तपणें संचार करूं शकेल. शेतात काम केल्या-शिवाय माणसाना सर्वांगीण विकास होऊं शकत नाहीं असें माझें स्पष्ट मत

आहे माणसाला भूमीपासून दूर ठेवणें म्हणजे बाळाला आईपासून दूर ठेवण्यासारखें आहे. मी तर बोधगयेच्या सर्वोदयसमेलनांत असें हि म्हटलें होतें कीं भूमीची सेवा करूं इच्छिणाऱ्याला भूमीपासून वंचित राखण्यानें तुम्ही जेवढा महान् अपराध करता तेवढा अपराध एखाद्याला मंदिरांत प्रवेश करण्यापासून अडवण्यानें देखील करीत नाहीं. कारण मंदिर तर टाळलं देखील शकतें पण शेती हें भक्तीचें मूलभूत साधन आहे."

कायदा, राजकारण इत्यादिविषयींच्या प्रश्नांच्या उत्तरांत ते म्हणाले, "आम्ही राजकारणापासून अगदीं अलिप्त राहूं इच्छितों असा कांहीं लोकांचा गैरसमज झालेला आहे पण आम्ही कांहीं 'रामकृष्ण मिशन' प्रमाणें नुसते च सेवा करणारे लोक नाहीं. आमची एक स्वतंत्र राजकीय आकांक्षा आहे. राजनीतीचें स्वरूप च बदलून टाकून लोकनीतीची स्थापना करणें हें आमचें उद्दिष्ट आहे स्वराज्य मिळाल्यानंतर लोकांत जाऊन जनशक्ति निर्माण करण्याच्या कार्यांत च शक्तीचें अधिष्ठान असतें. हातीं सत्ता न घेतां सत्तेवर अंकुश ठेवणं ही च आमची मनीषा आहे."

डाबूगॉवला कार्यकर्त्यांची सभा झाली. एकानें म्हटलें कीं, 'येथील कार्यकर्ते अशिक्षित आहेत तेव्हां त्यांना शिबिरें वगैरेच्या द्वारें थोडेंफार शिक्षण द्यायला हवें' हें ऐकतांच एका म्हाताऱ्यानें म्हटलें, "अरे, आम्हीं स्वराज्याच्या चळवळींत कामें केलीं तेव्हां काय गांधीजींनीं आम्हांला शिक्षण देऊन लढायला पाठवलें होतें? तेव्हां जसें काम केलें तसें च आतां हि करूं." त्यांना पुस्तकी विद्या अवगत नव्हती पण जीवनाची विद्या अवगत होती. हसत हसत त्याग करायचा, सर्वांवर प्रेम करायचें आणि आपल्या तत्त्वाकरतां सर्वस्वसमर्पण करायचें हें सारें त्यांना माहीत होतें!

एका शिकलेल्या कार्यकर्त्यानें म्हटलें कीं, 'बडे लोक चांगली जमीन देत नाहींत' त्यावर विनोबा म्हणाले, "श्रीमंत लोक वाईट असतात असें जर तुम्हांला वाटत असेल तर त्याचा अर्थ असा कीं तुमचा अहिंसेवर विश्वास च नाहीं, हिंसेवर विश्वास आहे. भूदानयज्ञ ही तर हृदयपरिवर्तनाची चळवळ आहे आजवर अनेक श्रीमंतांनीं या चळवळींत अंत:करणपूर्वक

काम केलें आहे. आपण त्याना सत्य विचार प्रेमाने समजावून सागू तर त्याना तो समजल्यावाचून राहणार नाहीं."

मला बिहार-यात्रेतल्या एका घटनेची आठवण झाली. तिथें पक्षभेद अगदीं कळसाला पोहोंचले आहेत. एकदा एका पक्षाचे कार्यकर्ते विनोबाना म्हणाले की, "त्या दुसऱ्या पक्षाचे लोक इतके बदमाश आहेत कीं त्याचें हृदयपरिवर्तन कदापि हि होणें शक्य नाहीं. तेव्हा तुम्ही त्याना चार हात दूर च ठेवा." हे ऐकून विनोबा एकदम उद्गारले, "हें पहा, तर मग तुम्ही आधीं हातीं पिस्तुल घ्या व त्या माणसाना गोळी घाला बरें! तुम्हाला वाटतें ना कीं त्याचें हृदयपरिवर्तन होणें अशक्य आहे? तेव्हा मग तुमच्यासमोर हातीं पिस्तुल घेण्यावाचून दुसरा मार्ग च उरत नाहीं. पण माझी मात्र हृदयपरिवर्तनाच्या प्रक्रियेवर पूर्ण श्रद्धा आहे. तेव्हा मला आपला अहिंसेचा प्रयोग तर करू द्या!"

प्रार्थनासभेच्या वेळीं आकाशाच्या अभिषेकपात्राखालीं उभे राहून शेकडो ग्रामीणांनीं विनोबासोबत प्रार्थना केली. कोरापूट जिल्ह्यात ग्रामदानाच्या गावाच्या सतत वाढत्या संख्येचा उल्लेख करून विनोबांनीं कोरापूटच्या लोकाची पाठ थोपटीत म्हटले, 'बोलो कोरापुटवालोंकी जय!' कार्यकर्त्यांना स्फूर्तिदायक संदेश देत विनोबा म्हणाले, "तुम्ही खेड्यापाड्यात जाऊन जागतिक शांततेचा विचार सागा. त्या च बरोबर हें देखील सागा कीं चोरीप्रमाणे च संग्रह देखील पाप च आहे. ज्याप्रमाणे समाजात चोऱ्या होत राहतील तोंवर शांतता स्थापित होऊ शकणार नाहीं त्या च प्रमाणें जोवर संग्रह करणें चालेल तोंवर शांतता स्थापित होऊ शकणार नाहीं. बोला, माझ्या या शान्तिसेनेत दाखल व्हायला कोण कोण तयार आहे ते?" कितीतरी लोक मोठ्या उत्साहाने शान्तिसेनेत दाखल झाले.

नंतर विनोबांनी त्याना हसत हसत म्हटले कीं, "पण हे बघा, तुम्हाला आधीं स्वत.ची जमीन द्यावी लागेल. तर च दुसऱ्याना जमीन मागताना तुमच्या वाणींत शक्ति येईल." लोकांनीं लागली च उत्तर दिले, "आम्हीं तर यापूर्वीं च आपापली जमीन देऊन टाकली आहे. स्वत दिल्याशिवाय दुसऱ्याना कसे मागणार आम्ही?" हे उत्तर ऐकून विनोबा खूप खुश

झाले व विनोबा दुसऱ्या दिवशीच्या प्रार्थनासभेत त्याचा उल्लेख करीत म्हणाले, "कोणती हि गोष्ट इतराना करायला सांगण्यापूर्वी आधीं स्वत त्यानुसार आचरण करावें लागतें हे ज्या लोकाना कळतें त्याना काय मागासलेले म्हणायचे? शहरातल्या विद्वान् लोकाना मात्र एवढी साधी गोष्ट देखील कळत नाहीं म्हणून तर मी नेहमीं म्हणतों की क्रांति विद्वत्तेनें होत नसून भक्तीनें, हृदयानें, होते."

डानूगावला दोन दिवस मुक्काम होता तरी पण दुसऱ्या दिवशीं पहाटे नित्याच्या वेळेस बाबा फिरायला निघाले. येथून जवळ च असलेल्या मध्य प्रदेशाच्या सीमेजवळच्या उमरकोट या गावाकडे जाणाऱ्या रस्त्यावर दोन्ही बाजूच्या गर्द झाडींची शोभा पाहत आम्ही पुढें पुढें चाललो होतों. मागून एक जीप आली व पुढे निघून गेली. महादेवीताईंनी बाबाना सांगितलें, "रमादेवी होत्या त्या जीपमध्यें" बाबा एकदम म्हणाले— "अद्‌भुत च बाई आहे ही! हिच्यासारखें काम करणारी स्त्री हिंदुस्थानात विरळा च असेल. कुठें हि घर्षण होवो, स्नेह बनून तें मिटवणें हें तिचें नित्याचें काम" उमरकोटला काही तरी प्रश्न निर्माण झाला होता तो मिटवायला त्या धावून गेल्या होत्या. उत्कलचे सारे कार्यकर्ते रमादेवींच्या स्नेहसूत्रामुळें एकत्रित राहिलेले आहेत. त्या सकाळीं आम्हाला नाश्ता खाऊ घालतील, दुपारीं जीपनें दोन चार गावात हिंडून भूदान आणतील, कार्यकर्त्यांची विचारपूस करून येतील, संध्याकाळीं जवळच्या एखाद्या गावात जाऊन लोकाना ग्रामदानाचें तत्वज्ञान समजावून सांगून ग्रामदान मिळवतील. रात्रीं पुन्हा जीपनें वाघोरानें दर्शन घेत लांबचा प्रवास करून शहरात जाऊन अधिकारी, व्यापारी वगैरेंना भेटून दहा पाच कामे उरकतील, वाटेंत आमच्या पुढच्या पडावावरची व्यवस्था ठीक झाली कीं नाहीं त पाहतील नी पहाटे पुन्हा बाबाच्या बरोबर पायीं चालू लागतील. कधीं कधीं पाचपन्नास मैलाचा कच्च्या रस्त्यावरचा जीपचा प्रवास आटोपून पडावावर आल्या कीं 'जेवण नीट झालें ना?' म्हणून विचारतील नी दुसऱ्या च क्षणीं बसल्या जागीं त्याचे डोळे मिटतील. पण जेमतेम दहा पंधरा मिनिटें होत नाहींत तों च कार्यकर्ते पुढले तरी काम घेऊन त्याना उठवायला येतील! एकदा

गार. प्रार्थनासभेत त्याच्या भगिनींनीं कुराणाचा पाट म्हटला. मग रामधुन सुरू झाली. हिंदु-मुसलमान बाधवांचे सूर एकमेरात मिसळले व त्यांतून शातीचें संगीत ऐकू येऊ लागलें. बाबा म्हणतात, "ईश्वर एक च आहे, त्याचीं नावें भिन्न भिन्न आहेत. ज्याला जें नाव प्रिय वाटतें त्याचा तो जप करतो." तल्लीन होऊन रामधुन गाणारे मुसलमान बधु-भगिनी हृदयें जुळल्याची च नव्हे तर एकरूप झाल्याची साक्ष देत होते. ती कृत्रिम एकता नव्हती तर अभेदाचें, अद्वैताचें दर्शन होतें तें. धर्मभेद नावाची काहीं वस्तु असते याचा च मुळीं तिथें विसर पडला होता. हुसेनभाईची आई माझ्याजवळ म्हणाली, "विनोबाजी अल्ला का पैगाम सुना रहे हैं। खुदाने जमीन पैदा की है इसलिये इसके सब बच्चों का उस पर समान हक है।" त्यांच्या घरातील सर्व स्त्रिया बाबांना भेटायला आल्या आणि घर खादीमय करण्याचा आदेश घेऊन गेल्या.

मुलें तर नव्या जगाचे दूत च. गावचीं सर्व मुलें 'ग्राम गाँवे भूमि-मालिक रहिंगे नाही, भूमिकान्ति सफल हो'च्या घोषणा करीत असलेलीं पाहून बाबा म्हणाले, "ज्या गावच्या मुलांना भूदानाचा संदेश माहीत आहे तें गाव पुढें गेल्यावाचून कसें राहील!" सभेत दोन छोट्या मुलांना व्यासपीठावर आपल्याजवळ बसवून ते म्हणाले, "तुम्ही सारे या मुलांसारखे व्हा. मुलांना कुठल्या च प्रकारचे भेदभाव माहीत नसतात. येशू ख्रिस्तानें म्हटलें आहे कीं ज्याचें बालस्वत् हृदय असेल त्याचा देवाच्या दरबारात प्रवेश होईल."

बाबा नेहमीं म्हणतात कीं, "भूदानयज्ञाच्या रूपानें आपल्या हातीं एक अशी किल्ली आली आहे की त्या किल्लीनें सगळीं कुलुपें उघडता येतील." जातिभेद, धर्मभेद, वर्गभेद, स्पृश्यास्पृश्यभेद इत्यादि सारीं कुलुपें कुशलतेनें उघडण्याची अहिंसेची किल्ली आज हातीं तर आली आहे. पण किल्ली हातीं येऊन देखील तिचा नीट उपयोग करण्याची बुद्धि असायला हवी ना!

## तपस्येंतील प्रचंड शक्ति

मारिआ, तारागाव, मिरगानगुडा
१२, १३, १४ जुलै १९५५

मरिआच्या प्रवचनात समाजाला एकरस कसें करायचें यावर विवेचन होतें. "आज समाजाचे तीन तुकडे झाले आहेत—वरचा वर्ग, मध्यमवर्ग नी खालचा वर्ग. वरच्या वर्गांत इतराविषयींच्या तिरस्काराची भावना असते, मध्यमवर्गात स्पर्धेची भावना असते व खालच्या वर्गात वरच्याविषयीं द्वेषाची भावना असते. भूदानयज्ञद्वारे या तिघाना एकत्र आणून त्यांच्या परस्पर सहकार्यानें समाज मजबूत करायचा आहे. आज हि समाजातल्या सर्व थरात एक प्रकारची आतरिक श्रद्धा वास करते आहे आणि म्हणून च भूदानाचें तत्त्वज्ञान लोकाना पटतें. ज्या खेड्याचें ग्रामदान होतें तिथें तिरस्कार-स्पर्धा द्वेषरहित नव्या समारचनेचा पाया घातला जातो"

तारागावच्या प्रवचनात विनोबा म्हणाले, "भूदानयज्ञामुळें भूमीचा प्रश्न सुटेल ही अगदीं च गौण बाब आहे. भूदानयज्ञाचें तत्त्व त्याहून अधिक महत्त्वाचें आहे. हिंदुस्थानच्या जनतेची शातीच्या साधनावरील श्रद्धा दृढ व्हावी, हें आमचें उद्दिष्ट आहे. चुपचाप स्वस्थ बसणें जे चालले आहे, तें चालू देणें म्हणजे काहीं शाति नव्हे. हिंसेंत काहीं सामर्थ्य नाहीं हिंसेनें प्रश्न सुटू शकत नाहींत हें तर आता सिद्ध होऊन चुकलें आहे. पण शातीमध्यें प्रश्न सोडविण्याचें सामर्थ्य आहे हें आता आपल्याला सिद्ध करायाचें आहे. म्हणून च मी नेहमीं म्हणतो कीं भूदानापेक्षा हि भूदानाचें तत्त्व अधिक श्रेष्ठ आहे.'

विनोबाच्या मुखातून शातीचा उद्‌घोष बाहेर पडला पण त्याचें अधिष्ठान शातीच्या शक्तीची उपासना हें आहे. इथे शाति सैनिक विचार आणि प्रेमाची अस्त्रे घेऊन खेड्यापाड्यात जाऊन व मुडकीं उडविण्याऐवजीं हृदयात परिवर्तन घडवून आणतात. गावकऱ्याना स्वामित्वविसर्जनाचा, सारी जमीन देवाची करण्याचा, विचार समजावून सांगितला की त्याची आपापसात चर्चा सुरू होई. म्हातारी माणसें म्हणत, "अगदीं बरोबर. आपले जुने सत हें च तर सागत असत." तरुणाना वाटायचें की या नवविचाराच्या आधारावर

नवा समाज घडवून आणू. कुणी शंका काढायचे तर कुणी त्याला उत्तर द्यायचे. बराच वेळ चर्चा होऊन अखेरीस ग्रामदान देण्याचा निर्णय व्हायचा. ही काहीं ' अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्ट ' नाहीं तर कोरापूट-च्या दोनशें खेड्यात प्रत्यक्ष घडलेली, डोळ्यानीं पाहिलेली, अशी सत्यकथा आहे. या कथेचा शेवट या वाक्यानें होतो ' म्हणून खरी क्रांति ही शांतिमय च असते. शांति हे सर्वोत्तम साधन व सर्वश्रेष्ठ साध्य आहे.'

मिरगानगुडाला गावच्या हरिजन लोकानीं विनोबाना आपली दुःखद कहाणी सांगितली. त्या दिवशींच्या प्रवचनात त्याचा उल्लेख करीत विनोबा म्हणाले, " भूदानयज्ञाची सुरुवात च मुळीं हरिजनानीं केलेल्या जमिनीच्या मागणीनें झाली. भूदानयज्ञाचें काम जोरात चालेल तर हरिजन परिजन हा भेद आपोआप नाहींसा होईल एका परमेश्वराचें नाव घेतलें कीं त्यात सार्‍या देवाचीं नावें येऊन जातात किंवा एक समुद्रस्नान केलें कीं सार्‍या नद्याच्या स्नानाचें पुण्य मिळतें तसें च जिथे ग्रामदान होईल तिथें सारे भेदभाव विरून जातील."

कोरापुटमध्यें क्रान्ति होण्याचीं चिन्हें दिसू लागलेलीं पाहून विनोबानीं आपली कोरापुट यात्रा आणखी दोन तीन महिने लांबवली. त्या च बरोबर गोपबाबूनीं उत्कलच्या इतर जिल्ह्यात काम करणार्‍या सुमारें शभरदीडशें प्रमुख कार्यकर्त्याना कोरापुटमध्यें बोलावून घेतलें. कोरापुटसारख्या जंगली व अतिपावसाच्या भागात ऐन पावसाळ्यात काम करणें शक्य च नाहीं असें आजवर सर्वजण मानीत पण आता या पावसाळ्यात वेगानें वाहणार्‍या डोंगरातल्या नद्या, नाले पार करीत उंच डोंगर ओलांडीत दाट जंगलातून मार्ग काढीत सारे कार्यकर्ते सारखे हिंडून काम करताहेत. पूर्ण काळजी घेऊन हि मलेरियानं आजारी पडल्यास कोरापुट शहरातील सरकारी दवाखान्यात जायचें व जरा बरें वाटता च पुन्हा कामाला लागायचं हा त्याचा नित्यक्रम बनला होता. दवाखान्यातले डॉक्टर हि भूदानकार्यकर्त्यांची फार च आस्थेनें सेवा करात. तें म्हणत कीं, " आम्ही दुसरें काय करू शकतों ? तेव्हा निदान क्रान्ति सैनिकाची सेवा करून च या क्रांतिकार्यात आपली फूल ना फुलाची पाकळी अर्पण करतों !" विनोबा आपल्या सैनिकाना नेहमीं एक वेदवचन सागतात. त्यात म्हटलें आहे कीं, " भद्राला

वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत, शिशिर सारे ऋतु अनुकूल च असतात" वसंताच्या नवपल्लवांतून त्याला देवाकडून आलेला नव्या जगाच्या निर्मितीचा संदेश मिळतो; ग्रीष्माच्या दाहक ज्वालांत त्याला अग्निपरीक्षा घेणारा दयाळु देव दिसतो; आकाशातून कोसळणाऱ्या वर्षेच्या शतसहस्र जलधारांत त्याला हजार हातापायांच्या विश्वरूप देवाचें दर्शन घडतें, शरदातील पौर्णिमेचा पूर्ण चंद्र त्याला देव्हाऱ्यातील स्निग्ध, सौम्य, शांत फुलवातीसारखा भासतो; हेमंताच्या गोठविणाऱ्या थंडीतून त्याला मनातील साऱ्या विकारवासना गोठवून टाकून मन शांत करण्याची प्रेरणा मिळते शिशिराच्या झडत्या पानांतून व स्थिर वृक्षांतून देहाच्या नश्वरतेची नी आत्म्याच्या अमरतेची शिकवण मिळते.

अशा भक्ताच्या तपस्येतून अखिल जगतातील मानवाच्या हृदयात असुराचें निर्मूलन आणि रामाच्या राज्याची स्थापना करूं शकणारी एक प्रचंड शक्ति निर्माण होऊं शकते. त्याचा निर्देश करीत विनोबा प्रवचनात म्हणाले, "कार्यकर्त्यांच्या तपस्येमुळे इथें एक भावना निर्माण होत असलेली मला दिसत आहे. भूदानाची चळवळ वेगाने चालली, तर त्यायोगे साऱ्या जगात शांतता प्रस्थापित करण्याच्या कार्याला मदत होईल. या कोरापुट जिल्ह्यात अहिंसेचे परमाणु स्फोटक तयार होतील असा मला पूर्ण विश्वास आहे. ते तयार करण्याकरता युरेनियम व प्लुटोनियमसारख्या धातूची गरज नाहीं, तर प्रेम आणि भक्तीची गरज आहे."

मागे पुरीच्या सर्वोदयसमेलनात विनोबा म्हणाले होते कीं, "एका सामान्य भौतिक परमाणूत जर इतकी प्रचंड शक्ति लपलेली असते तर चैतन्यपरमाणूत, ज्ञान परमाणूत, केवढी शक्ति असेल!"

माणसाला बहुधा याचा विसर पडतो कीं जी शांति माझ्या हृदयात, जीवनात, नाहीं तिचा प्रसार मी जगभर कसा करणार? विनोबा ग्रामीणांना सांगतात कीं, 'तुम्हीं आपल्या गावात प्रेम व परस्परसहकार्याचें वातावरण स्थापित करा कीं ग्रामशांति होईल. तो च विश्वशांतीचा पाया आहे. तुम्हीं ग्रामदान देऊन स्वामित्वविसर्जन करा कीं तुमच्या गावात क्रांति होईल. त्यातून च जागतिक क्रान्तीला चालना मिळेल.



## ' हेई पारिब '

नरसिंहगुडा
१५ जुलै १९५५

आकाशात मेघनृत्य चालू होतें भाताच्या सरसरलेल्या शेतानें वर्षा स्नान नुकतें च आटोपलें होतें. पण या नयनानन्दकर्षीकडे बघायला फुरसत कुणाला होती ? प्रत्येकाचें लक्ष पायाकडे होतं. फूटभर चिखलाच्या वाटेवर प्रत्येक पाऊल सांभाळून टाकावें लागत होतें. जणू जीवनयात्रेंत कशीं पावलें टाकायचीं त्याचा धडा च मिळत होता.

वेदात वर्णन केल्याप्रमाणे सूर्य जीवनाचा एक तुकडा घेऊन जात होता पश्चिमक्षितिजाच्या टोकावरून जगाकडे अखेरचा दृष्टिक्षेप टाकून तो दृष्टिआड झाला खरा पण आतल्या आकाशात उगवला. त्याच्या प्रकाशात आजच्या दिवसाच्या कृतीचें परीक्षण सुरू झालें. विनोबाची वृत्ति च एकान्तप्रिय अन् अरण्याचा सहवास. मग काय ! तासन्तास ध्यानमग्न असतात ते. 'बाबा, या तेंतुळीगुंटी ठाण्याचे कार्यकर्ते बसले आहेत समोर.' या बुधुभाईच्या शब्दानीं जाग होऊन विनोबानीं वर बघितलें. गुडघ्यापर्यंत धोतर, अंगावर लहानसे उपरणें नी हातीं काठी घेतलेले चाळीस पन्नास खेडवळ समोर बसलेले दिसले बुधुभाई पुढें बोलूं लागले, "या ठाण्यात १९४२ च्या चळवळींत अडतीस हुतात्म्यानी स्वातंत्र्याकरता आपलें जीवन अर्पण केलें." "अस्स ? जिथें इतक्या पवित्र स्मृति दडल्या आहेत तिथ तर साऱ्या च गावात ग्रामदान व्हायला पाहिजे." विनोबा चटकन् उद्गारले. विनोबाच्या या अपेक्षेतील गर्भित प्रश्नाचें उत्तर शब्दात द्यायचें म्हटलें तर गौरवशाली इतिहासाचें स्मरण करीत नव्या क्रान्तींत जीवन समर्पण करण्याचा संकल्प जाहीर करून देवापाशीं शक्तीकरता प्रार्थना करायला हवी होती पण कोपऱ्यात बसलेल्या एका म्हाताऱ्यानें दोन इवल्याशा शब्दात त्यानें उत्तर देऊन टाकलें— 'हेई पारिब' (जरूर होईल). सरत्या संधि प्रकाशात त्याचे खोल गेलेले डोळे आत्मविश्वासानें चकाकत होते.

महात्म्याच्या मुखातून भारतीय हृदयाचा निर्धार प्रकटला 'चले जाओ'—

आम्ही स्वतंत्र आहोंत 'करेंगे या मरेंगे.' दूरवरच्या जगलात राहणाऱ्या या अडाणी खेडवळाच्या कानात पश्चिम किनाऱ्यावरचा वारा येऊन कुजबुजला लगे च एक भली मोठी अहिंसक सेना ठाण्याच्या गावाकडे निघाली. प्रत्येकाजवळच्या मातीच्या हडींत आठ दहा दिवसांची शिदोरी होती तर हृदयाच्या हडींत फार फार लांबच्या प्रवासाची शिदोरी होती. त्याना हें माहींत होतें कीं देह नश्वर आहे, आत्मा अमर आहे. स्वातंत्र्याकरता देहाचें बलिदान करणें हा च देहाचा सर्वोत्तम उपयोग आहे. जगलाची वाट चालत चालत त्यांची सारखी वाढणारी सेना दहाव्या दिवशीं इष्ट स्थानीं पोहोंचली. वाटेंत नदी लागली पलीकडील तीरावर पापडाहडी हें ठाण्याचें मुख्य गाव गाव होतें तिकडे पोलिसाची सेना मारायला सज्ज होती तर इकडील सेना मरायला सज्ज होती गोळीबार सुरु झाला. स्वातंत्र्यसैनिकाच्या मृत शरीराना पोटाशीं धरून अमर आत्म्याचा सत्स्प दशदिशात घुमवीत नदी वेगानें पुढे धावू लागली. 'भारत स्वतंत्र आहे!' आत्म्याचा सत्यस्वरूप, सत्यकामना, पूर्ण झाल्यावाचून राहत नाहीं

एकाग्रचित्ताने सारी कहाणी ऐकल्यावर विनोबा गभीर होऊन म्हणाले, "अहिंसात्मक प्रतिकारात अठ्ठावीस लोक मारले जावेत ही काहीं लहान सहान घटना नव्हे भूदानयज्ञाच्या इतिहासात हें लिहिलं जाईल कीं साऱ्या पुण्याचा लाभ या कार्न्तीला मिळाला या सचित पुण्याईनें भूदानयज्ञाकरता मजबूत पाया घातला आहे भारतात ठिकठिकाणीं असें पुण्य अस्तित्वात आहे पण त्याचा फायदा घेण्याची अक्कल हवी ना!

"१९४२ च्या चळवळींत इथल्या सामान्य लोकानीं महान् पराक्रम केला तसा च तुम्ही आता हि करा कृष्णानें गीतेंत सांगितल च आहे ना 'घेऊनि आसरा माझा भोळे स्त्री वैश्य शूद्र हि ' यांना च जागना यांच्या द्वारें च कार्य होणार आहे रामाचें काम दखील वानरानीं च केले ना?" हें ऐकता च सारे लोक आनदाने उद्गारले, "हॉ हॉ! मॉकडमाने करुथिले (होय होय! माकडानीं च केलें होतें ) आम्ही देखील तसें च करू."

लोक निघून गेल्यानंतर बाबा प्रकट चिंतनाच्या स्वरूपात बोलू लागले, "मी साऱ्या हिंदुस्थानभर हिंडलों पण या कोरापुट जिल्ह्याचा माझ्या

मनावर जो परिणाम झाला आहे तसा परिणाम दुसऱ्या कुठल्या च प्रदेशाचा झाला नाही. याचें कारण काय असेल तें मला माहीत नाहीं. पण इथें भूमिक्रान्ति होण्याचीं चिन्हें मला दिसूं लागलीं आहेत. इथले लोक अशिक्षित असतील पण ते असंस्कृत नाहींत. उलट त्यांच्याजवळ उत्तम संस्कार आहेत."



## जनता म्हणजे कामधेनु

मिरगानगुडा, ऑवली, ऑचला, फरुगाव
१६, १७, १८, १९ जुलै १९५५

निरगानगुड्याला एका बेसिक ट्रेनिंग स्कूलमध्यें आमचा निवास होता. विनोबानीं आजच्या प्रवचनात शिक्षणाबाबत एक नवी दृष्टि दिली. "जिथें ज्ञान व कर्म यामधील भेद नाहींसा होतो, विचारमंथन आणि प्रयोग हे दोन्ही एकरूप होऊन जातात, ती खरी नई तालीम (बेसिक एज्युकेशन, नवें शिक्षण). जुन्या शिक्षणपद्धतींत दिलें जाणारें ज्ञान पोकळ असतें तर आमच्या नव्या शिक्षणपद्धतींतलें ज्ञान भरीव असतें. त्याचें ज्ञान तर्कजन्य तर आमचें अनुभवजन्य. त्या ज्ञानात संशय असेल तर आमच्या ज्ञानात निश्चय."

ऑवली गावात जायचा रस्ता पावसामुळें फार च खराब झाला होता. शेवटच्या दीड दोन फर्लांगात गावच्या लोकांनीं झाडाच्या फांद्या, लाकडें, पुआल वगैरे टाकून भला मोठा सेतू बनवला होता. गावच्या जमिनीचा सहावा हिस्सा दान मिळाला होता व त्याचें वाटप होऊन भूमिहीनाचे सत्तार देखील वाटले गेले होते. संध्याकाळीं ते सारे लोक बाबाना भेटायला आले व त्याना आग्रहानें आपलीं शेतें पाहण्यास नेले. पूर्वीचे मालक व पूर्वीचे मजूर यांचीं शेतें जवळजवळ च होतीं. सान्या शेतात डौलदार पिकें उभीं होतीं जणू भूमिवाटपामुळें प्रसन्न झालेल्या देवाची कृपा च त्या रोपाच्या हिरव्या हास्यातून प्रकट होत होती. बाबानीं त्या लोकाना विचारलें, "तुम्हाला वाटपात जमीन मिळाली तेव्हा तुमच्याजवळ बैल होते का?" ते म्हणाले, "नाहीं,

बैल तर नव्हते पण त्यांना जमीन दिली त्यांनी च आपल्या बैल जोड्यांनीं आमची शेते नागरून दिली व पहिल्या वर्षाच्या पेरणीकरता नीं बियाणे देखील दिलें." जमीन देणारे खिश्चन गृहस्थ शेजारीं च उभे होते. बाबांनी त्याच्या पाठीवरून हात फिरवून त्याना शाबासकी दिली.

अहिंसक क्रांतीच्या यशाचें प्रत्यक्ष दर्शन होते तें ! "का हो, तुम्ही भूमिहीनाना जमीन द्याल पण त्याना बैलजोडी वगैरेंची इतर मदत कुठून मिळणार? त्या साधनाच्या अभावीं ते लोक जमीन पडित टाकतील! आधीं च तर देशात उत्पादन कमी!"—शहरात गेले कीं चहाचा कप रिकामा करून बाजूला सारीत टेबलावर हात आपटून ही च शंका काढणारे घरावरात भेटतात. आज मावळतीच्या सोनेरी किरणात चमकणारीं तीं भाताचीं डौलदार गर्द हिरवीं शेते बघत असताना मनात विचार आला कीं या साऱ्या शंकेखोराना म्हणावे कीं जरा जमिनीला पाय लावून इथे येऊन बघा! विनोबा तर नेहमी म्हणतात कीं, "जनता ही कामधेनु आहे. जे जमीन देतील ते च बैलजोडी वगैरे इतर साधने हि देतील. सर्वांच्या हृदयात वास करणाऱ्या अंतरात्म्यावर श्रद्धा ठेवून विश्वासाने मागा म्हणजे मागाल तें मिळेल!"

ऑचला हें एक मोठें गाव आहे. सकाळीं आम्हीं गावात प्रवेश केला तेव्हा श्यामल वर्णाच्या सुडौल बांध्याच्या गृहिणींनीं हातीं आरतीचीं ताटे घेऊन स्वागत केलें त्यांचे पाणीदार प्रसन्न डोळे काजळाच्या रेघेरीमुळे अधिक च खुलून दिसत होते. या गावाचें ग्रामदान नुकतें च झालें होतें. पण गावात काहीं गणतंत्र परिषदेचे (ओरिसातील राजे व जमीनदार यांचा पक्ष) लोक होते. त्या पक्षाने काहीं भागात ग्रामदानाला विरोध करण्यास सुरवात केली आहे. या गावात हि त्या पक्षाच्या लोकांनीं गावकऱ्याना ग्रामदानापासून परावृत्त करण्याचे प्रयत्न सुरु केले एक दोघे त्यांच्या जाळ्यात सापडले व आम्ही आपलें दान मागें घेतो असे म्हणू लागले. तेव्हा त्यांचें दान त्याना परत करण्यात आलें. विनोबा म्हणाले, "काहीं ठिकाणीं विरोध सुरू झाला आहे हें एक शुभलक्षण आहे. यामुळें आपली चांगली कसोटी होईल"

# कौरव-पांडव-युद्ध

रानीगुडा
२० जुलै १९५५

वाट चालताना चोहींकडे लसलसणाऱ्या पोपटी रंगाच्या नवांकुरांनी नटलेली भाताचीं शेतें दिसतात. कुठें हि दृष्टि फिरवा, शांति आणि प्रसन्नता पसरलेली दिसते पहाटेच्या वेळेस शेतावर दवबिंदूच्या फुलाचा सडा पडलेला दिसतो. ' माता भूमि पुत्रोऽहं पृथिव्या 'चा स्निग्धगंभीर निर्घोष ऐकून धरित्रीच्या नेत्रांतून ओघळलेलीं आनंदाचीं आसवें होतीं जणू तीं ! धरित्री म्हणत असेल, ' सारीं माझीं बाळें ! माझ्या कुशींत जन्म घेतात व माझ्या कुशीत च झोपी जातात. पण मधल्या काळात त्याना ह्याचा विसर पडतो. कोणी म्हणतो माझ्या कातडीचा रंग तुझ्या रंगाहून वेगळा आहे तर कोणी म्हणतो माझ्या पूर्वजाची परंपरा तुझें जग वेगळें असल्याचें सांगत आहे. कोणी आपल्याभोंवतीं उन्ची वस्त्राचे पडदे व हिऱ्यामाणकाच्या दगडी भिंती उभारतात तर कोणी जाड्या विद्वत्तेच्या परकोटात आपल्या अभिमानात चूर राहतात. तर कोणी सत्तेच्या उच्च मिनारावरून खालच्या जगाकडे अधिक्षेप टाकतात—' तू काळा, तू हरिजन, तू गरीब, तू अशिक्षित, तू दुर्बल ' म्हणून एक मानव दुसऱ्या मानवाला दूर लोटतो आणि मग भ्रातृभावाला पारखा झालेल्या मानवाना मातृभक्तीचा देखील विसर पडतो. युगानुयुगें लेकरीं, धरित्री हें सारें उघड्या डोळ्यांनीं बघत होती. कधीं कधीं तिला हें असह्य होऊन तिच्या हृदयाचा थरकाप व्हायचा ! पण तिच्या मुलाना तें उमगायचें नाहीं नी ते आपलीं धरणीकपानें पडलेलीं घरें पुन्हा उभारण्याच्या उद्योगाला लागायचे. पण आता ' भूमि आपली माता, आपण सारे भूमिपुत्र, भूमिपति ईश्वर ' ह्या मंत्राचा अखंड कर्मप्रेरक जप सुरू झाला आणि भेदाच्या भिंती ढासळू लागल्या. भूमिपुत्र या नात्यानें भाऊ भावाला भेटू लागला म्हणून च तर सर्वांचें धारण करणाऱ्या धरणीच्या नेत्रात आज आशीर्वाद अश्रू तरळताना दिसले !

बाबा नेहमीं म्हणतात कीं, " आपलें काम हे धर्मचक्रप्रवर्तनाच काम आहे. त्यामुळें कार्यकर्त्यांच्या चित्तशुद्धीनें व जीवनशुद्धीनें च त्या कामाला

गति प्राप्त होऊ शकेल." नारायण देसाईंच्या नुकत्या च आलेल्या पत्रात त्यानें बाबांना प्रश्न विचारला होता कीं "अहंकारनिवृत्ति कशी होईल?" बाबांनीं नारायणाला लिहिलें कीं, "अहंकारनिवृत्ति तीन तऱ्हेनें होते : (१) ज्या समाजानें आपल्याला विविध ज्ञान दिलें त्या समाजामुळें च आपलें सारें कर्तृत्व भासमान होतें या जाणिवेनें, (२) देह, इन्द्रियें, मन, बुद्धि इत्यादि सर्वांहून आपण वेगळे आहोंत नी कर्तृत्व हे त्यांचें आहे, आपलें नव्हे, या ज्ञानानें, (३) कर्ता करविता ईश्वर आहे, आपण फक्त त्याच्या हातातील बाहुलें आहोंत, या श्रद्धेनें."

मध्यप्रदेशाच्या भूदान यज्ञ समितीचे संयोजक श्री दादाभाई नाईक गेल्या दोन दिवसापासून यात्रेत आहेत. बाबांना ओरिसानंतर मध्यप्रदेशात येण्याविषयीं आग्रह करण्याकरता म्हणून ते आले आहेत. भूदानाच्या कामाची सामान्य चर्चा आटपल्यानंतर त्यांनीं आज वाटेंत समाजसेवा, चित्तशुद्धि इत्यादिविषयीं प्रश्न विचारले. बाबा म्हणाले, "अहंकाराचा पूर्णपणें लोप झाल्याशिवाय माणसाच्या हातून खरी समाजसेवा च होऊ शकत नाहीं. अहंकाराचा लोप म्हणजे च मोक्ष प्रयत्न करणें हे माणसाच्या हातीं आहे. माणूस स्वतःच्या प्रयत्नानीं मुक्त होऊ शकत नाहीं पण प्रयत्न केल्याशिवाय हि मुक्त होऊ शकत नाहीं. याचा अर्थ असा कीं आपल्याला सतत प्रयत्न करीत राहिलें पाहिजे. मग आपली आन्तरिक उत्कट इच्छा पाहून ईश्वर आपल्याला मुक्त करील. मागें मी एकदा वर्ध्याला सकाळीं फिरायला गेलो होतो. तेव्हा एका भल्या मोठ्या रिकाम्या टाक्याच्या तळाशीं एक लहानसा किडा सारखा वर चढण्याची भटपड करताना दिसला. तो एखादा इंच वर चढायचा नी पुन्हा खालीं पडायचा. आता तो बिचारा किडा आपल्या प्रयत्नानें एवढें टाके चढून वर था येऊ शकणार होता? पण तो सारखा प्रयत्न करीत होता. शेवटीं मला त्याची दया आली नी मीं त्याला वर काढलें. ईश्वर माणसाला केव्हा नी कशी मदत करतो याचें त्या दिवशीं मला दर्शन घडलें. त्या किड्यानें अखंड धडपड केली नसती तर मला काहीं त्याला वर काढण्याची इच्छा झाली नसती."

नंतर इतर विषयांवर चर्चा सुरू झाली. कोणी तरी म्हणाले की 'आमच्या भागात भूदानाचें काम करणारे सारे सामान्य च लोक आहेत, बड्यांपैकीं कोणी च नाहींत.' यावर बाबा म्हणाले, "मोठ्यांविषयीं आदर राखावा, त्याचा आधार घेऊं नये. पण आजकाल उलटें च आढळतें. मोठ्यांविषयीं आदर तर नसतो च पण त्याचा आधार मात्र हवा असतो." व्यक्ति व संस्था यांविषयीं बाबा एकदा म्हणाले होते कीं, "माझा व्यक्ती वर जेवढा विश्वास आहे तेवढा संस्थांवर नाहीं. संस्था फक्त थोडी फार मदत करतील पण एक देखील शुद्ध व्यक्ति साऱ्या जगात क्रान्ति घडवून आणूं शकते."

रानीगुड्याच्या प्रवचनात विनोबांनीं मानवी मनात चालणाऱ्या सनातन युद्धाचें वर्णन केलें—"जगात दोन शक्ति परस्परविरुद्ध लढत असतात. एक आहे धर्माची शक्ति नी दुसरी आहे पापाची शक्ति. धर्म हृदयें जोडतो तर पाप हृदयें तोडतें. आजकाल पापाची शक्ति पैशाच्या रूपानें प्रकट झाली आहे. पापाचा पुत्र लोभ आणि लोभाचा पुत्र आहे भोग. धर्माचा पुत्र आहे प्रेम आणि प्रेमाचा पुत्र आहे त्याग. एकीकडे कौरव तर दुसरीकडे पांडव. आता व्यक्तिगत स्वामित्वाच्या विसर्जनाच्या प्रक्रियेला आरंभ झाल्यापासून पांडवांचा जोर वाढला आहे. ग्रामदान देऊन पांडवसैन्यात दाखल व्हायचें कीं जमीन व संपत्तीची मालकी घट्ट पकडून ठेवून कौरवसैन्यात जायचें ते तुमचें तुम्ही च ठरवा."

रानीगुड्याला दाट अरण्यात डोंगराच्या पायथ्याशीं, नदीच्या सान्निध्यात हिरवळीवर बांधलेल्या पानांच्या झोपड्यात आमचा निवास होता. दिवस भर पावसाची झड लागली होती. हवेंत इतका गारवा आला होता कीं दिवसभर ऊबदार पांघरूण घेऊन एखादें पुस्तक वाचीत किंवा बाहेरचें सृष्टि सौंदर्य न्याहाळीत पडावेंसें वाटलें. मात्र झोपडीमागच्या नदीवर वाघोबा रोज दर्शन देतात असें ऐकल्यामुळें अंधार पडल्यानंतर मी बाबांकडे जाण्याकरता झोपडीबाहेर पडलेली पाहता च मंगलामावशी म्हणाल्या, "एकटी नको जाऊंस बाहेर, मी येतें. निदान कंदील तरी घेऊन जा." थोड्या वेळानें मी परत आलेली पाहून शेजारच्या झोपडींतून कुसुमताईंनीं विचारलें,

"काय मावशी, तुमची भाची सुरूप परत आली का?"—'हो आली वर!' असें किंचित् रागावून उत्तर देत लगे च त्या माझ्याकडे वळून म्हणाल्या, "हे पहा, दरवाजाजवळ माझा बिछाना अंथरू दे. तू भिंतीजवळ झोप."



## तेव्हां आणि आतां

कोरापुट
२१ जुलै १९५५

आमचा आजचा निवास ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं खास आपल्याकरता म्हणून बांधलेल्या एका उच्च टेकडीवरील 'सर्किट हाउस'मध्यें होता. बंगल्याची रचना युरोपांतल्या नगरांतील एखाद्या सुंदर बंगल्यासारखी होती. साऱ्या आधुनिक सुखसोयी, उंची फर्निचर, मऊ मऊ गालिचे, समोरच्या अंगणांतील हिरवळीच्या पार्श्वभूमीवर खुलून दिसणारे रंगीबेरंगी फुलांचे ताटवे, सारें कांहीं जुन्या युगाची आठवण करून देणारें होतें. आता काळ बदलत होता. जिथें गौरकाय अधिकारी च तेवढे राहत तिथें नेतरुम्याच्या वेशांतली एक चाळीस पन्नास माणसांची एक टोळी राहण्याचा हा आजचा पहिला च प्रसंग असेल. आणि त्या टोळीचा नायक तर इतका गावंढळ कीं सूटबूट तर बाजूला च राहू द्या पण त्याच्या अंगावर गुडघ्यापर्यंतच्या धोतरापलीकडे दुसरें वस्त्र देखील नव्हतें. मुळमुळ पडदे हलक्या च हातानं बाजूला सारणाऱ्या सळसळत्या रेशमी वस्त्रांतल्या रमणा च जेथें दिसत तिथें आज जाडीभरडी खादीचीं लुगडीं नेसलेल्या राकट नायका धुणीं आपटत होत्या. हें सारें पाहून सातासमुद्रापलीकडे गेलेले साहेब हळहळत म्हणतील 'कालाय तस्मै नमः।'

धुण्याचे पिळे खांद्यावर टाकीत अंगणांत येऊन चहूंकडे बघितलें—दूरवर पसरलेल्या सागुन धुक्याच्या पडद्याआडच्या निळसर टेकड्यांच्या रांगा, भडक पोपटी रंगापासून तो दाट हिरव्या रंगापर्यंतच्या निरनिराळ्या छटा

असलेल्या भातशेताने चौकोन व त्याना उठाव आणणारे लाल मातीचे चौकोन, आकाशात उगीच च भटकणारे पांढरे ढग व त्याच्या आडून येणारे पिवळे पिवळगर ऊन. सारे दृश्य इतके चित्तवेधक होते की दृष्टि त्यावर च खिळून राहिली. राजा देखील ते दृश्य पाहून हसत म्हणाले, "आपल्या भूदान समितीच्या कार्यालयावरता हे स्थान चांगले आहे नाहीं का? नाहीं तरी या बगल्याचा फारसा उपयोग होत नाहीं च!"

त्या रमणीय स्थानावरचें प्रवचन त्याहून हि रमणीय झालें—"कोरापुट-मध्ये ग्रामदानाचें जें पाऊल आपण उचललें आहे तें भूदान आरोहणातील अखेरचें आणि क्रांतिकारी पाऊल आहे आता येथील शहरातील लोकांनी संपत्तिदान देऊन या क्रान्तिकार्यात सहकार करायला हवा. ज्या गावाचें ग्रामदान होईल तिथें सर्वप्रथम एक चतुर्विध योजना अमलात आणण्याचा प्रयत्न केला जाईल—(१) विहिरी, पाटबधारे वगैरे बाधून पाण्याची व्यवस्था करणें व बैलजोड्या, उत्तम बीबियाणें यासारखीं शेतीचीं साधनें पुरवणें, (२) ग्रामोद्योग चालू करणें, (३) ग्रामोद्योगप्रधान आध्यात्मिक आणि व्यावहारिक शिक्षण देण्याची योजना करणें, आणि (४) आरोग्ययोजना करणे. काहीं लोक असा आक्षेप घेतात कीं नुसत्या भूमीच्या वाटपानें प्रश्न कसा सुटणार? त्याना मी हें सागू इच्छितो कीं मी एकट्या रामाचें च नाव घेत नाहीं तर 'सीताराम'चा जप करतों. सीता म्हणजे भूमीचें वाटप व राम म्हणजे ग्रामोद्योग."

शिक्षणाविषयीं बोलताना विनोबा म्हणाले, "शिक्षण विभाग हा सरकारी नियत्रणापासून सर्वथा स्वतत्र असायला पाहिजे. शिक्षणावर सरकारचा अकुश असेल तर मग जसें सरकार असेल तसें शिक्षण दिलें जाईल. फॅसिस्ट सरकार असेल तर देशातल्या तमाम सर्व शाळातील सर्व मुलाच्या डोक्यात फॅसिझम ठासून भरला जाईल व कम्युनिस्ट सरकार असेल तर देशातील सर्व मुलाना कम्युनिझमचे पूजक बनविण्यात येईल. म्हणजे जोंवर शिक्षणावर सरकारी नियत्रण राहील तोवर खरे विचारस्वातत्र्य अस्तित्वात च येणार नाहीं. हा च विचार जुन्या भाषेत माडायचा झाल्यास असे म्हणता येईल कीं शिक्षण ऋषींच्या, ब्राह्मणाच्या हातीं असायला हवें, राजाच्या नव्हे. प्राचीन काळात

ऋषींच्या आश्रमात कोणता शिक्षणक्रम असावा याविषयीं हुकूम देण्याची मोठ्यातल्या मोठ्या सम्राटाची छाती होत नसे. सम्राटाचा मुलगा इतर सामान्य मुलांसोबत ऋषींच्या आश्रमात शिक्षण घेई.

" दुष्यन्तासारख्या शक्तिशाली व लोकप्रिय राजाची कहाणी आहे ही. एकदा राजा शिकार करायला निघाला. हिंडता हिंडता तो कण्वमुनींच्या आश्रमाजवळ पोहोचला. तिथें त्याला एक हरीण दिसलें. हरणाला मारण्याकरता राजानें धनुष्यावर बाण चढवला. तेवढ्यात एक लहानसा आश्रमबालक समोर येऊन निर्भयपणें राजाला म्हणाला, "आश्रममृगोऽयं न हन्तव्यो न हन्तव्यः।" ( हा आश्रम-मृग आहे. तुम्ही याला मारू शकत नाहीं. ) ही आहे आपली भारतीय संस्कृति. जिथें आश्रमाचा एक लहानसा पोर सम्राटाला अडवण्याची हिंमत करू शकतो ती च संस्कृति पुन्हा आणायची आहे आपल्याला ! "

बाबाचे हे शब्द ऐकत असताना एक अद्भुत अनुभूति घडली. सूर्यास्ताची वेळ होती. प्राचीला उजळीत आलेला सविता प्रतीचीला उजळीत जात होता. आकाशाच्या पटलावर संध्याछटाचीं विविध चित्रें चितारलीं होतीं. पण अंतरीच्या आकाशातील चित्र त्याहून हि अधिक रमणीय होतें. अरण्यात हरिणाच्या शोधार्थ दिवसभर भटकून श्रान्त झालेल्या सम्राटाला एक गोजिरवाणें पाडस दिसतें. अत्यानंदानें तो धनुष्याची दोरी ओढणार इतक्यात एक कोमल पण निश्चयी स्वर त्याच्या कानीं पडतो – ' न हन्तव्यो न हन्तव्य । ' राजा चपापतो त्याचा धनुष्यावरचा हात सैल पडतो. ' अनावृतम् पुष्पम् 'सारखा निरागस बालक त्याच्या समोर येऊन उभा राहतो. त्याच्या गुरूने त्याला नुकता च न्यग्रोधाच्या बीजाचा धडा शिकवलेला असतो. ' तत्त्वमसि ' हा घोष सतत त्याच्या कानावर असतो. त्यामुळें ' पृथिवीचा प्रभु ' म्हणवून घेणाऱ्या सम्राटाची त्याला काय पर्वा ? ' राजा, धनुष्याच्या दोरीवरचा हात काढ.' तो सहजपणें राजाला आज्ञा करतो आणि राजा निमुटपणें ती आज्ञा पाळतो ' आर्तत्राणाय हि व शस्त्र न हि प्रहर्तुमनागसि । ' ' दुर्बलाचें रक्षण करण्या-

करता तू शस्त्र हातीं घेतलें आहेस. निष्पापाला मारण्याकरिता नव्हे.' आश्रमचालक सम्राटाला त्याच्या कर्तव्याची जाणीव करून देतो.

आणि आज ? कारखान्यातल्या दिवसभराच्या कष्टानीं थकलेला जीव विसाव्याकरता घरीं येतो आणि नकळत त्याच्या मुखातून काहीं तरी उद्वेगाचे उद्‌गार बाहेर पडतात. भिंतींना लावलेल्या यंत्राच्या 'कानाना' ते शब्द ऐकू जातात काळोख पडू लागता च दारावर कोणी तरी थाप मारत असल्याचं ऐकून तो दार उघडतो नी हुकूमशहाच्या दूताच्या लाथ लाथ हाताचा चिळखा त्याच्या गळ्याभोंवतीं पडतो. ते त्याला कुठेंतरी दूर घेऊन जातात व मग मध्ययुगातल्या गुलामाला कल्पना हि नसेल इतकें भयंकर जीवन त्याला घालवावें लागतें.

अत्यल्प काळानें विमानानें पृथ्वीप्रदक्षिणा करून येणारा, घरबसल्या टेलिव्हिजनवर अनेक मैलावरचीं दृश्यें बघणारा, यंत्राला गुलाम बनवू पाहत स्वत च यंत्राचा गुलाम झालेला, विसाव्या शतकातल्या पुढारलेल्या राष्ट्रा तील 'सुसंस्कृत' मानव कुठें नी अरण्यात राहून, गुरुसेवा करीत, विश्वाचें कोडें उलगडणारी ब्रह्मविद्या प्राप्त करीत, सम्राटाला हुकूम सोडणारा प्राचीन युगातला तो आश्रम चालक कुठें !

## सप्तसूत्री आरोग्य-योजना

डुमरागुडा, मुनावेडा
२२, २३, २४ जुलै १९५५

टेकडीला वळसा घालणाऱ्या नागमोडी रस्त्यावरचें एक वळण ओलांडलें नों च रस्त्याच्या कडेला लावलेल्या एका पाटीनें लक्ष वेधलें. पाटीवर एका गावाचें नाव लिहून खालीं लिहिलें होतें 'सर्वस्वदान.' दूरवर टेकड्यांच्या पायथ्याशीं झोपड्यांची रांग दिसत होती. विनोबा या रस्त्यानं जाणार तेव्हा आपण सर्वस्वदान दिलें हें त्यांना कळण्याकरता गावकऱ्यांनीं ही युक्ति शोधून काढली होती. विनोबा कौतुकानें म्हणाले, "आपण सर्वस्वदान दिल्याची गोष्ट हे लोक अभिमानानें जगासमोर जाहीर करीत आहेत ही मोठी आनंदाची गोष्ट आहे."

टेकड्यांच्या रांगांत लपलेल्या मुनावेडाच्या बेसिक ट्रेनिंग स्कूलच्या आवारांत पाऊल ठेवतां च बगीच्यातील लाल गुलाबाकडे व बहरलेल्या चमेलीच्या वेलीकडे माझें लक्ष गेलें. पण बाबांचें लक्ष दुसऱ्या च गोष्टीनें वेधलें. शाळेंतील एका वैद्यानें शाळेच्या आवारांतील आठ गुंठ्यांच्या शेतांत एक वनस्पतींचा बगीचा लावला होता. त्यांत साठ ओषधी वनस्पती नीट ओळीनें लावल्या होत्या. प्रत्येक झाडावर त्याच्या नावाची पाटी होती. या कामाची प्रशंसा करीत आजच्या प्रवचनांत त्यांनीं खेड्यांकरता सप्तविध आरोग्य योजना मांडली. ते म्हणाले,

"(१) आमच्या योजनेंतील पहिली गोष्ट ही कीं कुणाला रोग च होऊ नये असे प्रयत्न करणें. त्याकरता सर्वांना समतोल आहार मिळायला हवा. प्रत्येक मनुष्याला अन्नाबरोबर निदान एक शेर दूध व भाज्या, फळें मिळायला च हवींत. (२) खेड्यांतल्या लोकांना स्वच्छतेचें ज्ञान करून द्यायला हवें. (३) त्यांना व्यसनांपासून मुक्त करायला हवें. आणि अशा विविध योजना अमलांत आणून देखील जर रोग आले तर त्यांच्या निवारणार्थ खालील चतुर्विध योजना करायला हवी—(१) प्रत्येक खेड्यांत एक ओषधी वनस्पतींचा बगीचा हवा. वनस्पतींच्या ताज्या रसाचा ओषधा

करता उपयोग करावा. त्यात संशोधन हि सतत करीत रहावें. (२) निसर्गोप-चाराची सामान्य माहिती— म्हणजे जुन्या भाषेत पंचकर्म— सर्वांना द्यावी. (३) पथ्यापथ्याचें ज्ञान सर्वांना करून द्यावें. (४) मलेरियासारख्या साथीच्या रोगाकरता किनाईनसारख्या आंतरराष्ट्रीय मान्यता मिळालेल्या औषधाचा उपयोग करावा."

नवजीवन मंडळाच्या सभेकरता सुनाबेडाला आमचा दोन दिवस मुक्काम होता. ग्रामदानाच्या गावांत नवनिर्माण कार्य करायचें यासंबंधीं चर्चा चालू होती. आज दादाभाईंनीं नागपूरला परत जातांना मध्यप्रदेशांत येण्यासंबंधीं विचारलें, तर बाबा म्हणाले, "पुढच्या कार्यक्रमासंबंधीं मी कांहीं विचार च करीत नाहीं. आजकाल माझ्या डोक्यांत कोरापुट खेरीज दुसरा विचार च येत नाहीं."

सरकारतर्फे आदिवासींकरता चालणाऱ्या 'आश्रम स्कूल'ला दुपारीं बाबांनीं भेट दिली. शाळेचीं मुलें नीट ओळीनें उभीं होतीं. बाबा प्रत्येकाला नांव विचारीत व नांवावर कांहींतरी कोटी करून सर्वांना हसवीत. राम, कृष्ण यासारखीं कांहीं तर परिचित च नांवें होतीं पण कृपासिंधु, अनिरुध्द, डमरुधर वगैरे नांवें अपरिचित वाटलीं. ओरिसांत अशीं नांवें बरीं च प्रचारांत आढळतात पण सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे ओरिसांत 'दुर्योधन' व 'दुःशासन' हीं नांवें फार आढळतात. इथले लोक अभिमानानें सांगतात कीं कौरव पांडवांच्या लढाईत आमचा राजा कौरवांच्या बाजूनें लढला. आमच्या भूदान कार्यकर्त्यांत देखील तीन चार 'दुर्योधन' आहेत!

दुसऱ्या दिवशींच्या सभेंत स्त्रियांची संख्या खूप मोठी होती. बाजारचा दिवस असल्यामुळें नरे च पुरुष सभेला येऊं शकले नव्हते. आज बाबांनीं खास स्त्रियांकरता प्रवचन दिलें. "देवानें स्त्रियांवर ल्हान मुलांच्या पालन पोषणाची एक फार च मोठी जबाबदारी सोंपवली आहे. स्त्रियांनीं भूदानाचें तत्त्वज्ञान नीट समजून घ्यावं कारण त्यानें सर्व च मुलांचें उत्तम पालन होणार आहे. आज ज्यांच्याजवळ जमीन नाहीं त्यांच्या मुलाबाळांची काय स्थिति होत असेल याचा तुम्ही च विचार करा आणि मग सांगा कीं सर्वांना

जर्मान मिळायला हवी की नको ते! माझा हा अनुभव आहे. कुठें हि स्त्रिया या प्रश्नाचें होकारार्थी च उत्तर देतात. मुलाला भूक लागली कीं तें आईपाशी च जाऊन खायला मागतें. अशा वेळीं आई त्याला खायला देऊं शकली नाहीं तर तिच्या हृदयाला होणाऱ्या यातनांहून मोठें दुःख जगात दुसरें कोणते च नसेल. म्हणून भूदानाची चळवळ ही आयांच्या दृष्टीनें 'अमृत' आहे. तेव्हा स्त्रियांनीं आपल्या घरच्या पुरुषांना हें तत्त्वज्ञान समजावून सांगून त्याना ग्रामदान देण्याची प्रेरणा द्यावी."



## शांतिमय क्रांति

दाळिआम
२५ जुलै १९५५

दिवस-रात्रीच्या मीलनाचा काळ होता. दिवसाच्या प्रकाशाची दाहकता उरली नव्हती, तेजस्विता राहिली होती. रात्रीचा काळोख आला नव्हता, पण प्रशांतता आली होती. सध्यासमय म्हणजे ध्यानाची वेळ. अस्ताचलास जात असलेल्या सवित्याला बुद्धीला उत्तम प्रेरणा देण्याची प्रार्थना करण्याचा काळ! उंच टेकटीवरच्या निवासस्थानावरून मीं चोहींकडे दृष्टि टाकली. दगाशीं गुलगोष्टी करणाऱ्या डोंगराच्या रागामधील दऱ्यांतून उतरणीवरच्या भाताच्या शेताना वळसा घालीत जाणाऱ्या पायवाटांवरून रंगीबेरंगी पोशाखातील माणसांच्या रांगा निरनिराळ्या दिशांकडे जाताना दिसल्या. तीं सारीं माणसें एका च ठिकाणाहून निघालीं होतीं. प्रार्थना-सभा नुकती च आटपली होती. शेजारच्या आठ गावांचे लोक सर्वस्वदानाचीं दानपत्रें घेऊन आले होते. एका गावचा नाईक समोर आला. जनसमुदायाच्या रूपानें अवतरलेल्या जनार्दनाला साक्षी ठेवीत हसऱ्या डोळ्यांनीं, कापऱ्या हातांनीं कांहीं कागद विनोबांच्या हातीं देत म्हणाला—"आम्हीं ग्रामदान दिलें. आता आम्ही सारे वाटून खाऊ व सुखी होऊं." दुसरा आला व ग्रामदानाचीं दानपत्रें देत किंचित् थिटारलें म्हणाला, "आता आम्ही सर्वजण

मिळून सर्वांच्या कल्याणाचा विचार करू." तिसरा एक तरुण आला व उत्साहानें बोलू लागला, "आमच्या गावात कोणी हि जमिनीचा मालक राहिला नाहीं, जमीन सर्वांची झाली तुमच्या आशीर्वादाने आता आम्ही खूप नव्या गोष्टी करू." चवथा कागदाबरोबर फुलें अर्पण करीत म्हणाला, "आजवर आम्ही एकमेकाची पर्वा केली नाहीं म्हणून दुःखी झालों. आता आमच्या गायात दुःख राहणार च नाहीं." विनोबाजी कौतुकाने त्या सर्वांच्या मुखींचें ग्रामदानाचें तत्त्वज्ञान ऐकत होते. आठ गावाच्या आठ लोकांनीं कृतिकुसुमासहित शब्दसुमने उधळीत शांतिमय क्रांतीचा जयजयकार केला. शांतीच्या नावाशीं निगडित असलेल्या, जुनी समाजरचना च कायम ठेवू पाहणाऱ्या, परिवर्तनविरोधी स्मृति लोपू लागल्या होत्या. शांतीच्या नावाला लागलेले हिंसेचे लाल डाग पुसले जात होते. सवित्याच्या तरुणीय तेजाच्या ध्यानानें बुद्धीला नवी प्रेरणा मिळत होती— विषमता व शोषण नाहींसें होऊ शकतें, शासन लोपू शकतें, सर्वांचा उदय होऊ शकतो. शांतीच्या शक्तीची उपासना करा. शांतींतून क्रांति निर्माण होईल.

अंधार पडला. दिवसाचीं कामें आटोपून आम्ही सारे ग्रामापाशीं गप्पा मारायला बसलों. मी प्रश्न विचारला—"परवा आपण म्हणाला होता कीं नवीन जन्म घेता च पूर्वकर्म सपतें व नवीन पुरुषार्थ सुरू होतो. पण जीवनातील कित्येक सुखदुःखाचा व घटनाचा संबंध या जन्माशीं असलेला दिसत नाहीं. त्याना पूर्वकर्म च कारणीभूत असावेंसें वाटतें."

बाबा—"सुखदुःखें ही मनावर अवलंबून आहेत. सुखदुःखाचा जर माझ्यावर काहीं परिणाम च झाला नाहीं तर माझ्या दृष्टीनें त्याना अस्तित्व च नाहीं असें म्हणावें लागेल. घटना पूर्वकर्मानुसार घडतात त्याबद्दल वाटून घेणें वा न घेणें आपल्या हातीं असतें. मी नेहमीं म्हणतों कीं मला जीवनात दुःख म्हणून माहीत नाहीं, माझें जीवन आनंदमय आहे. पण याचा अर्थ असा नाहीं कीं माझी आई मेली नाहीं कीं मला रोग झाले नाहींत. परंतु आई गेली ती कल्याण च करून गेली व रोग झाले ते ज्ञान देऊन गेले."

# भूदानाचे प्राचीन प्रचारक

सेमिलीगुडा, मातलपुट
२६, २७ जुलै १९५५

मातलपुटची वाट दाट जंगलांतली होती. वाटेंत तीन नद्या पार केल्या. थोडी वाट चालून जाता च एक चाफ्याचें झाड दिसलें. झाडाखालीं तीन पायऱ्यांच्या चबुतऱ्यावर एक शिवलिंग होतें. मधून मधून वारा झाडाला हलके च हलवून जायचा नी शिवलिंगावर फुलांचा वर्षाव व्हायचा. ते पाहता च बाबा एकदम थबकले व त्यावर दृष्टि रोखीत म्हणाले, "किती सुरेख योजना आहे ही! आपोआप पूजा चालली आहे. आणि या तीन पायऱ्या म्हणजे भुर् भुव. सुवः। आणि त्यावर तो परमात्मा!"

वाटेंत उभयाच्या 'भुवनेश्वरा'कडे पाहत बाबा म्हणाले, "वा! काय आनंद! मला रोज भुवनेश्वर, कोणार्क, मीनाक्षी सारख्या मंदिरांचें दर्शन घडतें आहे. मीं अनेक मंदिरें पाहिलीं पण कोणार्कच्या सूर्यमंदिराविषयीं मला विशेष च आकर्षण वाटलें. सूर्यनारायणाच्या रथाच्या आकृतीचें तें भव्य मंदिर, समोर सात घोडे नी रथाचीं चोवीस चाकें. सूर्य म्हणजे कालात्मा, सात घोडे म्हणजे आठवड्याचे सात दिवस, चोवीस चाकें म्हणजे वर्षाचे चोवीस पंधरवडे. ही सर्व कल्पना च फार महान् आणि भव्य आहे. त्या मंदिराच्या भिंतींवर जगांत चालणारे सारे व्यवहार अंकित आहेत. सूर्य हा प्रेरणा देणारा आहे. त्याच्या प्रेरणा अनंत असतात. त्यामुळे त्याच्या मंदिरावर हास्य, शोक, युद्ध, खेळ, नृत्य, संगीत, मिथुन, मृत्यु वगैरे सर्व भिन्न भिन्न प्रेरणा चित्रित केलेल्या आहेत. बाहेर या सर्व प्रेरणा आहेत नी आंत मंदिरांत या सर्वांपासून अनासक्त सूर्यभगवान् अंतर्यामी विराजमान झाले आहेत काहीं लोकांना त्या मंदिरावरील शृंगारिक मूर्ती अतिशय घृणास्पद वाटल्या. काहीं तर असें हि म्हणाले कीं त्या मूर्ती फोडून च टाकायला हव्यात. पण माझ्या मनावर तर त्या मूर्ती पाहून चांगला च परिणाम झाला. रवीन्द्रनाथ ठाकुरांनीं आपल्यांत असें मानलें आहे कीं, 'मिथुनदर्शनम् मंगलम्' मिथुनाचें दर्शन हें मंगलदर्शन आहे, वाईट दर्शन नव्हे, असें म्हणून त्या मूर्तींचा बचाव केला. पण मी त्या मूर्तींकडे

अशा दृष्टिकोणातून पाहतों, कीं ह्या साऱ्या जीवनाच्या भिन्न भिन्न प्रेरणा आहेत. त्या सर्वांची प्रेरक शक्ति सूर्यनारायण आहे. तो च नारायण अनासक्त रूपानें आपल्या हृदयात विराजमान आहे. ''

भाताच्या हिरव्यागार शेताचें सौंदर्य डोळ्यात साठवीत, झऱ्याचा गोड गुंजारव ऐकत यात्रा चालली होती. दूरवरच्या डोंगराच्या कुशींतल्या लहानशा झोपड्या दिसू लागल्या. थोड्या च वेळात पाश्चात्य संगीताचे स्वर कानीं पडले. गावचे ख्रिश्चन लोक विनोबाचें स्वागत करण्याकरता प्रभु येशूचें भजन गात होते. दहावीस पावलें पुढे गेल्यावर हातीं आरती, कलश नी हार घेऊन हिंदु लोक स्वागताला उभे असलेले दिसले. गावाचें नाव ' मरीचो माळ ' आहे असें कुणीतरी सागता च विनोबा म्हणाले, '' नाव तर मोठें छान आहे ! भगवान् मरीचीप्रमाणें तुमचें हि यश सर्वत्र पसरो. '' मग त्यानीं ख्रिश्चनाना विचारलें, '' प्रभु येशूनें कोणता संदेश दिला तें माहीत आहे ना ? '' चटकन् उत्तर मिळालें— '' सर्वांवर प्रेम करा व तुमच्याजवळ जें काहीं असेल तें वाटून द्या ही प्रभु येशूची शिकवण आहे.'' हें ऐकता च विनोबाजी म्हणाले, '' फार छान ! भगवान् कृष्णानें हि गीतेंत हे च सांगितलें आहे व महमद पेगंबरानें देखील कुराणात हा च प्रेम संदेश दिला आहे.'' मग विनोबानी गावच्या मुखियाला विचारलें, '' काय, हें गाव ग्रामदानात मिळणार ना ? '' मुखिया विचार करू लागलेला पाहून इतर लोक त्याला म्हणाले, '' अहो, म्हणा कीं हो ! सांगा विनोबाजींना कीं आम्ही सारे वाटून खाऊ.'' सर्वांच्या आग्रहाखातर मुखियानें होकार दिला, अन् मग लोकानीं आनंदानें गर्जना केली—'' आम गाँवे भूमि-मालिक, रहिबे नाही, रहिबे नाही. '' '' ग्रामदान, सफल हेऊ ! ''— कालपर्यंत त्या गावातल्या हिंदु व ख्रिश्चनाचीं दोन भिन्न जगें होतीं पण ग्रामदानाच्या मंत्राचा जप होता च सारीं भेदाचीं भूतें भिऊन दूर पळतात.

आणि हें सारें फक्त दहा मिनिटात घडलें ! विनोबानीं आजच्या प्रवचनात म्हटलें, '' हें काहीं दहा मिनिटाचें काम नाहीं. गेल्या दोन तीन महिन्यापासून भूदानाचे कार्यकर्ते या भागात सारखे हिंडून प्रचार करीत आहेत. पण हें

काम त्यांच्या प्रचारामुळें हि झालें नाहीं. आमच्या कामाचा प्रचार तर भगवान् कृष्ण, प्रभु येशू, महमद पैगंबर यांनीं च करून ठेवला आहे."

गांवकऱ्यांना उद्योग आणि सहकार्याचें महत्त्व समजावून सांगतांना विनोबांनीं आपला प्रिय पांच बोटांचा दृष्टान्त देत म्हटलें, "हीं बघा आपल्या हाताचीं पांच बोटें. सारीं कांहीं अगदीं सारख्या लांबीचीं नाहींत. पण एक बोट एक इंच लांब नी दुसरें एक फूट असें हि नाहीं. तीं बोटें अगदीं च समान नाहींत पण जवळ जवळ समान आहेत. असा समाज बनवायचा आहे आपल्याला. पांच बोटें जवळ जवळ समान आहेत आणि प्रेमानें व सहकार्यानें काम करतात म्हणून तीं पांच च असून हि हजारों कामें करतात. समाजात हि असें च प्रेम नी सहकार्य असायला हवें. शास्त्रात म्हटलें आहे कीं 'कराग्रे वसते लक्ष्मीः' बोटाच्या टोकावर लक्ष्मी वास करते. याचा अर्थ असा कीं उद्योग व सहकार्यांतून लक्ष्मी निर्माण होते. म्हणा सारे माझ्या-बरोबर 'कराग्रे...' नई तालीमचा वर्ग सुरू झाला. शिष्यांनीं आधीं च ग्रामदानाची दक्षिणा देऊन टाकली होती त्यामुळें त्यांना ऋषिमुखानें ज्ञान श्रवण करण्याचा अधिकार मिळाला होता. संस्कृत शास्त्रवचन उच्चारण्याचा आनंद सर्वांच्या मुखावर झळकत होता. विनोबांच्या समोर च एक म्हातारा बसला होता. तो मोठ्या उत्साहानें तें संस्कृतवचन म्हणण्याचा प्रयत्न करीत होता. पण शेवटचा 'लक्ष्मी' शब्द च तेवढा म्हणू शकायचा. विनोबा हसत म्हणाले, "म्हाताऱ्याच्या लक्ष्मी च तेवढी लक्षात राहिली!"



## भूदानाचीं पांच पावलें

भीतरगुडा, फाक्रीगुमा, डुमरीपदर, लक्ष्मीपूर
२८, २९, ३०, ३१ जुलै १९५५

पहाटे तीनला आकाशात लुकलुकणाऱ्या असंख्य तारकांकडे पहात डोळे उघडावे, प्रार्थना, सूतकताई, अध्ययन करून दुसऱ्या मुक्कामीं जाण्याकरता वाट चालायला लागावी, तेव्हा प्राचीच्या प्रांगणात गुलाबाच्या पाकळ्यांचा सडा पडलेला दिसायचा. रोज उषेच्या आगमनाचा दिव्य सोहळा पाहत असताना चित्त चित्रकाराकडे वळतें. उषेच्या स्वागताकरता मंत्रपुष्पांजलि उधळणाऱ्या वैदिक ऋषींच्या आनंदाचें रहस्य उषेच्या दर्शनाने कळतें. 'परमेश्वराच्या दिव्य संदेश घेऊन येणारी ती दूतिका, अमृतत्वाची ती पताका' दिनारंभीं मानवाला अमृताभिमुख करते. आज दिनान्तीं शेजारच्या उंच टेकडीवर जाऊन उषेच्या भगिनीच्या–संध्यादेवीच्या–आरक्त तेजाचें दर्शन घेतलें. दिनारंभीं उषादेवीनें गुलाबकळीच्या लेखणीनें लिहायला घेतलेलें आनंद गीत दिनान्तीं संध्यादेवी पूर्ण करीत होती. जीवित आनंदमय आहे हें सांगायला उपनिषदाची गरज नाहीं. आकाशाच्या पटला वर 'चेतनाचा चेतन' असा तो चित्रकार रोज जीं चित्रें चितारतो त्याच्या द्वारे तें च ज्ञान मिळत असतें.

नद्यांशीं नातें जोडीत, झऱ्याच्या रुणझुणीला ताल देत, धानाच्या हिरव्या रोपांशीं गुजगोष्टी करीत यात्रा चाललेली असते. चिखलानें पाय भरले कीं पाचपन्नास पावलें चालून जात नाहीं तों च परमेश्वराच्या घरून धावत आलेला झरा पाय धुण्यास समोर यायचा. झऱ्याच्या निर्मल शीतल पाण्याचा स्पर्श म्हणजे जणू परमेश्वराचा स्पर्श! बाबा म्हणतात–" झरा म्हणजे वैराग्य आणि भक्ति व नदी म्हणजे वैभव आणि भक्ति. सेवा करण्याकरता नदी या नगराहून त्या नगराकडे जाते. पण झरे सन्यासी आहेत. आपली सेवा कुणी घेत आहे कीं नाहीं याची त्यांना पर्वा नाहीं." पाऊस पडू लागला कीं बाबा म्हणतात, " आकाशातून असंख्य जलबिंदूंच्या रूपानें परमेश्वर आपल्याला अनंत हस्तानीं आलिंगन देत आहे."

आजकाल माझा दिवस उपनिषदाच्या सहवासात उगवतो व 'गीता-प्रवचनांच्या सहवासात मावळतो. गीता प्रवचनांना ओडिया अनुवादात कांहीं सुधार करण्याकरता मी व बुदुभाई रोज सध्याकाळीं ओडिया, हिंदी व मराठी आवृत्त्या घेऊन बसतों.

इमरीपदरच्या प्रवचनात भूदानयज्ञाच्या पांच भूमिकांचें विवेचन करीत विनोबा म्हणाले, "भूदानयज्ञाचा आरंभ तेलंगणात एका विशिष्ट परिस्थितींत झाला. तिथें मालक व मजूर यांच्यामधील द्वेष मिटवण्याचा प्रयत्न केला गेला. ती भूदानयज्ञाची प्रथम भूमिका. नंतर दुसऱ्या भूमिकेंत हें सिद्ध झालें कीं जें काम तेलंगणात एका विशिष्ट परिस्थितींत होऊं शकलें तें देशात सर्वत्र होऊं शकतें. माझ्या वर्धा ते दिल्ली या यात्रेंत वाढत्या भूमिदानानें ही गोष्ट सिद्ध करून दाखवली अन् त्यामुळें या कार्यानें साऱ्या देशाचें लक्ष वेधलें. तिसऱ्या भूमिकेंत कार्यकर्त्यांत निष्ठा व विश्वास निर्माण व्हावा म्हणून उत्तर प्रदेशात पांच लाख एकर व साऱ्या देशात पंचवीस लाख एकर भूदान मिळण्याचे असे दोन लहानसे संकल्प केले व ते ठरविलेल्या मुदतींत पूर्ण हि झाले. नंतर चौथ्या भूमिकेंत बिहारमध्यें तेथील जमिनींचा सहावा हिस्सा मिळवून भारतातील सर्व भूमिहीनांना जमीन देण्याचा एक व्यापक प्रयोग सुरू केला. अजूनपर्यन्त तें काम पूर्ण झालें नसलें तरी हि मार्ग मिळाला आहे. बिहारमध्यें तेवीस लाख एकर जमीन मिळाली याचें मला विशेष महत्त्व वाटत नाहीं पण तिथें तीन लाख लोकांनीं दान दिलें याचें मला विशेष महत्त्व वाटतें. त्यामुळें जनतेंत असा विश्वास निर्माण झाला कीं या मार्गानें भूमीचीं समस्या सोडविणें शक्य आहे. भूदान आरोहणाच्या पांचव्या भूमिकेचा इथें–ओरिसात– आरंभ झाला आहे. इथें ग्रामदान आणि गावचें एक कुटुंब बनविण्याचें जे कार्य चाललें आहे त्यात क्रान्तीचें स्पष्ट दर्शन घडत आहे. या पांच भूमिकांना अशान्तिशमन, ध्यानाकर्षण, निष्ठा निर्माण, व्यापक भूमिदान आणि भूमिक्रान्ति अशीं नांवे देता येतील. आज जिथें जनता सर्वस्वदान करायला तयार आहे तिथें कार्यकर्त्यांमध्ये अधिक त्याग, भक्ति व ज्ञान असायला हवें. हें धर्मचक्रप्रवर्तनाचें कार्य आहे ह्या जाणिवेनें तुम्हीं काम करायला हवें."

सध्याकाळीं झोपडीसमोरील विशाल मैदानातील हिरवळीवर सध्यासमयींचें सृष्टीचें गंभीर सौंदर्य पाहत बाबांबरोबर हिंडण्याचा योग जुळून आला. बरा च वेळ शांत राहिल्यानंतर बाबांचें प्रकट चिंतन सुरू झालें —
" बिहारसारख्या एका मोठ्या प्रांतात लाखों लोक लाखों एकर जमीन देऊं शकतात व त्यायोगें भूमिहीनांचा प्रश्न सुटू शकतो हें आता सिद्ध होऊन चुकलें आहे तसें च भूमीच्या स्वामित्वाच्या कल्पनेंच विसर्जन होऊं शकत. जमिनीची मालकी च अजिबात नाहींशी होऊन सारी जमीन देवाची बनू शकते, खेड्यातले सारे लोक खेड्याचं कुटुंब बनू शकतात, हें ओरिसात सिद्ध होत आहे. या कोरापुट जिल्ह्यात भूमिक्रान्तीच, म्हणजे भूदानयज्ञाच्या अंतिम भूमिकेचें, दर्शन घडत आहे आता भूदानयज्ञ सफल झाला असं म्हणायला हरकत नाहीं अहिंसेच्या मार्गानें जमिनीचा बिकट प्रश्न सोडविला जाऊं शकतो ह्याचें जगाला दर्शन घडलें मीं मार्ग दाखवून दिला. आता या मार्गानें जायचें कीं नाहीं तें जग ठरवील. पण माझें कार्य आता सफलें आहे. एक माणूस याहून जास्त काय करू शकणार? आता यापुढ ओरिसानंतर मी नुसता ज्ञानप्रचार करीत मुक्त विहार करीत हिंडणार "

थोड्या वेळानंतर अनुकूल वेळ पाहून मीं हळू च विचारलें, " पुष्कळदा असें वाटतें कीं आपल्याला इथें जेवढें मिळतें त्या मानानें आपल्या हातून देणें होत नाहीं कीं हातून सेवा घडत नाहीं. "

बाबा—दिलें पाहिजे नी सेवा केली पाहिजे हा तरी अहंकार कशाला? परमेश्वराला जें करवून घ्यायचें आहे तें तो करवून घेईल. आपण योजना करणें ही सुद्धा एक प्रकारची नास्तिकता आहे. सारे त्याच्यावर सोंपवावें

प्रश्न—आपल्या शक्तीचा अधिक उपयोग कुठे होईल हं माणसानें कसें ओळखावें?

बाबा—आपल्या शक्तीचा उपयोग कुठें होणार नी कुठें नाहीं तें परमेश्वर च जाणतो तेव्हा हा विचार आपण करू च नये. वाटणी च करायची झाली तर अशी करता येईल कीं निरहंकार होणें, शून्य होणें, हें आपलें काम, नी शक्ति भरणें हें त्याचें काम. आपण शून्य, पोकळ बनू,

तर च तो त्यात शक्ति भरणार. आपल्यांत अहंकार ठासून भरला असेल तर कुठून भरणार! अत्यंत तकलादू समजल्या जाणाऱ्या अजजारात हि तो शक्ति भरतो व त्याच्या द्वारें मोठमोठीं कामें करवून घेतो.

प्रश्न—आपला विकास होत आहे कीं नाहीं हें कसें ओळखावें?

बाबा—आपल्या चित्तवृत्ति किती शमल्या, मन किती शांत झालें, यावरून माणसानें आपला विकास मोजावा. शांत स्वरूप हें आत्म्याचें मूळ स्वरूप आहे. तेव्हा अधिकाधिक शांति लाभत जाण्यात च खरी प्रगति आहे.

हिरव्या गर्द झाडीनें वेढिलेल्या पर्वताच्या रांगातून जाणारा वळणा-वळणाच्या घाटाचा रस्ता. कुणाचें लक्ष बाल अरुणाच्या आरक्त आभेच्या पाढऱ्या ढगावर पडलेल्या प्रतिबिंबाकडे होतें तर कुणाचें पलीकडच्या टेकडीवर मेघाच्या प्रतीक्षेत हृदयाच्या तारा छेडून आर्त हाक मारणाऱ्या मोराच्या थव्याकडे होतें. कुणाला दाट झाडींत एखादा 'दोस्त' भेटावा असें वाटत होतें तर कुणी हिरव्या पाचावर बसलेल्या पोपटाच्या थव्याकडे बघत होतें. आकाशात तर क्षणाक्षणाला नवनवीन दृश्यें दिसायचीं. बाबा म्हणाले, "दर क्षणाला बदलणारा हा सिनेमा पहायचें सोडून हे लोक कशाला वेड्यासारखे रात्रीं कोंदट थिएटरात सिनेमा पाहतात!" महाराष्ट्रा-तून आलेले तात्यासाहेब शिखरे गेले काहीं दिवस यात्रेत होते. आज ते परत जाणार हें ऐकून बाबांनीं त्याना म्हटलें, "अठरा दिवस राहिलात ना तुम्ही! अठरा अध्याय झाले गीतेचे!" बाबांची आई त्याना गीताई माउलीच्या ओटींत टाकून देवाघरीं गेली. गीतेच्या या पाडसाला सतत आईचें दर्शन होत असतें. ते गीतेचे श्लोक खातात, गीतेच्या कुशींत झोपतात व गीतेच्या गगनात विहार करतात!



# अहिंसक रेडिओ ॲक्टिव्हिटी

पागीपालुर
१ ऑगस्ट १९५६

किर्र्‌ गर्द जगल. घाट उतरून खालीं जायची वाट. हें सारें वाघोबाच्या घराचें अंगण. पण हिंसक वाघोबाना प्रेमाच्या गाठीभेटींचा प्रकार कुठला माहीत असणार ? एवढे दूर देशचे पाहुणे घरी आले तरी वाघोबा आपले घरातच झोपून राहिले ! एकीकडे उंच डोंगर तर दुसरीकडे खोल दऱ्या. काहीं वाट चालून गेल्यानतर कुठून तरी गोड ताना ऐकू येऊ लागल्या. कोण गातय्‌ तें हुडकायला आम्ही जरा थांबलों. राजदरबार सोडून या निर्जन वनात येऊन गाणारा हा एकाकी गायक असेल तरी कोण ? जरा बारकाईनें लक्ष देता च आढळलें कीं तो आवाज माणसाचा नसून पाखराचा होता. दाट झाडीमुळे पाखरू काहीं दिसेना. तेवढ्यात खोल दरींतून वाहणाऱ्या झऱ्याचा निनाद ऐकू आला. त्या झऱ्याच्या काठाशीं बसून कुणीतरी पक्षी करुण गीत गात होता. त्याला आपल्या पूर्वजन्मातली एखादी स्वप्नासारखी विरलेली तरल स्मृति तर आठवत असेल ना ? कदाचित्‌ त्यानें आपली जुईच्या कळ्यासारखी नाजुक भावना हृदयात च दडवून ठेवली असेल अन्‌ ती च आता या करुणोत्कट गीतात उमटली असेल !

भूदान घोषणा ऐकू येऊ लागल्या. धूपाचा सुगंध आला. एका लहानशा गावचे लोक स्वागताकरता उभे होते. डोंगराच्या कुशींत एका स्वच्छ रस्त्याच्या दोन्ही बाजूना सारखलेलीं सुंदर घरें होतीं. 'ग्रामदान देणार ना ?' बाबानीं विचारलें, 'आधीं च दिलें आहे आम्हीं.' चटकन्‌ उत्तर मिळालें. "मग आता गावात ग्रामद्योग सुरु करायचे. रामराज्य स्थापायचें आहे आपल्याला." रामनामाच्या गजरात आम्ही पुढें जाऊ लागलों. डोंगर उतरून येताना पायथ्याचीं छोटीं छोटीं गावें दिसू लागलीं. वाटेंत कित्येक ठिकाणीं डोंगरातून धावत धावत येणारे झरे बाबाच्या पायावर तुषार-फुलं उधळून स्वागत करायचे. मनुष्याच्या प्राथमिक गरजांबाबत बाबानीं यात रचलेल्या दोन ओळी ते जोरजोरानें गाऊन दाखवू लागले—

" अन्न वस्त्र पात्र घर। अग्नि वायु नीर क्षीर।
औषध औजार। आराम प्रकाश। "

पांगीपाडुर हें गांव जगांत असून हि जगापासून दूर आहे. चोहोंकडे घनदाट अरण्यांनीं वेढलेल्या पर्वतमाला आहेत. मध्यभागीं हिरवळीच्या गालिच्यावर आगगाडीच्या पंधरावीस गांवांचे लोक बसले होते. कित्येकांनीं स्वामित्वविसर्जन केलेलें होतें व बाकीचे करण्याच्या विचारांत होते. इथें यांत सृष्टीच्या पार्श्वभूमीवर शांतीच्या शक्तीचा आविष्कार होत आहे. हिमालयाच्या अरण्यांत ऋषींना स्वर्गाच्या जीवनाच्या शांतीचा मार्ग सांपडला. प्रभु रामचंद्रांनीं पादलें धारण करणाऱ्या या दंडकारण्यांत समाजाच्या शांतीचा मार्ग गवसला. हें सामूहिक उत्थानाचें विज्ञानयुग आहे. यांत समूहवार्ताच्या अधिष्ठानावर हिंसेचे आणि अहिंसेचे हि प्रयोग चालणार. द्वंद्वयुद्धाचा काळ गेला व सर्वनाशी युद्धाचा [ total war ] काळ आला. व्यक्तिगत अहिंसेचा काळ गेला व सामूहिक सत्याग्रहाचा काळ आला. या युगांत चार दोन व्यक्ति नव्हेत तर कोटिकोटींचीं राष्ट्रें अहिंसेची उपासना करणार. आजच्या सभेंत ग्रामदानाच्या दहा गांवांचे लोक विनोबाजींकडून पुनर्वितरणाचीं प्रमाणपत्रें घेण्याकरतां आले होते. त्यांचें भारतीय हृदय शब्दांच्या नव्हे तर कृतीच्या भाषेंत सामूहिक अहिंसेच्या नव-आविष्काराचा संदेश देत होतें. कालचा पंचवीस एकरांचा मालक आपलें सर्वस्व समाजाला समर्पण करून आज चार एकराचा प्रसाद का घेत आहे ! काल त्याच्याजवळ आकाश, प्रकाश नी हवापाण्याशिवाय दुसरें कांहीं च नव्हतें, त्याला आज भूमीचें अधिष्ठान कां मिळत आहे ! समाजानें त्याचा हक्क कसा मान्य केला ! विनोबा म्हणतात, 'धर्मविचार आणि काळाची मागणी या दोहोंचा संयोग झाल्यास धर्मचक्रप्रवर्तन होतें.'

'परमेश्वराचा आशीर्वाद तुम्हांला सदैव मिळेल' हें विनोबांचें अखेरचें वाक्य मनांत घोळवीत लोक घरीं परतूं लागले होते. पानांच्या झोपडींतील असंख्य खिडक्यांतून तें दृश्य पाहत मी गायत्रीभाईकडून आजचें भाषण टाईप करवून घेत होतें, तेवढ्यांत एका पाश्चात्य वेषांतल्या गृहस्थानें झोपडींत प्रवेश केला. मनात विचार आला कीं हा गृहस्थ इथवर

डॉ. चक्रवर्ती बाबाना म्हणाले, "मी आता अमेरिकेंत परत जात आहे. तिकडल्या लोकाना तुमचा काय संदेश सागू ?" बाबा म्हणाले, "तेथील लोक दर रविवारीं चर्चमध्यें जाऊन ख्रास्तांचा संदेश ऐकतात च. पण त्यानीं आपल्या जीवनाचे असे कांहीं विभाग पाडले आहेत कीं ते म्हणतात कीं येशू ख्रिस्ताची शिकवण व्यक्तीच्या जीवनाला उपयुक्त आहे पण समाजजीवनाला नाहीं. त्याना हें समजावून सागा कीं ज्या शिकवणीने व्यक्तीच्या जीवनाचे कल्याण होतें त्यानें च समाजजीवनाचें हि कल्याण होतें. 'वाईटाचा प्रतिकार वाईटानें करू नका', 'शेजाऱ्यावर प्रेम करा' वगैरे येशूचीं वचनें त्याना माहीत च आहेत. तेव्हा मी एवढें च म्हणेन कीं त्या लोकानीं उत्तम ख्रिस्ती बनावें."



## नारायणाची उपासना

नारायणपटना
२, ३ ऑगस्ट १९५५

रात्रीं पाऊस पडून गेला होता त्यामुळें या च रस्त्यानें नुकत्या च गेलेल्या व्याघ्रराजाच्या भल्या मोठ्या पावलाच्या खुणा ओल्या मातींत स्पष्ट उमटलेल्या दिसत होत्या. बाबाना त्या दाखवता च ते हसत म्हणाले, "अस्स ! आज आपण त्याच्या चरणचिह्नांचें अनुसरण करीत आहोत तर !" इथें वाघाचा फार सुळसुळाट असल्यामुळे रोज वाघानें कुणाला तरी खाल्याच्या बातम्या येत असतात नी मग आमच्यापैकीं कुणाचा या यादींत नंबर लागणार याविषयीं आमची थट्टा सुरू होते. 'बाबाचीं नुसतीं च हाडें असल्यामुळें वाघाची दृष्टि त्याच्याकडे जायची नाहीं. निर्मला किंवा मगलामावशी ठेंगण्या व रोड असल्यामुळें हे असले छोटेसे रसगुल्ले खाऊन वाघाचें पोट च भरणार नाहीं आणि बाप्पाकडे पाहून तर त्याला आपल्या वडील भावाची च आठवण होईल. मग कुणाला खाणार ?' तेव्हा निर्णय होतो कीं बाबाचे आवडते गुटगुटीत व्यासजी च वाघाला हि सर्वांत

आवडतील. पण कदाचित् अहिंसक मानवावर हल्ला करणें हें हिंसक वाघोबाच्या प्रतिष्ठेला शोभत नसेल !

नारायणपटना हें ठाण्याचें गाव असून हि नद्या, पर्वत व जंगलामुळें जगापासून तुटलेलें आहे. त्यातून गावाला प्रदक्षिणा घालत जाणाऱ्या झंझावती व चपावती या नद्या पावसाळ्यात आपलें वैभव उधळीत वाहत असल्यामुळें बाहेरच्या जगातून इथें यायची कुणाची हिंमत च होत नाहीं. बाबा म्हणतात कीं हा सारा परित्यक्त प्रदेश आहे, दंडकारण्यातला उरलेला भाग आहे.

नारायणपटणा हें नाव बाबाना फार च आवडलें. आजच्या प्रवचनात हि त्याचा उल्लेख करीत ते म्हणाले, " या गावात तर सारें काहीं नारायणाला समर्पण व्हायला हवें. परमेश्वराचीं अनेक नावें आहेत नी प्रत्येक नावाचें काहीं वैशिष्ट्य आहे. नराच्या हृदयात वास करणाऱ्या ईश्वराला नारायण म्हणतात. नारायण म्हणजे समाजदेवता. शास्त्रात म्हटलें आहे कीं ' कलौ खलु भविष्यन्ति नारायणपरायणा । ' कलियुगातले लोक नारायणपरायण असतात याचा अर्थ असा कीं कलियुगात समाजसेवा हा च भक्तीचा सर्वश्रेष्ठ प्रकार ठरेल. भुकेलेल्याना खाऊ घालणें, दु खिताचें दु ख मिटवणें व दलिताना वर उठवणें ही च खरी भक्ति आहे "

बाबा गणिताला परमेश्वराखालोखाल मानतात. त्याच्या प्रत्यक्ष नित्यंत गणित असतें. त्याचा आहार हि अगदीं तोळ्यानें मोजलेला असतो. ते १२०० कॅलरीज् खातात डॉक्टर लोक त्याना म्हणतात कीं कमींत कमी दोन हजार कॅलरीज् तरी खायला हव्यात मग ते त्याना उत्तर देतात, " मी नुसतें दूध दहीं थोडें च खात असतों ? माझें नित्य तर आकाशसेवन चाललेलें असतें. हवा आणि सूर्यप्रकाश याचा हि भरपूर आहार मिळत असतो. आणि रोज श्लोक खातों ते कुठें गेले ? " आज महादेवीताई त्याना आहार वाढविण्या-विषयीं म्हणत होत्या तर ते म्हणाले, " खाण्यात मात्रा आहे म्हणून ही यात्रा चालली आहे, मात्रा गेली कीं यात्रा संपली च. "

# ' विन्यानें दगड फोडला '

कुमारी, बदगाव, आलमोंडा
४, ५, ६ ऑगस्ट १९५५

पहाटे वाट चालायला सुरुवात केली तेव्हा प्राचीच्या पटलावर कुणीतरी 'पैलतीरावरचा ऋषि ऋचा लिहीत होता. रोज नवनवीन नयनमनोहर दृश्यें पाहत असताना मनात विचार यायचा हीं सारीं सौंदर्यफुले शब्दात गुंफायचीं तरी कशीं ? शेतात हिरव्या रोपावर कोवळ्या सूर्यकिरणात चमकणाऱ्या दवबिंदूंची देखील माळ गुंफता येईल एखाद् वेळेला पण आकाश आणि धरतीच्या अंगणात सर्वत्र विखुरलेलीं हीं सौंदर्यफुलें वेंचायला उषेची अर्चना करणाऱ्या प्रतिभेचे हात हवेत. ' कानाचा कान, मनाचें मन, वाचेची वाचा, नेत्राचा नेत्र, असा जो तो कुणीतरी आहे, तो कुणाच्या तरी लेखणींत प्राण ओतेल तर शब्द स्फुरतील, वाक्यें जुळतील, भाव उमटेल, शब्दाच्या काहींशा व्यक्त व काहींशा अव्यक्त धाग्यात तीं सौंदर्यफुलें गुंफलीं जातील.— जग म्हणेल महाकवि निर्माण झाला.

पावसाची झिमझिम नुकती च संपली होती. पावसात न्हालेली सृष्टि, हिरवे डोंगर, भाताचीं पोपटी शेते ढगाआडून येणाऱ्या पिवळसर सूर्य प्रकाशात अधिक च खुलून दिसत होतीं सभेंत भूमिवितरणाचा समारंभ चालू होता धर्मचक्राच्या वेगवान् गतीशीं आपल्या जीवनाची संगति जुळवणाऱ्याना स्वर्ग पृथ्वीला जोडणारा गगनचुंबी हिमालय अडवू शकला नव्हता कीं देशादेशाना दूर ठेवणारा सागर अडवू शकला नव्हता. ' नहि वेरेन वेरानि सम्मन्तीध कुदाचन । अवेरेन च सम्मन्ति एस धम्मो सनतनो '। ह्या सनातन धर्मतत्त्वाचा संदेश देत दूर दूर देशात गेलेल्या बुद्ध भक्ताच्या भारतात जन्म घेतलेल्याना कोण अडवणार ? मुसळधार पाऊस त्याच्या हृदयातील क्रान्तीची आग विझवू शकत नाहीं, उंच पर्वतावरून वेगानें धावत येणारे नद्या नाले व वाट अडवणारे पर्वत नी अरण्ये त्याची गति कुंठित करू शकत नाहींत. शेजारच्या एका ८४ कुटुंबाच्या गावात काल पर्यंत अंशी भूमिवान व ४२ भूमिहीन कुटुंबे होतीं पण भूमिक्रान्तीचा

संदेश घेऊन सचार करणारे सेवक तिथें गेले व त्यांनीं विचार दिला, " भूमिपति भगवान्. आपण सारे भूमिपुत्र. " आणि अक्षरा भूमिवानांनीं आपली सर्व जमीन अर्पण केली. एकादश दीपान्या प्रकाशात भेदाचा व विषमतेचा अंधार लोपला. आजच्या सभेंत गावच्या चौपन कुटुंबाचे प्रमुख विनोबाच्या हातून भूमीच्या सेवकत्वाचीं प्रमाणपत्रें घेत होते. आणि हें सर्व पापी म्हणविल्या जाणान्या कलियुगात, भांडवलशाही, हुकूमशाहीच्या व साम्राज्यशाहीच्या युगात, यंत्रयुगात घटत आहे. विनोबा म्हणतात, " युग आपल्याला घडवत नाहीं तर आपण च युग घडवतों, कारण आपण चेतन आहोंत."

सभा संपली कीं मावळत्या सूर्याला निरोप देणाऱ्या प्रतीचीच आरक्त वैभव पाहत विनोबा दीड दोन मैल हिंडून येतात. अशा वेळीं कधीं कधीं चर्चा घरी च रंगते एका कार्यकर्त्यानें मला निराशेच्या सुरात लिहिलें होत कीं, " आजची परिस्थिति पाहून वाटतें कीं भूदानाची चळवळ ही आता फक्त आपल्यासारख्या काहीं वेड्याची च चळवळ राहिली आहे नी त्यात विनोबा नवर एकचे वेडे आहेत ! " हें बाबाना सागता च ते म्हणाले, " त्या वेड्यानीं आपला वेडेपणा सोडता कामा नये म्हणजे शहाणे देखील वेडे बनून त्याच्यामागें येतील " राजस्थानात पहिलें ग्रामदान मिळाल्याची बातमी नुकती च मिळाली होती. त्याचा उल्लेख करीत बाबा म्हणाले, " शून्यातून एक निर्माण करण ही फार मोठी किमया आहे मग त्या एकाचे शंभर नी हजार बनविणें सोपें आहे " यावर कोणींतरी म्हटलें कीं, " काहीं लोक अशी टीका करतात कीं भूदानाचे कार्यकर्ते खूप तपस्या करून अनुकूल वातावरण निर्माण करतील नी मग अगदीं शेवटीं काहीं बडे नेते या चळवळींत सामील होऊन सारें श्रेय मिळवतील " बाबा—" मला माझ्या लहानपणची एक गोष्ट आठवते. आमच्या घराजवळ दगड फोडण्याचें काम चालू असे मी तिथें जाऊन मजुराना म्हणायचा कीं मी पण करतों हें काम. मग आधीं च खूप प्रहार केल्यामुळें अगदीं फुटण्याच्या बेताला आलेला दगड ते मला फोडायला देत मी त्यावर आपल्या लहानशा हातोडीनें प्रहार करता च तो दगड फुटायचा आणि मग ते सारे कौतुकानें म्हणायचे कीं, ' विन्यानें दगड फोडला ! या घटनेचा माझ्या मनावर विलक्षण परिणाम झाला आहे

माझें असें निश्चित मत आहे कीं शेवटचा म्हणजे यशाचा प्रहार ज्याच्या हातून होतो तो माणूस सर्वांत कमी योग्यतेचा असतो. त्याच्या आधीं काम करणारे त्याच्याहून थोर असतात. बुद्ध, शंकराचार्य इत्यादि थोर व्यक्ती साऱ्या जगाला माहीत आहेत. त्या थोर आहेत ह्यांत शंका च नाहीं. परंतु त्याचे हि कोणी गुरु होते, ते त्याच्याहून हि महान् होते. पण जग मात्र त्याना ओळखत नाहीं. तेव्हां जे सर्वश्रेष्ठ पुरुष असतात ते कधीं जगात पुढें येत च नाहींत. पण जग ज्याना महापुरुष म्हणतें असे लोक त्यांच्या हातात असतात."

ह्या च चर्चेत बाबा पुढें म्हणाले, "शांति ही मानसिक व आध्यात्मिक वस्तु आहे. आपल्या जीवनात शांति असेल तर त्याद्वारें तिचा जगभर प्रचार होईल. म्हणून आपण सतत शांतीचा जप करीत राहिले पाहिजे. भूदान, संपत्तिदान, श्रमदान, ग्रामदान हें सर्व काम म्हणजे शांतीचा जप आहे. आपण जर दोन वर्षें सतत शांतीचा जप करीत राहू तर त्याचा जगावर परिणाम झाल्यावाचून राहणार नाहीं." एका कार्यकर्त्यानें विचारलें कीं, "१९५७ पर्यंत काम पूर्ण झालें नाहीं तर पुढें काय करायचें?" बाबा— "सध्या सत्तावनचा विचार नको करूस, पचावनचा च विचार कर. ईश्वराचा भक्त पुढचा विचार करीत नाहीं. तो वर्तमानकालातील आपलें कर्तव्य पुरें करण्याच्या प्रयत्नात च दंग असतो. जे वर्तमानात काम करीत नाहींत ते भविष्याची चिंता करीत बसतात नी त्यांच्यामागें भूत लागलेलें असतें." कुणीतरी म्हटलें कीं, "काहीं लोक इतके दुर्जन असतात कीं ते जमीन द्यायला तयार च होत नाहींत." हें ऐकतांना च बाबा गंभीर होऊन म्हणाले, "आस्तिकता म्हणजे मानवहृदयावर श्रद्धा. ही श्रद्धा च भूदान यज्ञाचें अधिष्ठान आहे."

फिरून परतलों तेव्हां जयभाई दिलरुबा वाजवीत होते. तें ऐकून बाबाना संगीताची स्फूर्ति झाली नी मग ते एकेका रागाचे स्वर गाऊन दाखवूं लागले व त्याची माहिती सांगूं लागले. आपल्या आईच्या गोड गळ्यातल्या भजनाच्या आठवणी ते नेहमीं सांगतात. त्या भजनाचा त्यांच्यावर फार परिणाम झाला आहे. त्यांचे वडील संगीतज्ञ होते व धाकटे बंधु— बाळकोबा— हि

उत्तम संगीतज्ञ आहेत. दहापंधरा रागांची माहिती सांगून मग यांनी आपल्या संगीत शिक्षणाचा इतिहास सांगू लागले— "प. खरेशास्त्री महान् संगीतज्ञ होते त्यांना संस्कृत येत नव्हतें. त्यांनी मला एकदा विचारलें कीं, मला संस्कृतमधील 'संगीत रत्नाकर' शिकवाल का ? तर मीं त्यांना म्हटलें, कीं तुम्ही मला संगीत शिकवा व मी तुम्हाला संस्कृत शिकवीन. मग आमची छान जोडी जमली व 'संगीत रत्नाकारा'चें अध्ययन सुरु झालें. त्याच्यामुळें मला संगीताचें शास्त्रीय ज्ञान मिळालें. त्यामुळें मी पोपटासारखी शास्त्रीय माहिती तेवढी सांगू शकतों पण मला गाता मात्र येत नाहीं !"



## दरिद्रनारायण वाट पाहतो आहे

राविक्रणा, पार्वतीपुरम्, कोटीपाम ( आन्ध्र )
७, ८, ९ ऑगस्ट १९५५

वाट जंगलामुळें कोरापुट जिल्ह्याच्या या भागातून दुसऱ्या भागात जायचा रस्ता नव्हता. त्यामुळें आम्हाला तीन दिवस आंध्रच्या श्रीकाकुळम् जिल्ह्यातून जायचें होतें. झंझावतीच्या पैलतीरावर आंध्रचे लोक स्वागतार्थ उभे होते आम्ही नदी कशी पार करणार याबद्दल सर्वांना फार काळजी वाटत होती. पण कालपासून पाऊस थांबल्यामुळें आज नदीचें पाणी बरें च उतरले होतें.

आंध्रात प्रवेश करता च विनोबांना तेलंगणाच्या यात्रेची आठवण होणें स्वाभाविक च होतें त्या वेळीं दरिद्रनारायणाच्या क्षुधेंतून निर्माण झालेल्या, सर्वस्व भस्मसात् करु पाहणाऱ्या आगीनें सारा तेलंगणा पेटला होता. १८ एप्रिल १९५१ ला पोचमपल्लीच्या रामचंद्र रेड्डींच्या शंभर एकराच्या प्रथम दानात विनोबांना मानवतेचा साक्षात्कार घडला आणि भूदानयज्ञ सुरु झाला. विषमतेतून निर्माण झालेली हिंसेची आग करुणेच्या वर्षावानें विझू लागली. जगाला वाटलें चमत्कार घडला. विनोबा म्हणाले, "हिंसेची आग अहिंसेच्या पाण्यानें च विझते, अज्ञानाचा अंधकार ज्ञानदीपानें लोपतो"

आ्रात पाऊल ठेवता च विनोबा म्हणाले, "स्वराज्य मिळाल्यापासून दरिद्रनारायण वाट पाहतो आहे कीं त्याला स्वराज्यापूर्वीं दिले गेलेले वचन कधीं पुरे होणार ! भूदानाचे काम प्रेमाने कराल तर दरिद्रनारायण प्रसन्न होईल व आपल्या स्वराज्याला त्याचा आशीर्वाद लाभेल. त्याच्या आशीर्वादाविना आपल्या स्वराज्यात रुचि राहणार नाहीं व तें स्वराज्य टिकणार हि नाहीं "

प्रार्थनाप्रवचनात अहिंसाशास्त्राचे विवेचन करताना विनोबा म्हणाले, " अहिंसेचें औषध घ्यायचें असेल तर त्याबरोबर एक पथ्य हि पाळावें लागेल. तें पथ्य म्हणजे वाणींत मधुरता व हृदयात प्रेम असायला हवें. भूदानाच्या कामात जबरदस्ती, धमकावणें वगैरे अजिबात येता कामा नये. जर थोडी देखील कटु वाणी वापरली तर या औषधानें रोग तर दूर होणार च नाहीं पण मरण मात्र ओढवेल. ही हेमगर्भाची मात्रा आहे तेव्हा तीबरोबर मधुर अनुपान आवश्यक आहे."

पार्वतीपुरम् शहर जवळ येऊ लागता च तेलगु भाषेंतील भूदानाच्या घोषणा ऐकू येऊ लागल्या व लोकांची गर्दी दिसू लागली. या आसेतु हिमाचल देशात कुठे हि जा, भारतीय हृदयाचे तें च मगल दर्शन सर्वत्र घडतें. या च भारतीय हृदयावर श्रद्धा ठेवून विनोबा घोषणा करतात कीं, 'भारतात स्वामित्वाचा अमगल विचार टिकणार नाहीं.' सध्याकाळच्या प्रचड सभेंत विनोबा दीड तासपर्यंत हृदय मोकळें करून बोलत होते सारा समुदाय चित्रवत् तटस्थ होऊन विचार श्रवण करीत होता. आरभाचें वाक्य मोठे सूचक होतें—" ज्याप्रमाणें वर्तुळाचा आरभ ज्या बिंदूपासून होतो त्या च बिंदूच्या ठिकाणीं त्याची समाप्ति होते त्या च प्रमाणे मी तर ही आशा बाळगून आहें कीं भूदानयज्ञाची परिपूर्णता आध्रात च व्हायला हवी कारण इथें च त्याचा आरभ झाला होता.

" पाच वर्षांपूर्वीं ज्या दिवशीं मला पहिलें दान मिळाले त्या रात्रीं मी त्या घटनेविषयीं विचार करू लागलों. तेव्हा माझ्या ध्यानात आलें कीं माणूस फक्त स्वत च्या च विचारानें काम करीत नसतो, विश्वात त्याच्या करता विचार निर्माण होत असतो. आज विश्वात एक हवा निर्माण झाली

आहे. मी तर केवळ निमित्त मात्र आहें. हें काम उचलण्याइतकी माझ्यात शक्ति आहे का अगा जेव्हा मी विचार करूं लागलों तेव्हा आतऱ्या आवाजानें सांगितलें कीं तू शक्तिशून्य आहेस. पण जरी मी शक्तिशून्य असलों तरी विश्वासशून्य नव्हतो. तेव्हा मीं विचार केला कीं मी जर अभिमानशून्य झालों तर त्याने रामावतारात वानरांकडून काम करून घेतलें तो च माझ्याकडून हि काम करून घेईल. दुसऱ्या दिवशीं दुसऱ्या मुक्कामीं जाता च मीं लोकांना म्हटलें कीं, 'तुम्हाला पाच मुलें असतील तर मी सहावा आहें. मला सहावा हिस्सा द्या.' त्या लोकांनीं स्वप्नात देखील कल्पना केली नसेल कीं मी अशी काही मागणी त्यांच्यासमोर ठेवीन. पण हिरोशिमावर ॲटम बाँबचा जो परिणाम झाला तो च परिणाम माझ्या त्या व्यक्तव्याचा झाला. मला तिथें पचवीस एकर जमीन मिळाली आणि दोन बिंदूंची रेखा तयार होते त्याप्रमाणे रेखा तयार झाली नी भूदानयज्ञ सुरू झाला.

"सर्वोदय म्हणजे सारे समान. जिथें प्रत्येकजण असें च म्हणेल कीं आधीं इतर सारे सुखी होऊ देत. मग मी सुखी होईन. सर्वोदयाची मूर्ति म्हणजे घरातील माता. ती सर्वांना खाऊ घालून मग स्वत खाते. विनोबा तुम्हाला सर्वोदय शिकवीत नसून घराघरातील माता आपल्या मुलाना सर्वोदय शिकवते कित्येकांना असें वाटते कीं माणसात परमार्थापेक्षा स्वार्थाची च भावना अधिक असते. पण मी त्याना असें विचारतों कीं कुटुंबात कोणता न्याय चालतो? मी फक्त एवढें च सांगत आहें कीं कुटुंबाचा न्याय साऱ्या समाजाला लागू करा. मी समाजाला खऱ्या स्वार्थाची शिकवण देत आहें असा माझा दावा आहे. आज हिंदुस्थानातल्या प्रत्येक मनुष्याचा स्वार्थ व्यक्तिगत मालकीचें विसर्जन करण्यात च निहित आहे."

कोटीपामला झझावती व नागावल्ली या दोन नद्यांच्या संगमाजवळ एका छोट्याशा टेकडीच्या पायथ्याशीं आमचा निवास होता. आज नऊ ऑगस्ट. ज्या स्वराज्याकरता असंख्यांनीं त्याग केला तें स्वराज्य म्हणजे काय याचें आजच्या प्रवचनात विस्तृत विवेचन होतें. विनोबा बोलू लागले—

"या युगात 'राज्य' नसून 'प्राज्य' असतें. जेव्हा स्वराज्य खेड्याखेड्यात

पोहोचेल तेव्हा ग्रामराज्य निर्माण होईल. जेव्हा खेडयाखेडयातील लोक बुद्धिमान् होतील आणि कोणावर हि सत्ता चालण्याची आवश्यकता च पडणार नाहीं तेव्हा रामराज्य निर्माण होईल खेडयाचा सारा कारभार राज्याच्या कारभाराच्या धर्तीवर चालायला हवा. ज्याप्रमाणें सरकारचे शेती, आरोग्य, शिक्षण वगैरे भिन्न भिन्न विभाग असतात त्या च प्रमाण खेडयातल्या कारभारात हि हे सारे विभाग हवेत तसे च 'ग्रामे ग्रामे, विश्वविद्यापीठम्' व्हायला हवें खेडे म्हणजे काहीं तुकडा नव्हे. तें 'पूर्ण' आहे त्यामुळें प्रत्येक खेडयात शिक्षणाची पूर्ण योजना असायला हवी मग खेडयाखेडयात राजकारणधुरंधर निर्माण होतील देशाच्या सरकारसमोर एखादा प्रश्न उभा राहिला तर पाचपन्नास खेडयाचे लोक समोर येऊन म्हणतील, हा प्रश्न आम्हीं आपल्या खेडयात कसा सोडविला आहे त बघून या जरा! मी खेडयाखेडयात हिंडून लोकाना हे च समजावून सागतों कीं ज्याप्रमाणें आपली भूक मिटवण्याकरता स्वत ला च खावें लागतें त्या च प्रमाणे आपल्या खेडयात ग्रामराज्य स्थापायचें असल्यास आपल्याला च भूदान द्यावें लागेल आज सत्तेचे केन्द्रीकरण झालेलें आहे, त्या ऐवजीं शासनविभाजनाची प्रक्रिया सुरू व्हायला हवी तेव्हा प्रथम केंद्रित स्वराज्य, मग विभाजित स्वराज्य म्हणजे ग्रामराज्य, आणि अखेरची अवस्था म्हणजे राज्यमुक्ति, रामराज्य किंवा अराज्य.

"आम्हाला परावलम्बन नको, स्वावलम्बन हवे याचा अर्थ हा नव्हे कीं आम्ही परस्परावलम्बन देखील नको म्हणतों पण आधळा व लगडा या सारख्या अक्षमांचे परस्परावलम्बन मात्र आम्हाला नको आहे, तर समर्थांचें हवें आहे प्रत्येक खेडे नी प्रत्येक शहर समर्थ बनावें आणि मग सर्वांनीं मिळून खाद्याला खादा लावून काम करावें अपूर्णांच्या परस्परसहकार्यांतून पूर्ण निर्माण करणें हें आमचें उद्दिष्ट नसून पूर्णांच्या सहकार्यांतून परिपूर्ण निर्माण करणें हें उद्दिष्ट आहे"

# ट्रस्टीशिप

केरडा, बडराईसिंग, पितामहल [ उत्कल ]
१०, ११, १२ ऑगस्ट १९५८

केरडा हें तीनशें लोकवस्तीचें गाव. पण तिथें वर्षाला बारा हजार रुपयांची दारू येते हें ऐकून विनोबांना फार वाईट वाटलें. प्रवचनात तो च विषय घेत ते म्हणाले, "सारीं शास्त्रें आणि संत सांगतात कीं, मद्यपान हें पंचमहापातकांपैकी एक पातक आहे. दारू पिण्यानें शरीर, मन, बुद्धि आणि धर्म या सर्वांची च हानि होते. जोवर तुम्ही दारू सोडणार नाहीं तोंवर तुम्हाला जमीन मिळून हि तुमची काहीं उन्नति होणार नाहीं "

बडराईसिंगाच्या प्रवचनात ट्रस्टीशिपच्या तत्त्वासंबंधीं बोलताना विनोबा म्हणाले— "काहीं लोक म्हणतात कीं, 'विनोबा उगीच च भूमिहीनांना भूमि वाटत हिंडतो आहे. मजुरांना जरा चांगली मजुरी दिली कीं ते सुखी होतील. त्यांना जमीन कशाला द्यायला हवी ?' पण यावर माझें असें उत्तर आहे कीं सुखी गुलाम बघून विनोबाच्या हृदयाला समाधान लाभू शकत नाहीं. आणि म्हणून च तो सर्वांना जमीन देत आहे. हा आक्षेप घेणारे लोक गांधीजींच्या ट्रस्टीशिपच्या तत्त्वाचा हि अगदीं चुकीचा अर्थ करतात, आणि म्हणतात कीं स्वामित्वविसर्जनाचें तत्त्व ट्रस्टीशिपशीं सुसंगत नाहीं पण ट्रस्टीशिपचा खरा अर्थ काय आहे तें आधीं नीट लक्षात घ्यायला हवें ट्रस्टीशिपचें पहिलें तत्त्व असें कीं ज्याप्रमाणें बाप आपल्या अपत्याची आपल्याहून हि अधिक काळजी घेतो त्याप्रमाणें ट्रस्टी आपल्या पाल्याची काळजी वाहतो दुसरें तत्त्व असें कीं ज्याप्रमाणें बापाला वाटतें कीं माझ्या मुलानें शक्य तितक्या लवकर माझ्यासारखें बनावें, आपल्या पायावर उभें राहावें, त्या च प्रमाणें जो आपल्याला संपत्तीचा ट्रस्टी समजेल त्याला असें वाटेल कीं माझ्या मजुरांनीं लवकरात लवकर माझ्याइतकी योग्यता मिळवावी व स्वावलंबी व्हावें नामदेवानें ईश्वराला म्हटलें आहे कीं, "तू एक च असा स्वामी आहेस कीं जो आपल्या सेवकाला स्वतःची योग्यता देतो " जो आपल्या सेवकाला सेवकत्वातून

मुक्त करील तो च खरा स्वामी होय. जेव्हा स्वामित्व आणि सेवकत्व दोन्ही हि नाहींशीं होतील तेव्हा स्वामी व सेवक या दोघात सख्यभक्ति निर्माण होईल, ते दोघे भाऊ भाऊ बनतील. वेदात तर असें म्हटलें कीं, ‘अज्येष्ठास. अकनिष्ठास एते सभ्रातरो वावृधु ।’ आमच्यात कोणी लहान भाऊ नकोत कीं कोणी मोठे भाऊ नकोत, सारे समान होऊ देत. म्हणजे नुसते ‘भाऊ भाऊ’ म्हणण्याने वेदाना समाधान वाटत नाहीं. ते आणखी एक पाऊल पुढें जातात. हा च सर्वोदयाचा आदर्श आहे. यात परम-प्रेमाचा उत्कर्ष आहे.”

पितामहल्च्या सभेत विनोबानीं भूमिवानाना आपल्या कर्तव्याची जाणीव करून देत भूदानयज्ञात स्वामित्वसमर्पण करण्यास सांगितलें व भूमिहीनाना हि त्याच्या कर्तव्याची जाणीव करून देत आळस, व्यसनें व दुर्गुण सोडण्यास सांगितलें. नतर क्रातीच्या प्रक्रियेचें विवेचन करीत ते म्हणाले— “आम्हाला व्यक्तींत हि परिवर्तन घडवून आणावयाचें आहे व समाजरचनेंत हि. हृदयपरिवर्तन आणि समाजपरिवर्तन या दोन्ही गोष्टी बरोबर च होत असतात. आपल्याला भांडवलशाहीविरुद्ध लढा द्यायचा आहे. पण त्या च बरोबर हें हि लक्षात घ्यायला हवें कीं आपलें शरीर हें सर्वांत अधिक भांडवलवादी आहे. तें भांडवलशाहींत पोसलें गेलें आहे. त्याला आराम आणि भोग हवेसे वाटतात. म्हणून पहिली लढाई तर शरीराच्या च विरुद्ध लढावी लागेल. भांडवलशाही नाहींशी करायची असेल तर आधीं आपल्याला श्रमनिष्ठ व्हावें लागेल. अहिंसेच्या सेनेची शक्ति सख्येवर नव्हे तर हृदयशुद्धीवर अवलबून आहे. आता ती तलवारी, बदुका नी बॉम्ब्सची सेना कुचकामी ठरली आहे. यापुढें हातीं कुदळ, झाडू व चर्खा घेतलेली आमची शान्तिसेना च जगात पराक्रम करणार आहे.”



## खरें स्वातंत्र्यप्रेम प्रकट करा

वत्तापेटा, अटामुडा, सिम्रपाई, कल्याणसिंगपूर
१३ ते १७ ऑगस्ट १९५८

सूर्योदयाच्या सुमारास हिरण्यगर्द झाडींतून खळखळ वाहणाऱ्या नागा वल्लीचे दर्शन झालें पलीकडच्या तीरावर पाच माणसें उभलेलीं दिसलीं याना म्हणाले, "बघा, पाच पांडव कसे उभले आहेत ! थोड्या वेळापूर्वी दोन पुरुष व एक स्त्री याना जाताना पाहून मला तुलसीदासाच्या एका दोह्याची आठवण झाली त्यात म्हटलें आहे कीं राम, लक्ष्मण नी मध्यें सीता जात आहेत जणू– ब्रह्म आणि जीव यामध्यें माया आता तुम्हाला जर ही अशी दृष्टि नसेल तर तुम्हाला सगळीकडे फक्त माणसे च दिसतील पण याप्रमाणें माणसात पांडव नी राम, सीता या सर्वांचें दर्शन घ्यायला शिकाल तर तुमची याना सफल होईल सौंदर्य हें आंतरिक असतें भावनेमुळें दर्शन घडतें " बाबा नेहमीं असे च सहजपणें जीवनाकडे पहायाची नवी दृष्टि देत जातात

नुकती च नारायण देसाईच्या मातेच्या मृत्यूची बातमी कळली होती आपल्या एकुलत्या एक मुलाला पित्याच्या (कै महादेवभाई देसाई) पावलावर पावलें टाकताना पाहून त्या मोठ्या समाधानानें देवाघरीं गेल्या असतील बाबानीं नारायणाला लिहिलें कीं, "रूपापेक्षा नाम अधिक श्रेष्ठ आहे. रूप असताना तर आहे च पण रूपाच्या अभावात तर अधिक च आहे माणसाला मातेच्या रूपानें ईश्वराच्या करुणेचा प्रथम अनुभव येतो पण जेव्हा तें रूप अरूपात विलीन होतें तेव्हा मातृभक्ताला जगात सर्वत्र मातृस्पर्शाचा अनुभव घडू लागतो हें मीं आपल्या स्वत च्या अनुभवावरून लिहिलें आहे तुला हि असा च अनुभव येईल असा मला विश्वास वाटतो "

अंधार पडला आकाशात असंख्य तारका लुकलुकू लागल्या बाबा वेदमंत्र गाऊ लागले ताई म्हणाल्या, "पूर्वीं खूप पाठ यायचें मला, पण आता आठवत नाहीं " बाबा म्हणाले, " त्यात काहीं बिघडत नाहीं मला हि पूर्वीं २० २५ हजार श्लोक पाठ यायचे आता सगळेच काहीं आठवत नाहींत

शब्द, अर्थभाव, अभाव ही प्रक्रिया आहे. आधीं शब्द लक्षात ठेवायचा, मग तो विसरून अर्थ लक्षात ठेवायचा; पुढें अर्थ हि विसरून भाव लक्षात ठेवायचा. नी पुढें भाव हि विसरायचा. म्हणजे अभावाची अवस्था येते. अभाव म्हणजे ती वस्तु अगदीं हृदयात मिसळून गेलेली असते."

अटामुडाला जायला वाट चालू लागलों तेव्हा आकाशाच्या पटलावर कुणीतरी पैलतीरावरचा चित्रकार निळ्या रंगाच्या विविध छटांचीं चेतोहर चित्रें रेखाटीत होता. मधून हलके च श्वेत तेजाचा कुंचला हि फिरवायचा. एका चित्राकडे पाहत बाबा म्हणाले, 'बघा मानससरोवर दिसतय्.' चकाकणाऱ्या पांढऱ्या ढगाच्या आवरणात झाकल्या गेलेल्या शेजारच्या टेकड्यांकडे पाहत कुणीतरी म्हटलें, 'नी इकडे कैलास दिसतोय्!' बाबा हसत म्हणाले, "वा छान! तर मग आज कैलास नी मानस दोन्हींचें हि दर्शन झालें!" दृष्टि मिळाली कीं दर्शन घडतें. मग हृदय च मानससरोवर बनतें नी बुद्धि कैलासात स्थिर होते.

निसर्गसौंदर्याच्या अलंकारानीं नटलेल्या एका आदिवासींच्या खेड्यात निवास होता सूर्यकिरणात चमकणाऱ्या भडक पोपटी भाताच्या शेताच्या कडेकडेनें जाणाऱ्या पायवाटेनें शेजारच्या नदीवर स्नानाला जाण्याकरता मी व मंगलामावशी निघालों. तेव्हा वाटेंत एका शेतात आदिवासी स्त्रिया काम करीत होत्या. भुरक्या रंगाची एक च पद्धतीची साडी, सुडौल बांधा, श्यामल कांतिमान वर्ण. ओणव्या होऊन एका च सुरात गाणीं गात त्या रोवणी करीत होत्या. जणू सात्त्विक नृत्य च करीत होत्या. मावशी म्हणाल्या, "असें काम खूप आवडेल नाहीं का?"

पधरा ऑगस्टला सिकरपाईच्या प्रवचनात स्वातंत्र्याचा खरा अर्थ सांगताना विनोबा म्हणाले—"आपली एखादी गोष्ट दुसऱ्याच्या हातात असली तर ती हातीं घेण्याच्या कामात सर्वांना मोठा उत्साह वाटतो. आपला गोवा दुसऱ्याच्या हातात आहे तर तो घेण्याच्या कामात केवढा जोर आला होता! पण दुसऱ्याची एखादी गोष्ट आपल्या हातीं असेल तर ती त्याला परत देण्यात अधिक उत्साह वाटायला हवा. भारतातील भूमिवाननीं हें लक्षात घ्यायला हवें कीं आपल्याजवळ असलेली जमीन दुसऱ्याची आहे म्हणून

त्याना त्याचा न्यायोचित वाटा देऊन उरलेली जमीन च जवळ बाळगण्याचा आपल्याला अधिकार आहे. याचें च नाव स्वातंत्र्यप्रेम नी ही च मानवता. दुसऱ्याच्या हातीं असलेली आपली वस्तु घेण्यात नव्हे तर आपल्या हातीं असलेली दुसऱ्याची वस्तु त्याना परत देण्यात स्वातंत्र्याचें खरें पूर्ण प्रेम प्रकट होतें. भारतातील भूमिवान् लोक भूमिहीनाना जमीन देऊन भारताच्या हृदयात खरोखर च स्वातंत्र्यप्रेम वास करीत आहे नी भारत खऱ्या अर्थानें स्वतंत्र झाला आहे हें सिद्ध करतील अशी मी आशा करतों."

स्वातंत्र्याच्या निर्मात्याचें स्मरण करीत विनोबानीं एका पत्रात लिहिलें कीं, "जोंवर हिंदुस्थानातून सर्व तऱ्हेची विषमता, उच्चनीचता नाहींशी होत नाहीं तोंवर गाधी विचाराचें समाधान होऊ शकणार नाहीं. आणि या देशात गाधी विचार सफल होण्याकरता च अवतीर्ण झालेला आहे असा मला पूर्ण विश्वास आहे."

आमच्या यात्रीदलातील तरुण उत्साही कार्यकर्ता प्रफुल्लदास यानें समाजवादी पक्षाचें काम सोडून भूमिक्रान्तीच्या कार्यांत उडी घेतली आहे व कवि दुलायलजींच्या भाषेंत त्यानें आपल्या कुटुंबातील लोकाना म्हटलें "आवो जीवनदान करें।" त्याचे वडील बंधु डॉक्टर आहेत. ते आपली प्रॅक्टिस सोडून कोरापुटच्या क्रान्तिक्षेत्रात सेवा करायला आले. त्याच्या आई सरकारी दवाखान्यात स्टाफ नर्स आहेत. त्या हि नोकरी सोडून इथे सेवाकार्य करायला आल्या आहेत. तसें च सरकारच्या सहकारी विभागातील एक उच्च अनुभवी अधिकारी – दुर्गाबाबू – नोकरी सोडून ग्रामदानाच्या क्षेत्रात सहकारी चळवळीचें संघटन करण्याकरता आले आहेत. कोरापुटच्या क्रान्तीनें आकर्षित होऊन आलेल्याना सिकरपाईच्या प्रवचनात मार्गदर्शन मिळालें. विनोबा म्हणाले, "आजवर जिथे जिथें आदिवासी किंवा मागासलेल्या लोकाची सेवा करण्याचें कार्य झालें तिथें तिथे एक असा विचित्र अनुभव आला कीं आपल्यासारख्या बाहेरच्या लोकाच्या संगतींत त्याचा भौतिक स्तर तर उंचावतो पण नैतिक स्तर खालावतो. याचें कारण हे आहे कीं आम्हा सुशिक्षित म्हणविणाऱ्याचें जीवन बहुधा फारसें उन्नत नसतें. इथें ग्रामदान देणाऱ्यानीं हें सिद्ध केलेलें आहे कीं त्याची नैतिक पातळी

आमच्या स्वराज्याला च नव्हे तर साऱ्या मानवतेला कलंक आहे असें मला वाटतें. मानवाच्या मनात इतरावर सत्ता चालवण्याची इच्छा असते. कधीं कधीं त्याला तो आपलें कर्तव्य हि समजतो व त्या च मुळे त्याला वाटते कीं मानवाची हत्या करण्याचा आपल्याला अधिकार आहे. पण त्याला हें कळायला हवें कीं मानवाचा प्रथम, परम आणि अंतिम अधिकार प्रेम आणि सेवा करणें हा आहे. आम्ही आपले प्रश्न सोडविण्याच्या कामात इतराची हत्या करण्याचा आपल्याला अधिकार आहे असें कधीं हि मानणार नाहीं असा निर्णय भारतानें घेण्याची वेळ आज आली आहे. पण जोंवर आम्ही आजची विषम समाजरचना बदलून टाकीत नाहीं तोंवर भारत असा निर्णय घेण्याची हिंमत करू शकणार नाहीं."



## राष्ट्रपतींचें आगमन

तेदवेली, पुल्लिकणा
१९ ते २१ ऑगस्ट १९५५

प्राचीला उजाळीत उषा आली, आरोची आरक्तता घेऊन आली, अज्ञानाच्या अंधाराला लोपवीत आली. लवलवणारीं पोपटी भाताचीं शेतें दवबिंदूच्या टोप्यानीं स्वागतस्मित करीत होतीं. पाढऱ्या ढगाच्या झाली पाघरून पृथिवीच्या मानदडाचें रूप धारण केलेले गिरिराज ध्यानगंभीर भासत होते पाखरें गीताच्या पखावर बसून उषेची अर्चना करण्याकरता अंतरिक्षात उड्डाण करीत होतीं. बाहेरच्या आकाशाचें प्रतिबिंब हृदयाकाशात उमटलें. अतरींचा अतरतर जागला, क्रांतिविचार पटला, जीवनात प्रकटला, समाज परिवर्तनात परिणत झाला.

"परमेशानें हवा, पाणी आणि सूर्यप्रकाश याची निर्मिति केली ती सर्वांकरता केली. प्रत्येक तहानलेल्या जीवाला पाणी प्यायचा अधिकार आहे. पाण्याचा मालक कुणी होऊ शकतो का? सूर्यनारायण उगवतो, त्याचीं किरणें घराघरात प्रवेश करतात. गरिबाची झोपडी असो कीं धनिकाचा

प्रासाद असो, सूर्यकिरणाना भेदभाव माहीत नाहीं. त्या च प्रमाणें भूमि देखील परमेश्वरानें च निर्माण केली आहे. मानव भूमीचा मालक कसा होऊ शकेल? भूमिपति तो एक ईश्वर च आहे. वेदिक ऋषि गातो—"माता भूमि. पुत्रोऽहं पृथिव्या. ।" भूमि आपली माता नी आपण सारे भूमिपुत्र. प्रत्येक भूमिपुत्राला भूमातेच्या सेवेचा समान अधिकार आहे."

हे शब्द ऐकल्यापासून त्याचें मन बेचैन झालें होतें. तो आपल्या गावचा नाईक होता. आजच्या जगाच्या भाषेत तो एकरोंऐशीं एकर जमिनीचा मालक होता. आजचा समाज, आजचें सरकार, आजचा कायदा सारे त्याच्या पाठीशीं होते. कोणी हि त्याची जमीन हिरावून घेऊ शकत नव्हतें. तरीं हि त्याचें मन अस्वस्थ झालें होतें. तीन चार दिवसापूर्वी रूप दुरून पायीं पायीं चालत आलेल्या एका संताच्या दर्शनासाठीं तो आपल्या सोबत्याबरोबर शेजारच्या खेड्यात गेला होता. त्या संताची भाषा त्याला कळत नव्हती. तो संत डोळे मिटून ध्यानस्थ बसला होता. तो काहीं तरी बोलायचा नी मग त्याच्या शेजारीं बसलेला एक माणूस ओडिया भाषेत तें च सागायचा. तिथून परतल्यापासून त्याच्या मनात वादळ सुरू झालें होतें. अंगणात खेळणाऱ्या आपल्या मुलाकडे पाहता च पुन्हा त्याला त्या संताचे शब्द आठवले—"देवानें तुम्हाला मुलें दिलीं तशीं च त्या भूमिहीन मजुराला हि दिलीं आहेत. त्याच्या मुलाचें काय होत असेल याचा कधीं विचार केला आहे का तुम्हीं?"

वादळाचा वेग वाढला. न्याहारी करून तो शेताकडे जायला निघाला. शेतात मजूर काम करीत होते. आज त्याच्याकडे पाहता च त्याच्या मनात वेगळे च विचार निर्माण झाले. तेवढ्यात दुरून कुत्र्याच्या भांडणाचा आवाज ऐकू आला. पुन्हा त्याला त्या संताचे शब्द आठवले—"दोन कुत्रे एका भाकरीच्या तुकड्यासाठीं भांडतात. एका कुत्र्याला दुसऱ्या कुत्र्याची सेवा करताना कधीं कुणीं पाहिलें आहे का? पण आपण पशु नसून माणसें आहोंत. गरीब शेजाऱ्याच्या सुखदुःखात सहभागी होण्यात च माणसाची मानवता आहे. तुम्हीं जन्मभर एका च खेड्यात शेजारीं शेजारीं राहता पण शेजारच्या घरात भुकेलेलीं लहान मुलें आहेत याकडे मात्र तुमचें लक्ष

जात नाहीं." झझारात सुरु झाला. जुने विचार, जुन्या कल्पना, जुनीं मूल्यें दासळून पडूं लागलीं. त्यानें गावच्या सर्व जमीनवाल्याना बोलावलें व आपला नवा निर्धार जाहीर केला—"मी आपली सारी जमीन दान देणार आहे. तुम्हाला हि जर हा विचार मान्य असेल तर आपण सारे मिळून ग्रामदान देऊं या, खेड्याचें एक कुटुंब बनवूं या." चर्चा सुरु झाली. व्यक्तीची मालकी नाहींशी झाली. जमीन देवाची झाली. गावातल्या सर्व कुटुंबाना माणशीं एकर या हिशोबानें जमीन वाटायचें ठरलें. 'तुम्ही नाईक, तुमची जमीन खूप आहे, तुम्ही जरा १०-५ एकर जास्त—' गावातले त्याला आग्रह करूं लागले. पण त्यानें विनोबांच्या भाषेत उत्तर दिलें—"आई आधीं घरात सर्वांना खाऊं घालते व मग स्वतः खाते. सर्वोदयाचा अर्थ हा च कीं आधीं इतराना मिळू दे, मग मला मिळू दे. मी नाईक, म्हणून तर मला आधीं इतरांची काळजी करायला हवी. मी फक्त सात च एकर घेणार."

त्या दिवशीं विनोबाचा पडाव जवळ च तेरुवेलीला होता. सारे तिथें गेले. विनोबाना ग्रामदान अर्पण करून त्यांच्या हातून पुनर्वितरणाचीं प्रमाणपत्रें घेतलीं. विनोबा बोलू लागले, "परमेश्वर स्वामी नी आपण सारे सेवक. आपण सारे भाऊ भाऊ. उच-नीच, ब्राह्मण हरिजन, गरीब-श्रीमंत हे सारे भेदाभेद ठेवणें म्हणजे अधर्म आहे, ईश्वरद्रोह आहे. हे सारे भेदाभेद मिटवून आपण भक्त बनूं या." तो आयुष्यात प्रथम च अतीव समाधानाचा अनुभव घेत होता. त्याच्या शेतात कालपर्यंत मजूर म्हणून खपणाऱ्याला आज पधरा एकर जमीन मिळाली होती. दोघाची दृष्टिभेट झाली. दोघाच्या हि डोळ्यातून आनंदाचीं आसवें ओघळलीं.

ओरिसाच्या यात्रेंत गेल्या एप्रिलमध्यें विनोबा बुगुडाला गेले होते. तेव्हा त्याचे विचार ऐकून हायस्कूलमध्यें शिकणाऱ्या दोन मुलावर खूप च परिणाम झाला होता. आणि मग उन्हाळ्याची सुटी सुरु होता च त्यानीं खेड्या-खेड्यात हिंडून भूमिकान्तीचा सदेश देण्यास आरंभ केला व दोन महिन्यात आठशें एकराचें भूमिदान मिळवलें. त्यापैकीं एक–रघुनाथ प्रधान–पुन्हा आपल्या जुन्या जीवनात परत जाऊं शकला नाहीं. त्यानें कोरापूटच्या

जगात च काम करायचें ठरवलें. आज तो बाबांना विचारू लागला कीं, " मीं मॅट्रिक्ची परीक्षा द्यावी म्हणून घरच्या मंडळींचा सारखा आग्रह पाठीशीं लागला आहे. पण माझें मन या च कामात रमलें आहे. तर मी काय करूं ? " बाबा त्याला म्हणाले, " तुझ्यात स्वतंत्र रीतीनें ज्ञान प्राप्त करण्याची शक्ति आली असेल तर इथे च काम करता करता अध्ययन चाऊ ठेव. पण तशी शक्ति आली नसेल तर मात्र परत जा व शाळेचा अभ्यास कर. "

आजच्या प्रवचनात रघुनाथच्या निमित्तानें स्वावलंबनावर नवीन विचार ऐकायला मिळाले. बाबा म्हणाले—" आजकाल शाळा कॉलेजातून विद्यार्थ्यांना थोडीबहुत माहिती दिली जाते पण स्वतंत्र रीतीनें ज्ञान कसें प्राप्त करायचें तें शिकविलें जात नाहीं. शिक्षणात स्वावलंबन हवें असें आजकाल सर्व च म्हणतात. पण 'स्वावलंबन' या शब्दाचा मी फार खोल अर्थ करतों. स्वावलंबनाचे तीन अर्थ आहेत—(१) पहिला अर्थ असा कीं विद्यार्थ्यांना आपल्या उदरनिर्वाहाकरता दुसऱ्यावर अवलंबून राहावें लागू नये. त्याकरता त्यांना एखादा उद्योग उत्तम रीतीनें करता यायला हवा. देशातील सगळे लोक काहींतरी उत्पादक परिश्रम करायला लागतील तर वर्गभेद उरणार नाहींत. (२) स्वावलंबनाचा दुसरा अर्थ असा कीं विद्यार्थ्यांमध्यें स्वतंत्र रीतीनें ज्ञान मिळवण्याची शक्ति निर्माण व्हायला हवी. त्याची प्रज्ञा स्वयंभू व्हावी व ते विचारवंत बनावेत (३) स्वावलंबन म्हणजे इतर सर्व अवलंबनापासून—आधारापासून—मुक्ति. मुक्तीकरता आपल्या मन-इन्द्रियादींवर ताबा ठेवण्याची शक्ति निर्माण व्हायला हवी. हा स्वावलंबनाचा तिसरा अर्थ आहे अशा रीतीनें शरीर, बुद्धि व मन तीहींची गुलामी नाहींशी व्हायला हवी."

दुपारीं नवजीवनमंडळाच्या कार्यकर्त्यांची सभा झाली. त्या वेळीं आदिवासी क्षेत्रात काम करणारे कार्यकर्ते कसे असावेत याविषयीं बरी च चर्चा झाली. विनोबांनीं प्रवचनात त्याचा उल्लेख करीत म्हटलें कीं, " आपल्या कार्यकर्त्यांना प्रकृति, संस्कृति व विकृति म्हणजे काय याची पूर्ण जाणीव असायला हवी. मानव जेव्हा प्रकृतीहून वर उठतो, प्रकृतीला काबूत ठेवण्या-

करता स्वतःमध्ये सुधारणा करीत जातो, तेव्हां 'संस्कृति' निर्माण होते आणि जेव्हा मनुष्य प्रकृतीहून खालीं जातो तेव्हा 'विकृति' निर्माण होते. मनुष्य जितक्या प्रमाणात आपलें जीवन प्रकृतीशीं जुळणारें ठेवील तितक्या प्रमाणात त्याच्या जीवनात प्रकृतीचा अंश राहील. आज शहरातल्या लोकांच्या जीवनात प्रकृतीचा अंश फार च कमी उरला आहे, विकृति फार च आलेली आहे. पण त्या च बरोबर त्यांच्या जीवनात काहीं संस्कृति देखील आहे. आदिवासींच्या जीवनात प्रकृतीचा अंश अधिक आहे, संस्कृतीचा भाग कमी आहे व काहीं विकृति देखील आली आहे. तेव्हा आदिवासींची सेवा करू इच्छिणाऱ्यांनीं हें लक्षात ठेवायला हवें कीं आदिवासींमध्यें शहरातली विकृति येऊं देता कामा नये व त्यांच्या जीवनातली विकृति दूर व्हायला हवी. शहरातली संस्कृति इथें आणायला हवी व याची संस्कृति देखील टिकवायला हवी. त्या च बरोबर या लोकांच्या जीवनात जो प्रकृतीचा अंश आहे, त्याचें आपण हि अनुकरण करायला हवें. आता एक उदाहरण च घेऊं या. दूध हें प्रकृति आहे तर त्याचें लोणी हें संस्कृति आहे. चांगल्या फळाची दारू बनविणें ही विकृति आहे. तेव्हा ज्यांना प्रकृति, संस्कृति व विकृतीचें सम्यक् ज्ञान आहे असे च कार्यकर्ते इथें सेवाकार्य करायला लायक ठरतील "

कोरापुट जिल्ह्यातल्या विजयानगरम् ते रायपूर या एकुलत्या एक रेल्वे मार्गावरील तेरुवेली हें एक लहानसें स्टेशन आहे. गेल्या दोन महिन्यात प्रथम च आज आगगाडी दृष्टीस पडली. आता यानंतर महिना दीड महिना अगदीं दाट जंगलात जायचें होतें. नुमा (मालतीदेवी) माझी थट्टा करू लागल्या कीं—"बघ, ही गाडी तुला सरळ घरीं नागपूरला घेऊन जाईल." मी म्हटलें, "अन् इथें काय माझें घर नाहीं वाटतें?" त्यावर बाप्पा (गोपबाबू) हसत म्हणाले, "ती का जाईल आता नागपूरला? ती तर 'ओडिया झिअ' (मुलगी) झाली आहे. आमची मुन्न्या आहे ती!" असें म्हणून बाप्पानीं मला गुळखोबऱ्याचा 'खाऊ' दिला.

राष्ट्रपति राजेंद्रबाबू या च मार्गानें आंध्रातून मध्यप्रदेशात जाणार होते. विनोबाचा मुक्काम आज वाटेवरच्या तेरुवेली गावात आहे हें कळता च

त्यांनीं इथें थांबून विनोबांची भेट घ्यायचें ठरवलें. तेव्हेलीसारख्या लहानशा गावात राष्ट्रपति येणार असें जर कोणीं दोन दिवसापूर्वी सांगितलें असतें तर विश्वास तरी बसला असता का? राष्ट्रपतींच्या आगमनाची वार्ता ऐकता च इथें अधिकाऱ्यांची धावपळ सुरू झाली. एकवीस तारखेला पहाटेची प्रार्थना चालू होती. चहूकडे अंधकार. सारे ध्यानस्थ बसले होते. ईशावास्याच्या ओडिया भाषेतील अनुवादाचा पाठ चालू होता. राष्ट्रपति आले व हळू च बाबांच्या शेजारीं बसून प्रार्थनेंत सामील झाले. प्रार्थना संपली. बाबांनीं डोळे उघडून पाहिलें तों राष्ट्रपति शेजारीं बसलेले दिसले. दोघांची प्रेमभेट झाली. बाबा नेहमीं म्हणतात कीं, "दिल्लीच्या राष्ट्रपति-निवासात राहून देखील राजेन्द्रबाबूंचें मन आमच्याबरोबर च असतें."

ग्रामीणांची सेवा करीत करीत स्वतःच ग्रामीण बनलेले बरे च कार्यकर्ते तिथे उपस्थित होते. भारताच्या राष्ट्रपतींनें त्या कार्यकर्त्यांना म्हटलें कीं, "तुम्हाला हें काम करायला मिळतें आहे हें तुमचें फार मोठें भाग्य आहे. इथें जो प्रयोग चालू आहे त्याचा परिणाम भारतावर च नव्हे तर साऱ्या जगावर होणार आहे. ग्रामदानामुळें आपल्याला एक सुवर्णसंधि मिळाली आहे. त्या संधीचा फायदा घेऊन आपण इथें गांधीजींच्या तत्त्वाचें एक सजीव चित्र निर्माण करू शकूं. तुमच्या अविरत कार्यामुळें व उत्साहामुळे तें सजीव निर्माण होईल अशी मला पूर्ण खात्री आहे. आज ज्या लोकांना आपलें तत्त्वज्ञान पटत नाहीं अशा लोकांना देखील मग तें सजीव चित्र पाहून आपलें तत्त्वज्ञान पटू लागेल."

आज बाबा खास राजेन्द्रबाबूंकरता म्हणून नित्याप्रमाणें पहाटे पाचला दुसऱ्या मुक्कामीं जायला न निघता त्यांना निरोप देऊन त्यांची गाडी निघून गेल्यावर दुपारीं बाराला निघाले. ऐन दुपारीं यात्रा करण्याचा हा पहिला च प्रसंग. पण सूर्य ढगाचें पांघरुण घेऊन पहुडला होता म्हणून यात्रा सुखकर झाली. अगदीं ठीक सभेच्या वेळेला म्हणजे दुपारीं तीन वाजता आम्ही पुल्लिकणाला पोहोंचलों.

इकडचे आदिवासी लोक गायीम्हशींचें दूध पीत नाहींत. वासराचें दूध अन् तें माणसांनें का प्यायचें असें तें म्हणतात. नुमा सांगतात कीं

त्याच्या अनुगुळच्या आश्रमात येणाऱ्या आदिवासी मुलाना तिथे इतर लोक गायींचे दूध पितात हे पाहून आश्चर्याचा धक्का च बसतो. मात्र काही भागातले आदिवासी लोक गाय बैल मारून खातात. आज सध्याकाळी गावचे लोक बाबाजवळ शेतीकरता बैलाची मागणी करत होते. बाबा हसत म्हणाले, " उद्या जर एखादा बाघ माझ्याजवळ बैल मागेल तर मी त्याला बैल देईन का ! " त्यातील गोंच त्या लोकाना कळली नी ते लगेच म्हणाले की, " यापुढे आम्ही बैल खाणार नाही." नतर बाबा आमच्या-जवळ म्हणाले की, " ह्या लोकाना गोपालनाची विद्या शिकवायला हवी. त्याना दूध तूप खूप खायला मिळेल तर त्याचे आरोग्य हि सुधारेल."



## आईच्या आठवणी

कुंभारढमिणी, नानीरीगुडा,
हाटमुनिगुडा, मुनिगुडा
२२ ते २५ ऑगस्ट १९५५

खेड्यापाड्यात घडत असलेल्या भूमिक्रान्तीमुळे मूल्यपरिवर्तनाचे वारे वेगाने वाहू लागले आहे. कालपर्यन्त जे अशक्य वाटत होते ते आज शक्य होऊ लागले आहे. कुंभारढमिणीला दुपारच्या वेळी बाबा ओडिया भागवत वाचण्यात मग्न होते. तेव्हा एका मुलाला घेऊन एक गृहस्थ आले व त्यांनी बाबाना नमस्कार केला. बाबांनी मान वर करून बघितले. ते गृहस्थ म्हणजे दीड महिन्यापूर्वी दुर्गाला भेटलेले जमीनदार होते. त्यांनी भूदान व साधन-दान दिले होते. बाबा फिरून इकडच्या विभागात आले हे ऐकून ते आज आपल्या मुलाला घेऊन चार मैलाची वाट चालून बाबाना भेटण्याकरता आले होते क्षेमकुशल झाल्यानतर ते बाबाना म्हणाले, " या मुलाच्या शिक्षणाचा प्रश्न च आहे माझ्यासमोर." बाबा त्याना म्हणाले, " तुमच्या घरी जमीन आहे, मग मुलाला शेतीचे व विणाईचे शिक्षण द्या ना ! हे पहा, तुम्ही तो मुलगा माझ्या हाती सोपवून द्या बरे ! आम्ही कुजेन्द्रीला एक

ग्रामसेवक विद्यालय उघडणार आहेत, तिथे पाठवून देऊ त्याला !" बापाने व मुलाने दोघांनी हि या ठरावाला आनंदाने संमति दिली.

प्रार्थनाप्रवचनात या घटनेचा उल्लेख करीत विनोबा म्हणाले, "आजवर अशी प्रथा होती कीं बडया लोकांच्या मुलांकरता वेगळ्या शाळा असत व ते लोक हातानीं श्रमाचीं कामें करण्यात कमीपणा मानत असत. पण आता एका जमीनदाराचा मुलगा शेती व विणाईचें शिक्षण घ्यायला जात आहे. यावरून तुमच्या ध्यानात येईल कीं काळ किती वेगानें बदलतो आहे. यापुढें नवा समाज निर्माण होणार आहे. त्यात प्रत्येक माणूस घाम गाळून भाकरी कमावण्यात प्रतिष्ठा नी धर्म आहे असें मानेल. यापुढें मजुरांचीं आणि विद्वानांचीं मुलें एका च शाळेंत शिकतील नी एका च शेतात किंवा कारखान्यात काम करतील. भारतातील शेतकऱ्यानो आणि मजुरानो, आता तुमचे दिवस येणार आहेत. इतर सारे लोक तुमच्या मागोमाग येतील. तरी तुम्ही आपल्या जीवनाची प्रतिष्ठा व महानता ओळखा. आम्ही जगातील सर्वांत मूलभूत असं काम करीत आहोंत, आम्ही देशाचे भरणपोषणकर्ते आहोंत, आम्ही च खरे भारतवासी आहोंत, याची तुम्हाला जाणीव व्हायला हवी."

आगऱ्याच्या मित्तलजींना बाबानीं मुनिगुडाला काम करायला पाठवल्यापासून ते त्याना 'मुनिगुड्याचे मुनि' म्हणून हाक मारतात. सध्या मुनिजींच्या उत्तरप्रदेशात पुरानें कहर केला आहे. त्याचा उल्लेख करीत बाबा हाटमुनिगुडाच्या प्रवचनात म्हणाले कीं, "आपण जमिनीचें विषम वाटप करतो म्हणून देव हि पाण्याचें विषम वाटप करतो. काहीं ठिकाणीं तो खूप जास्त पाऊस पाडतो तर काहीं ठिकाणीं अगदीं च कमी. त्यामुळें कुठें पूर येतात तर कुठें अवर्षण. तो जणू आपल्याला शिकवतो आहे कीं विषम वाटपामुळें सर्वांना च कसें दु:ख सोसावें लागतें तें !

"आजपर्यंत तुमच्या गावांना छोटीं गावें म्हणत असत नी मुंबई-कलकत्त्यासारख्या शहरांना मोठीं शहरे म्हणत असत. पण आता तुम्ही ग्रामदान देऊन खेड्याचें एक कुटुंब बनवाल तर तुम्हाला 'मोठे कुटुंब' ही संज्ञा मिळेल व शहरांना 'लहान कुटुंब' म्हणण्यात येईल."

सभा संपली. मावळत्या संध्येच्या प्रकाशातलें शेजारच्या निळ्या डोंगराचें, तलावाचें नी शेताचें सौंदर्य न्याहाळीत बाबांच्या शेजारीं आमचा दरबार भरला. बाबा आपल्या आईच्या गोष्टी सांगू लागले—" माझी आई कधीं कधीं फार अर्थपूर्ण गोष्टी बोलून जायची. ती घरात उरलेल्या शिळ्या पोळ्या कधीं इतरांना देत नसे—स्वतः च खात असे किंवा मला देत असे. आमच्या घरात एक गरीब विद्यार्थी राहत असे. त्याला ती नेहमीं ताज्या च पोळ्या खायला द्यायची. मीं एकदा तिला थट्टेंत म्हटलें कीं, " आई, तू तर म्हणतेस कीं सगळ्यांना समान मानायला हवें, पण तू स्वतः च तर पक्षपात करतेस ! त्या मुलाला शिळ्या पोळ्या देत नाहींस नी मला देतेस. म्हणजे तू त्याच्यात नी माझ्यात फरक करतेस." हें ऐकतां च ती एकदम म्हणाली, " खरें आहे तुझें म्हणणें, कीं मी तुझ्यात नी त्याच्यात फरक करतें. तुला मीं माझा मुलगा मानतें आणि त्याला देव मानतें. खरें म्हणजे असें व्हायला पाहिजे कीं सर्वांना च देव मानायला पाहिजे."—या घटनेचा माझ्यावर फार परिणाम झाला.

" लहानपणीं आई आम्हा मुलांना घेऊन खेड्यात राहायची. त्या वेळीं वडील नोकरीकरता परगावीं राहत. ते सुट्टींत घरीं आले कीं आम्हा मुलांकरता खाऊ घेऊन येत. त्यामुळें आम्ही त्यांच्या येण्याची अगदीं वाट पाहत असू. एका सुट्टींत ते घरीं आले अन् माझ्या हातीं एक चौकोनी पुडकें देत म्हणाले, " हा घ्या तुमच्याकरता खाऊ." मला जरा आश्चर्य च वाटलें. कारण खाऊचा पुडा तर गोल असायला पाहिजे. चौकोनी कसा झाला ? मीं तें पुडकें आईजवळ नेऊन दिलें तिनें पुडकें उघडलें तों त्यात ' बाल-रामायण ', ' बाल-भागवत ' अशीं तीन चार छोटीं छोटीं पुस्तकें होतीं. तें पाहून आईच्या डोळ्यात पाणी आलें माझ्या हातात पुस्तकें देत ती म्हणाली, ' तुझे वडील तुझ्याकरता याहून चांगला खाऊ कोणता आणणार ? ' आईच्या अशा सर्व वाक्यामुळें माझ्या मनावर संस्कार होत गेले."

डोळे पुसत पुसत बाबा पुढें बोलू लागले, " आई दररोज रात्रीं झोपतांना देवाला नमस्कार करीत म्हणायची, ' अनंतकोटिब्रह्मांडनायका,

माझे अपराध क्षमा कर '' आता एका ब्रह्माण्डाची च कल्पना केवढी विशाल आहे ! मग अनतकोटिब्रह्माण्डाचा तर कल्पना च करता यायची नाहीं. मनुष्याला अनत स्थल नी अनत कालाचें भान झाल्यास त्याच्या हातून पाप घडणार नाहीं. पाप सकुचित वृत्तीमुळें घडत.

" आई दुधाला विरजण लावताना नेहमीं रामाचे नाव घेऊन विरजण लावायची. मीं तिला एकदा थट्टेन विचारलें कीं, ' रामनामाची काय गरज आहे ? दूधाचें दहीं तर विरजणामुळें होतें ! ' त्यावर ती म्हणाली, ' नाहीं देव दुधाचें दहीं करतो ' पुढे एकदा मला दहीं खावें लागत असल्यामुळें मी वर्षभर स्वत करता विरजण लावीत असें. त्या वेळीं मला तिचे ते शब्द नेहमीं आठवायचे."

अधार पडून गेला होता. घड्याळाचा काटा कसा नी किती पुढें सरकला तें कुणाला च कळलें नाहीं दरबार बरखास्त होण्याच्या वेळेला बाबा म्हणाले, " जे लोक मोठमोठ्या चळवळी चालवतात त्याना किती योजना कराव्या लागतात आणि त्याच्या डोक्यावर काळजीचा केवढा मोठा भार असतो. पण माझ्या डोक्यावर कोणता हि भार नाहीं कीं मी कोणती योजना हि करीत नाहीं. रात्र झाली कीं लहान मूल जसें निश्चितपणें आईच्या कुशींत झोपीं जातें तसा च मी हि झोपून जातों. मला झोप यायला जेमतेम एखादें मिनिट लागत असेल नी एकदा झोंपलो कीं अगदीं गाढ नि स्वप्न झोंप येते. मी एखादी चळवळ चालवतों आहें असं मला कधीं वाटत च नाहीं मला च कुणीतरी चालवीत आहे आणि तो च या जगाला चालवील हें मला माहीत आहे "

मुनिगुडाला रल्वे स्टेशन व एक ल्हानसा बाजार आहे. बाहेरच्या प्रातातून आलेले काहीं व्यापारी हि इथें दिसले. आजच्या प्रवचनात विनोबा त्याना उद्देशून म्हणाले कीं, " आजची समाजरचना च अशी आहे कीं शोषण करण्याची इच्छा नसून देखील आपल्या हातून इतराचे शोषण होत असतें. तेव्हा शोषणाच्या या पापातून मुक्त होण्याकरता सपत्तिदानयज्ञाच्या रूपानें आपल्याला एक मोठी सुवर्णसधि च मिळाली आहे. "

सभेनंतर काही व्यापारी विनोबांना भेटायला आले. ते सर्वजण मिळून संपत्तिदानात दरवर्षाला काहीं ठराविक रक्कम देण्याचा विचार करीत होते. यातील विचारदोष दाखवीत विनोबा त्यांना म्हणाले, " संपत्तिदान हा एक जीवनविचार आहे. तुमच्या जीवनाचें हें तत्त्व च असायला हवें कीं आपल्या घरात जितकी माणसें आहेत त्यात आणखी एक जण म्हणजे समाजाचा प्रतिनिधि आहे. त्याला त्याचा हिस्सा देणें हा आपला धर्म आहे. माणूस एकटा च जन्म घेतो नी एकटा च मरतो. त्यामुळें त्याचा धर्म हि त्याला च करावा लागतो. तुम्हीं सर्वांनीं मिळून एक निश्चित रक्कम द्यावी हें मला पसंत नाहीं. तर तुमच्यापैकीं प्रत्येकानें संपत्तिदानाचा धर्मविचार मान्य करून मला तुमच्या घरात स्थान द्यावें अशी माझी इच्छा आहे. तुम्हीं आज दरवर्षाला एक निश्चित रक्कम देण्याचें कबूल केलेंत नी उद्या गरिबी आली तर तेवढी देऊं शकणार नाहीं. म्हणून च मी हिस्सा मागतों, रक्कम नव्हे. तुम्ही श्रीमंत असाल तर माझ्या हिस्स्यात अधिक येईल व गरीब असलात तर कमी येईल. पण तुम्ही श्रीमंत असा कीं गरीब असा, दरिद्रनारायणाचा प्रतिनिधि या नात्यानें मला तुमच्या घरात स्थान द्या."



## क्रांति म्हणजे मूल्यपरिवर्तन

शिवपदर, अमादोला, जगदलपूर, आगुलि
२६ ते ३० ऑगस्ट १९५५

या भागात कांहीं व्यापारी, सावकार व गणतंत्र परिषदेचे लोक ग्रामदानाला विरोध करतात व खेड्यात जाऊन लोकांना ग्रामदान न देण्याबद्दल भडकवतात अशा बातम्या कानावर येताहेत. अमादोल्याच्या सभेंत मुसळधार पावसात एकाग्रतेनें भाषण ऐकणाऱ्या जनतेसमोर विनोबा म्हणाले—

"भूदानासारख्या पवित्र कामात पक्षभेद मुळीं च आणता कामा नये. मी साऱ्या देशभर हिंडलों पण मला प्रत्येक ठिकाणीं दोन च पक्ष दिसले: एक उदाराचा व दुसरा कंजूष लोकाचा. प्रत्येक राजकीय पक्षांत उदार आणि कंजूष दोन्ने हि आढळतात. जगभरच्या उदार लोकांना एकत्र करून त्याच्या उदारतेनें कंजूष लोकांना हि उदार बनवायचें हा आमचा उद्देश आहे. इथें काहींच्या मनात असा हि गैरसमज निर्माण झाला आहे कीं या ग्रामदानाच्या कामात कुठें कुठें दबाव जबरदस्तीमुळें काम झाले आहे. पण हें पहा, ज्याना जबरदस्ती करायची असते ते असे उन्हापावसात नी थंडी-वाऱ्यात दान मागत पायीं पायीं हिंडत नाहींत! त्याचे मार्ग च मुळीं निराळे असतात!"

सध्याकाळीं कार्यकर्त्यांशीं चर्चा चालू असताना एकानें विचारलें कीं, "व्यापारी, सावकार वगैरेच्या विरोधाशीं सामना कसा करायचा?" बाबा म्हणाले, "याचें उत्तर तर बुद्धदेवानीं च देऊन ठेवलें आहे कीं क्रोधावर विजय मिळवायचा असेल तर आपल्याजवळ अक्रोध असायला हवा. तुम्ही सतत काम करीत रहाल, हजारों गरिबांकडून दान मिळवाल, तर आज विरोध करणाऱ्या बड्या लोकावर हि त्याचा परिणाम होईल. गंगा सतत वाहत असते म्हणून तिला इतर नद्या येऊन मिळतात. तुम्ही स्वतः मुख्य धारा बना म्हणजे झाल! मग दुसरे लोक आपसूक च येऊन मिळतील तुम्हाला!"

अशादोत्याच्या दुसऱ्या दिवशींच्या प्रवचनात ग्रामदानाच्या क्रान्ति कारकतेचें विवेचन होतें. प्रार्थनेंत एकानें 'आत्मारे आत्माकु देख' हें भजन म्हटलें होतं. त्याचा उल्लेख करीत बाबा म्हणाले, "आत्म्यात आत्म्याला पाहणें ही फार च मोठी गोष्ट आहे जगात आपल्याला जे जे प्राणी, जीं जीं रूपें दृष्टीस पडतात, त्या सर्वांमध्यें आपलें रूप च पहायला शिकणें, हा त्याचा अर्थ आहे भूदानयज्ञात, आपल्या कुटुंबात समाजाला समाविष्ट करण्याचा जो विचार आहे, तो व्यापक आत्मदर्शनाचा च एक लहानसा आणि नम्र प्रयत्न आहे असें मला वाटतें.

"ज्याप्रमाणें स्वराज्याचा उपयोग चांगल्या कामाकडे होवो की वाईट कामाकडे होवो, स्वराज्याचें एक स्वतंत्र मूल्य आहे त्या च प्रमाणें भूदान, संपत्तिदान ग्रामदान, इत्यादींचें एक स्वतंत्र मूल्य आहे इतर कामात नी यात मूलभूत स्वरूपाचा असा फरक आहे, कारण इतर कामाच्या योगानें फार तर कामकाजात सौख्य वाढेल पण यानें तर मूल्यपरिवर्तन होतें. जेव्हा लोक आपल्या कुटुंबाला व्यापक समजून आपल्या जमीन किंवा संपत्तीचा एक हिस्सा समाजाला देतात किंवा खेड्यातील सर्व लोक ग्रामदान देऊन व्यक्तिगत मालकीहक्काचें विसर्जन करतात तेव्हा मूल्यपरिवर्तन घडून येतें. या मूल्यपरिवर्तनाला च 'शांतिमय क्रान्ति' असें म्हणतात.

"वास्तविक पाहता क्रान्तीच्या मागें 'शान्तिमय' हें विशेषण जोडण्याची कांहीं च गरज नाहीं. कारण क्रान्ति कधीं अशान्तिमय होऊं च शकत नाहीं. जिथें माणसाचे विचार बदलले नाहींत, फक्त समाजाच्या बाह्यरचनेंत थोडासा बदल झाला, तर त्याला कांहीं क्रान्ति म्हणता येणार नाहीं क्रान्ति झाली म्हणजे माणसाचीं मूल्यें बदलतात नी समाजात मूलभूत स्वरूपाचा असा बदल होतो आणि मूल्यें बदलतात तीं विचारानें, शान्तीनें च बदलतात धमकावून, भीति दाखवून किंवा हिंसेनें कांहीं परिवर्तन घडवून आणलें तरी तें कांहीं विचारपरिवर्तन नसतें कांहीं लोक 'शीघ्रवादा'ला च क्रान्ति म्हणतात पण तातडतोब खायला मिळायला हवें मग भाकरी मिळाली नाहीं तर विष हि चालेल, पण कांहीं तरी तातडतोब मिळायला हवें, असले मल्तेसलते विचार मला मान्य नाहींत" -

जगदलपूरला जाणारी दाट अरण्यातली दहा मैलाची उचसखल पाऊलवाट. कुठें गुडघाभर चिखल तर कुठें कमरेइतकें पाणी. त्यातून एकोणीस नद्यानाले ओलांडीत जायचें होतें. पण वाट इतकी रमणीय कीं थकवा कसा तो मुळीं वाटला च नाहीं. मधून सळसळ निनाद करीत जाणारे ओढे लागायचे. जणू युगानुयुगापासून त्याची तपस्या चालली होती नी आता बाबाच्या स्पर्शानें पावन होत व आम्हा पामराना पावन करीत ते आनदानें पुढें धावत होते. मधून मधून पावसात न्हालेलीं भाताचीं रसरशीत शेतें दिसायचीं. काहीं वेळ पावसाची झिमझिम चालली नी मग सारा वेळ भुरभुर स्वर्गातल्या कारंज्यातील गुलाबपाण्याचे तुषार उडत असल्यागत वाटत होतें. मधून च तुरेंदार गवताच्या नाजुक पात्यावरचे दवबिंदू लक्ष वेधायचे तर मधून रानफुलाचे चित्रविचित्र रग नी आकार. मधून पाखराची गोड शीळ ऐकू यायची. डोळ्याना रूप दिसत नाहीं पण कानाना स्वर तेवढा ऐकू येतो. कुठून येतो, कोणता सदेश घेऊन येतो, काहीं कळत नाहीं. तें पाखरू उपनिषदाच्या ऋषींची च भाषा बोलत होतें जणू कीं नाम, रूप मिथ्या आहेत. अमृतत्वाकडे नेणारे मनमय सेतु निर्मिणारे ते अनामिक, अरूप कवि आणि आपल्या नामरूपाचा पत्ता न लागू देता, आमच्या हृदयाला सुरेल ध्वनिलहरींच्या पंखावर बसवून आनदलोकाकडे नेणारें तें पाखरू ! जणू त्या दोहोंत एक प्रकारची आतरिक सगति होती !

## ‘ आम्ही रामाचे पाईक, राम आमुचे नाईक ’

डागसुरडा
३१ ऑगस्ट व १ सप्टेंबर १९५५

अति पावसामुळें नद्या तुडुंब भरून वेगानें वाहू लागल्या कीं मग नदी पार करण्याचे दुसरें साधन नसल्यामुळें एका ठिकाणीं अडकून पडावें लागतें, हा येथील लोकांचा नित्याचा अनुभव आम्हांला हि आला. थागुलीहून कुटागुडाला जाऊन डागसुरडाला जायचें असा कार्यक्रम होता. पण वृष्टिधारेने अडविल्यामुळे तिला टाळून दाट जंगलातल्या दूरच्या वाटेनें सरळ डागसुरडाला जायचें ठरलें. त्याप्रमाणें कांहीं अंतर गेल्यावर इतकें घनदाट जंगल लागले कीं वाट दिसेना. कोणत्या दिशेनें व कुठे जात आहोंत हें समजायला हि मार्ग उरला नाहीं. कांहीं मंडळी बरीच मागें राहिली होती. बाबांना त्याची काळजी वाटू लागली. एका खेड्यापाशीं येता च ते म्हणाले, ‘ त्यांना पुढची वाट दाखवण्याकरता कुणीतरी इथें थांबा. ’ चक्रभाईला तिथें ठेवून आम्ही पुढें निघालों. झाडांच्या बुंध्यावर बाण कोरीत, कागद व कापडाच्या चिंध्या टाकीत आम्ही पुढें निघालों. थोडें अंतर गेल्यावर मागें पाहिलें तों चक्रभाई पळत येताना दिसला. “ मला तिथें एकटें रहायची भीति वाटते ” असें तो म्हणू लागला. “ दिवसा-ढवळ्या कसली रे भीति ? ” कुटभाईनें किंचित् रागावून म्हटलें. पण तो घाबरत म्हणाला, “ इथें दिवसा च तर किंतितरी लोकांना वाघानें खाल्लें आहे.” पुन्हा मागें जायची वाट सापडणें सोपें नव्हतें तेव्हा मागच्या लोकांची काळजी देवावर सोपवून आम्ही पुढें निघालों. मंगलामावशी हि मागें च राहिल्या होत्या. कुसुमाई थट्टा करू लागले कीं ‘ आता मावशींची भेट व्हायची आशा च नको ’ तेवढ्यात आमचा वाटाड्या गडबडला व म्हणाला, “ आता मला पुढचा रस्ता आठवत नाहीं.” पुढें काय करायचें हा प्रश्न पडला. सूर्यनारायण हि आपला प्रताप दाखवीत होता. बाबा तर अगदीं थकून गेले होते. पण देवाला भक्ताची काळजी असते. दूरवर एक गाव दिसू लागलें. वाटाड्यानें धावत जाऊन तेथून एक मार्गदर्शक माणसाला आणलें. बाबा मोठ्या कष्टानें एकेक पाऊल पुढें टाकीत होते. त्यांनी दहीं

घ्यायची वेळ झाली. जवळचे द्रव्य आवले म्हणून ते हि देता येईना. खाण्याची वेळ चुकली कीं बाबांच्या पोटातला अल्सर त्रास देऊं लागतो च पोट दुखूं लागतें. बाबा म्हणतात, "त्याच्यावर दोन तीन तासाच्या अंतरानें सतत अभिषेक करीत राहिले तर च तो शांत राहतो."

नंतर चांगला रस्ता लागला. मैलांच्या दगडानें सांगितलें कीं अजून तीन मैल अंतर आहे. ऊन वाढत च होतें वाटेंत एक शिलाखंड लागलें. मागें जूनमध्यें एकदा आम्ही या च रस्त्यानें जात असताना मी मागें पडलें होतें बाबा वरे च पुढें निघून गेले होते श्लोक पाठ करीत चालत असल्यामुळें माझें आजूबाजूला लक्ष नव्हतें. त्या शिलाखंडावर एक भला मोठा वाघ बसला होता. मागून येणाऱ्या एका गाडीवानानें आम्हा दोघांना एकत्र पाहिलें व तो घाबरून मागें फिरला. ही गोष्ट मला मागून नाप्पानीं सांगितली. त्या वेळीं मला कांही च कल्पना नव्हती. कदाचित् वाघोबा हि माझ्याप्रमाणें च दुसऱ्या कुठल्या तरी विचारात दंग असल्यामुळें त्याचें माझ्याकडे लक्ष गेलें नसावें किंवा त्या वेळीं मी 'नाय हन्ति न हन्यते' पाठ करीत होतें म्हणून त्याला खाण्याची प्रेरणा झाली नसेल! आज तें शिलाखंड पाहून बुदुभाई यट्टा करूं लागले, "निर्मलाताई, तुमचा दोस्त त्या दिवशीं इथें च बसला होता" व नाप्पा म्हणूं लागले, "त्या दिवशीं बिचाऱ्या वाघाच्या नशिबीं 'रसगुल्ला' नव्हता!"

अखेरीस १०॥ च्या सुमारास आम्ही मुक्कामीं पोहोंचलों. बिछान्यावर अंग टाकीत बाबा म्हणाले, "आजवर एवढा थकवा कधीं वाटला नाहीं." इथें आज येण्याचा आमचा कार्यक्रम काल संध्याकाळीं च ठरल्यामुळें आज पोहोंचल्यानंतर पिण्याकरता दूरच्या विहिरीवरून पाणी आणण्याचें व लाकडें आणून चूल पेटविण्याचें काम सुरू झालें. सारे च चालून थकलेले पण लगेच कामाला लागले. भूक तर सडकून लागलेली. पण चुलीच्या आराधनेंत जायचा तो वेळ जाणार च

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बाबा गावातें घरन् घर पाहायला निघाले. डागमुरडा हें या भागातलें जागृत गाव आहे व आसपासच्या प्रदेशानें नेतृत्व करणारें आहे. आसपास अनेक गावें ग्रामदानात मिळालीं होतीं. हें

गाव अजून मिळालें नव्हतें—पण त्या मार्गावर होतें. ह्या गावात काहीं चागले कार्यकर्ते तयार होत आहेत. गावात चागली व पडती मिळून एक हजार एकर जमीन आहे. त्यापैकीं २६८ एकर चागली आहे. एकुण ११८ घरें. त्यापैकीं १८ भूमिवानाचीं. त्यातील फक्त दोन व्यक्ति सोडून बाकी सर्व ग्रामदानास तयार आहेत. गावचे बडे जमीनवाले, सावकार भगवानबाबू यानीं आपली सर्व जमीन दान दिली आहे व गेले काहीं महिने ते भूदानाचें काम करीत आहेत. बाबा प्रथम ज्या घरात शिरले तें भूमिहीनाचें होते. त्यानें आपली करुण कहाणी सागितली. बाबा म्हणाले, "तुम्हा सर्वांना अवश्य जमीन मिळेल. लवकर च ह्या गावाचें ग्रामदान होईल." या गावात गेल्या काहीं वर्षांपासून वैद्यनाथबाबू व मालती विद्याल काम करीत आहेत. त्यामुळें गावात सर्वोदयविचाराचा खूप प्रचार झाला आहे. घराघरातून बायका सुताच्या गुंड्या अर्पण करायला समोर येत होत्या. एका कोमटी दुकानदाराचें घर लागलें त्यानें नुकतें च भूदानाकरता जीवनदान दिलेलें आहे. गावात एकूण तीन दुकानें आहेत व आसपासच्या कित्येक खेड्यातले लोक येथून च माल खरेदी करतात. घरोघर भृगराज, सारिका व पोपट दिसले. मोर तर इकडून तिकडे मजेत हिंडताना दिसत होते. मधून च पिसारा उभारून डौलानें चालायचे. एका ४५ एकरवाल्या जमीनमालकाचें घर लागलें ते सामोरे आले. त्यानीं आठ एकराचें दान दिलें आहे व आणखी पाच देणार आहेत. पण ग्रामदानाला अजून तयार होत नाहींत. ते म्हणाले, "आजवर आम्हाला आरामात रहायची सवय झाली तेव्हा इतरापेक्षा थोडी जास्त जमीन आपल्याजवळ असावी असें वाटतें" ग्रामदानापैकीं कित्येक गावात वाटपाच्या वेळी गाववाल्यानीं आपणहून च अशा काहीं लोकाना एकदम जड जाईल म्हणून थोडी जास्त जमीन देण्याचें ठरवलें होतें. बाबानीं त्याना तसें सागता च ते म्हणाले, "जमीन अधिक मिळाली तरी ग्रामदान झालें, म्हणजे मालकी जाते. अजून मालकी सोडायला माझ्या मनाची तयारी होत नाहीं." बाबा त्याना समजावू लागले, "आजवर तुम्ही फक्त ४-५ मुलाचे बाप होता, आता गावच्या सर्व मुलाचे बाप बना." यावर 'विचार करीन' असें त्यानीं उत्तर दिलें. त्याची पत्नी देखील त्याना सारखी समजावीत असते कीं— "विनोबाजी योग्य तें च सागतात. देऊन

टाका सारी जमीन." गाववाले तिची ख्याति सागत होते कीं ती फार साध्वी स्त्री आहे व स्वत च्या मुलाना देखील उपाशी ठेवून गरिबाना खाऊ घालील.

डम (हरिजन) लोकाची वस्ती गावापासून थोडी दूर होती. तिथें एकुण आठ घरें होतीं व त्यातील चार विणकराचीं. सध्या विणकर हातचें व मिलचें, दोन्ही सुतें विणतात. बाबानीं गावकऱ्याना सागितलें कीं, "प्रत्येक घरात चर्खा आला पाहिजे. विणकरानीं ते च सूत विणलें पाहिजे व सर्वांनीं गावात च तयार झालेलें कापड वापरलें पाहिजे." लोकानीं ही सूचना आनदानें मान्य केली. हरिजनाचीं घरे फार च ठेंगणी होतीं. पावसापासून बचावण्याकरता ते अशीं घरे बाधतात. बाबानीं सर्वांना सागितलें कीं या हरिजनाना चागलीं घरे बाधून द्या. बिळातून प्राणी बाहेर पडावे तशीं या घरातून माणसें बाहेर पडतात! हरिजन गोमास खातात हे ऐकून बाबानीं त्याना गोमांस खाणें सोडण्यास सागितलें व त्यानीं कबूल हि केलें.

नतर आम्ही आणखी दूर असलेल्या कध (आदिवासी) लोकाच्या वस्तींत गेलों. पूर्वी ते सर्व भूमिहीन होते पण आता सर्वांना जमीन मिळाली आहे. त्यानीं जेव्हा शेतीकरता बैलाची मागणी केली तेव्हा बाबा त्याना म्हणाले कीं, "तुम्हाला बैल देण्याचा प्रयत्न अवश्य केला जाईल. पण तुम्ही हातानें हि शेती करायला शिका. आम्हीं आमच्या पवनारच्या आश्रमात 'ऋषिशेती' (हातानें शेती) प्रयोग करून पाहिला व तो यशस्वी हि झाला.

पावसाचें पाणी पिऊन प्रसन्न झालेल्या पोपटी भातशेतीमधून जाणाऱ्या पायवाटेनें निवासस्थानाकडे परत जात असताना गावाकडे पुन्हा एक दृष्टिक्षेप टाकला. भूमिवान, भूमिहीन, हरिजन, परिजन, गिरिजन, गरीब, श्रीमत सारे भेदाभेद असलेल्या ह्या गावाचें ग्रामदानानतर किती वेगळें रूप दृष्टीस पडेल! सारे भेदाभेद लोपून सर्वांचें एक कुटुब बनेल!

अधाऱ्या रात्रीं पावसाची झिमझिम चालू असताना एक प्रकारची भयाणता पसरलेली असते. पण बाबाच्या जवळ ज्ञानचर्चा चालली म्हणजे

भयाणता भासत नाहीं. आजकाल अरण्यातल्या शांतीच्या सुरात बाबाचें हि सतत ध्यानचिंतनाचें मौन संगीत चाललेलें असते त्यामुळे नेहमींच्या संध्याकाळच्या चर्चेत हि मौन भाषा च अधिक वापरली जाते. आज मात्र बोलकी चर्चा चर्चा सुरु झाली. अंधारात दृष्टीचें कार्य सरलें होतें. बाबांच्या वाणींतून ओघळणारे शब्दमणि आम्हीं श्रवणाच्या ओंजळींत साठवीत होतो. मागें एकदा तात्या शिरूऱ्यानीं बाबाना प्रश्न विचारला होता– " तुमच्या कुळात तुमच्या मागें काहीं आध्यात्मिक परंपरा होती का ? " बाबा म्हणाले, " आमच्या कुळात काय होतें तें मला माहीत नाहीं व मला कधीं तें जाणून घेण्याची इच्छा हि झाली नाहीं. जीव ज्या कुळात जन्मतो त्या कुळातले संस्कार घेतो असें म्हणण्यापेक्षा तो आपले पूर्वजन्माचे संस्कार घेऊन येतो असें म्हणणे अधिक योग्य होईल. तेंव्हा त्याची कुलपरंपरा म्हणजे त्याची मागच्या जन्माची परंपरा. त्या संस्कारानुसार तो जन्म घेतो, कुल निवडतो. " त्या चर्चेचा उल्लेख करून मीं आज त्याना विचारलें, " मग आई-वडिलांच्या संस्काराना काहीं च अर्थ नाहीं का ? " बाबा– " जिवाची एक संस्कारपरंपरा असते त्या प्रवाहात तो विशिष्ट आई-बापाच्या पोटीं जन्म घेतो. आईबाप निवडण्याचें काम जीव करतो. जिवाची परंपरा ही एक रेषा व कुलपरंपरा ही दुसरी रेषा. या दोन रेषा ज्या ठिकाणीं एकमेकींस छेदतात तिथें जिवाचा जन्म होतो." मग ते हसत पुढें म्हणाले, " महापुरुषाच्या जीवनासंबंधीं लिहिताना त्याचे आईवडील व कुळ याकडे पाहणे बेकार च आहे. त्याचें चरित्र लिहिताना तें एक पहिले प्रकरण उगीच च घातलेलें असतें. "



# 'स नो वाजम् अनखाणम्'

हनुमतपूर
२, ३ सप्टेंबर १९५५

सकाळपासून पावसाची झड लागली होती. रस्ता आलटून पालटून दगडाचा व चिखलाचा. पावसाचा जोर वाढला कीं बाबा आनदानें जोर-जोरात वेदमंत्र गाऊ लागतात—' स नो वृष्टिं दिवस्परि। स नो वाजमनखाणम्। स न: सहस्रिणिरिष '। (हमपर वृष्टि बरसे। हमारी गति अनिरुद्ध हो। हमारी इच्छाशक्ति शतगुणित हो।) हनुमतपूरजवळ येता च वर्षाचें वैभव घेऊन वाहणाऱ्या वडाधारेची खळखळ ऐकू आली. या विभागात वळणें घेत घेत वाहणारी वडाधारा आम्हाला ७–८ दा पार करायची आहे. पाणी वाढत होतें व वेग हि अशा वेळीं ठेंगणेपणाची विशेष च जाणीव होते. मी व मगलामावशी जेमतेम न बुडता दुसऱ्या तीरीं पोहोंचलो. कांबळें घेऊन आकाशातून पडणाऱ्या वृष्टीपासून बचावण्याचा प्रयत्न केला तरी धरतीवरील नद्या अगदीं व्यवस्थित भिजवतात आणि मग ओल्याचिंब कपड्यानीं पुढची वाट चालावी लागते.

हनुमतपूरला एका लहानशा जुनाट डाकबगल्यात दोन दिवस मुक्काम होता. दोन्हीकडच्या नद्यांचे पाणी वाढत होतें. इथें च अडकून पडावें लागणार कीं काय अशी शका येऊ लागली. आम्ही वीस पचवीस मडळी च सामान नेणारे ' भाऊजे ' मिळून सुमारे चाळीस लोक आहोंत इकडचीं गावें लहान त्यामुळें एवढ्याना खायला मिळण्याची शक्यता नसते म्हणून परवापासून आम्ही बरोबर डाळ तादुळाचें पोते घेऊन निघालों. पण तो हि शिधा जेमतेम २–३ दिवस च पुरणारा आहे. बाबा हसत म्हणाले, ' उपाशी रहायची तयारी ठेवायची ' त्याच्याकरता रोजचें दूध आणणाऱ्या कार्यकर्त्याला हि पावसाचा मार खात नद्या पोहून यावें लागत. ' उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म ' म्हणत असताना देखील तो च तो वरणभात रोज खाताना खरोखर च 'यज्ञकर्म' केल्यासारखें वाटतें. अशा वेळीं मगलमावशी कुठून तरी गूळखोबरें आणून लाडू करायच्या किंवा कणीक आणून तीन दगडाची चूल करून गरम पोळ्या करून वाढायच्या तेव्हा

त्या पदार्थांची गोडी अवीट वाटायची. पण आता नद्यामुळें आमचा बाहेरच्या जगाशीं अजिबात संबंध तुटला असल्यामुळें पोटभर वरणभात मिळणे हे च भाग्य मानावें लागते.

येथून पंधरा मैलावर चंद्रपूर नावाचें मोठें तीनशेंहून अधिक वस्तीचें गाव आहे. ग्रामदानात मिळालेलीं सर्व च गावें आदिवासींचीं नाहींत. चंद्रपूर हे पाईक (क्षत्रिय) लोकाचे गाव. तेथील विश्वनाथ पात्र यानीं ४॥ हजार एकर जमीन दान दिली व पुनर्वितरणात त्याना फक्त तीस एकर जमीन मिळाली. जमीन चागली आहे व हत्तींचे कळप येऊन सारीं पिकें खाऊन टाकतात त्यामुळें गेल्या सात वर्षांपासून बरीच जमीन उजाड झाली आहे. चंद्रपूरच्या दामोदर पात्र या गृहस्थानीं आपली दोनशें एकर जमीन दान दिली व पुनर्वितरणांत फक्त चोवीस एकर घेतली. त्याच्या मातेने व पत्नीनें मोठ्या आनदाने ग्रामदानाला समति दिली होती.

वैद्यनाथरावू आज आपले अनुभव सागत होते. ते म्हणाले कीं येथील लोकाना कुणीं म्हटलें कीं तुम्हीं ग्रामदान दिलेंत तर ते म्हणतात, "आम्हीं कुणाला काहीं दिलें नाहीं. विनोबाजी सागतात त्याप्रमाणे आपल्याजवळ असलेलें सारें काहीं सर्वांना वाटून द्यायचे ठरवलें." तशी इथल्या आदिवासी लोकात इतराना वाटून द्यायची जुनी च पद्धत आहे. जमीन देवाची ही कल्पना देखील त्याच्या परपरेशीं जुळणारी च आहे. बहुधा प्रत्येक गावात एक 'नाईक' असतो नि सारे लोक त्याच्या सल्ल्यानें काम करतात. 'आज्ञा' (विश्वनाथ पट्टनाईक) जेव्हा त्या लोकांना सागतात कीं एका माणसानें पेज द्यायची नी दुसऱ्यानें उपाशी रहायचें हें देवाघरच्या न्यायाला धरून नाहीं, तर लोकाना हें चटकन समजतें. विनोबाना ते 'महाप्रभु' म्हणतात. 'महाप्रभु' दारू सोडायला सागतात म्हणून हे लोक दारू सोडतील.

ह्या भागात एरवीं च बाहेरून फारसें कुणी येत नाहीं. मग ऐन पावसाळ्यात कोण येणार? फक्त मधून मधून व्यापारी व सावकाराचे एजंट लोकाना लुटण्याकरता येऊन जातात. त्यामुळें पावसाळ्यात त्याच्याकडे जाऊन त्याच्या हिताच्या चार गोष्टी सागणाऱ्या विनोबाकडे पाहून त्याना

वाटते कीं आपला एखादा जिव्हाळ्याचा मित्र च आला आहे. त्यातून विनोबाचा पोशाख हि जवळ जवळ त्याच्या च सारखा असतो त्यामुळे ते लोक आपापसात म्हणतात कीं, 'विनोबा तर कध च आहेत !'

हनुमतपूरचें ग्रामदान व पुनर्वितरण मागे च झालें होतें. आजवर वाटप झालेल्या गावात सर्व भूमिहीनात अधिक जमीन इथल्या च 'हाऊका सुबा' नावाच्या भूमिहीनाला मिळाली होती. त्याचें कुटुंब मोठें होतें. आजवर दुसऱ्याच्या शेतावर मजुरी करून कसेंतरी पोट भरण्यावाचून त्याला दुसरा मार्ग च नव्हता. पण आता त्याला बावीस एकर जमीन मिळाली होती. तो आपल्या नायकामुलासह मोठ्या उत्साहानें भूमातेची सेवा करीत होता. आज सभेत चद्रपूरचे वितरण आले. तेथील पुरुष व स्त्रिया देखील लहान मुलाना घेऊन निबिड अरण्यातून पावसाचा मार खात पधरावीस मैलाची वाट चालून सभेकरता आले होत. ते काल सकाळीं च इकडे यायला निघाले त्याची प्रशसा करीत विनोबा आजच्या प्रवचनात म्हणाले, "काहीं लोक असे असतात कीं जे काळाचीं पावले ओळखू शकत नाहींत व नेहमीं भूतकाळात राहतात पण काळपुरुष असा जबर्दस्त असतो कीं तो सर्वांना आपली ओळख पटवून दिल्यावाचून राहत नाहीं त्याला त्याची ओळख वेळीं च पटते तो खरा बुद्धिमान् आणि ज्याला ओळख पटत नाहीं त्याला शरण यावें लागतें एकदा विचाराचें वारें पसरू लागलें कीं कुणी हि त्यापासून अलिप्त राहू शकत नाहीं. ग्रामदानाचें वारें साऱ्या देशभर पसरेल आणि हिंदुस्थानातल्या प्रत्येक खेड्याचे ग्रामदान होईल असा मला पूर्ण विश्वास वाटतो."

अधार पडू लागला. काळोखाच्या आवरणात चहूकडची घनदाट जगलें भयाण भासू लागलीं. कालपासून आकाश फाटल्यागत पाऊस पडतो आहे. मानवानें निर्मिलेल्या मोटरी, आगगाड्या, विमानें, तारायत्र इत्यादि काहीं च आधुनिक साधनाचा या जगात प्रवेश नव्हता तिकडे बाहेरच्या जगात अणुयुद्ध सुरू झालें असलें तरी त्याचा आम्हाला पत्ता लागणें शक्य नव्हतें. प्रफुल्लभाई म्हणाला, "तिकडे गोवा स्वतत्र झाला असला तरी आम्हाला कळायचें नाहीं." आणि आमच्या जगात आमच्यापैकीं कुणी वाघाच्या

पोटात गेलें असते, कुणी सापाच्या विषाला बळी पडलें असतें, कुणी मोठा आजार होऊन औषधपाण्याविना देवाघरीं गेलें असतें किंवा हत्तींच्या कळपानें आम्हा सर्वांना नामशेष केल असतें तरी बाहेरच्या जगात ती बातमी जायला कमींतकमी ५-६ दिवस लागले असते. पूर्वी मोटरच्या रस्त्यावर असताना आम्ही रात्रीं आमच्या निवासाभोंवतीं पेट्रोमॅक्स ठेवीत होतों पण आता गेले काहीं दिवस तें अशक्य च होतें. आता तर केरोसिन संपत आल्यामुळे अगदीं आवश्यक तेवढे च कदील वापरायचे, नाहीं तर उद्यापासून साऱ्या रात्रीं घोर अंधारात काढाव्या लागतील असें बुबुभाईनें सर्वांना सांगितलें. एका मिणमिणत्या कंदिलाच्या प्रकाशात आम्ही ' गीता प्रवचनें ' याचत बसलों होतों तेवढ्यात एकानें बातमी आणली कीं पलीकडच्या फळफळीया नदीचें पाणी खूप वाढलें आहे, उद्या नदी पार करणें अशक्य आहे 'मग आता काय करायचें?' कुणीतरी विचारलें. बुबुभाई हसत म्हणाले, ' रामनाम घ्यायचें ! ' तेवढ्यात दुसरा कार्यकर्ता बातमी घेऊन आला कीं इथून काहीं मैलावर असलेल्या एका जागीं नदीचे पाणी कमी असतें तेव्हा तिथून पार करु शकू. पण मग पुढचा सारा कार्यक्रम बदलावा लागणार व ठाबा ठरल्या दिवशीं आपल्या गावीं आले नाहींत तर तेथील लोक काळजी करत बसणार. पण दुसरा मार्ग च नव्हता. शिधा संपत आलेला आहे. इथें जास्त दिवस राहणें शक्य नव्हतें. डागबुरडाचा उत्साही तरुण कार्यकर्ता बलभद्र म्हणाला, " तो नवीन रस्ता ठीक आहे अलीकडच्या तीरावरच्या जरापा गावात माझ्या बहिणीचे घर आहे. नदीचें पाणी वाढलें तर आपण तिथें राहू या." हा कार्यक्रम ठरला नी उद्याची काळजी उद्या, आज तर स्वस्थ झोपू या, असें म्हणून आम्हीं बिछान्याकडे वळलों. बाबा तर आठ वाजता च ' महालोकीं ' जातात



# शून्यांतून नवनिर्माण

जरापा, यकालागुडा
४ सप्टेंबर १९५५

नवा रस्ता 'क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तत् कवयो वदन्ति' चे स्मरण करवून देणारा होता. मुक्तीचा मार्ग बिकट असतो म्हणतात आणि हा सामाजिक मुक्तीचा मार्ग आहे. कितीतरी वेळ दीडदोन फूट चिखल-पाण्यातून जायचे होतें. या रस्त्यावर न पडणे हा चमत्कार नी पडणें हें स्वाभाविक मानलें जाईल. पावसाच्या गतीशीं बाबाचा आवाज स्पर्धा करू लागायचा व आजूबाजूतील तुषारांसहित वेदमंत्राचे शब्दतुषार कानीं पडायचे. 'कशी मजा आहे!' असें हि ते मधून मधून म्हणायचे. वाटेंत मोठमोठे शिलाखंड लागले. कुणीतरी म्हणालें, 'वाघाच्या सभेसाठीचें स्थान दिसतय्.' पुढें एक विस्तीर्ण शिलाखंड दिसले. दाटदाट हिरवेंगार किर्रऽऽ जंगल, सथ गंभीर वाहणारी अनामिक नदी, काळसर ढगाच्या सान्निध्यात ध्यानगंभीर भासणारा समोरचा डोंगर, सारें पाहून बाबांचे पाय एरदम थांबले. अनिमिष नेत्रांनीं ते डोंगराकडे बघू लागले. मनात विचार आला अशा च प्रशान्त, रमणीय स्थानीं ऋषि ध्यान करीत असतील! आणि तेवढ्यात बाबा म्हणाले, "बसू या इथें जरा वेळ. ध्यानाला अगदीं उत्तम स्थान आहे." सारे पद्मासन घालून बसले. 'पूर्णमदः पूर्णमिदम्' गंभीर गिरा प्रकटली आणि मग ध्यान सुरू झालें. नंतर डोळे उघडून समोर पाहिलें. सृष्टींत जणू परमात्म्याचें गांभीर्य प्रकटलें होतें.

पुढें तीन नद्या लागल्या. त्यात छातीइतकें पाणी होत. ओल्या कपड्यांनीं चिखलपाण्याच्या पायवाटेनें चालायचं होतें. पण ध्यानानें जणू प्राणसंचार झाल्यागत वाटत होता. कुणीतरी गाऊ लागलें—

> 'शुभ कर्मपथे धर निर्भय गान।
> चल चल रात्रि, चल दिनरात्रि
> कर अमृतलोकपथ अनुसंधान॥'

—प्रसन्न हिरवीं शेतें दिसू लागलीं व गाव जवळ आल्याची सूचना मिळाली.

शेतातून झुळझुळ वाहणारे पाट व उचसखल भूमीमुळें त्याचे ठिकठिकाणीं बनलेले घरधबे—सर्वत्र शांति व प्रसन्नता. पळपळीया नदी लागली. गाववाल्यानीं सांगितलें सध्या पार करणें अशक्य आहे दुपारपर्यंत पाणी उतरेल असें वाटतें. नदीच्या वेगवान् प्रवाहाकडे दृष्टि रोखीत बाबा म्हणाले, "हें पाणी असं आहे कीं तुम्हाला चागले दोन तीन दिवस या च तीरावर अडवून धरील!" या पहाडातल्या नद्याना एकदम पाणी चढतें नी उतरतें. तीरावरच्या जरापा गावात मुक्काम केला. जरापा अगदीं लहानसें ५०—६० लोकवस्तीचें गाव. जरापाच्या लोकाना कधीं स्वप्नात हि कल्पना नव्हती कीं बाबा त्याच्या गावात येतील पण त्याची ग्रामदानाची तपस्या फळली आणि नदीनें बाबाना अडविलें बाबानीं घरोघर जाऊन निरीक्षण केलं सारीं सुंदर स्वच्छ घरे. एका घरात स्त्रियानीं भिंतींवर सुंदर चित्रें काढलीं होतीं. त्यात गाय व दूध पिणारें वासरू, स्वस्तिक, दीप वगैरे कित्येक प्रतीकें होतीं त्याचें कौतुकानें निरीक्षण करीत बाबा म्हणाले, "बघा, याच्यात केवढी संस्कृति आहे! अगदीं दाट जंगलात राहून देखील त्यानीं किती सुंदर चित्रें काढलीं आहेत! अन् त्याकरता रग वगैरे देखील त्यानीं इथें च तयार केला आहे संस्कृति काहीं केवळ पुस्तकात च नसते. चित्रकला, संगीत इत्यादि सर्वांच्या द्वारें संस्कृति प्रकट होते."

आमच्याजवळचा थोडा शिधा व गाववाल्यानीं प्रेमानें दिलेला मुगा चावल मिळून जेवण तयार झालें. जेवण आटोपून नदीकाठीं जाऊन बसलों पाणी उतरण्याचीं लक्षणे दिसेनात. गाववाल्यानीं जगलातून बांबू तोडून आणले व झाडाच्या साली कुटून, दोरी वळली नी पाहता पाहता दोन तापे तयार केले. मग पोहत पोहत या तीरावरून त्या तीरावर तापा ओढत नेऊन व पोहता न येणाऱ्याना व सामानाला पार केलें. आमचें सामान हि काहीं कमी नव्हतें आमच्या यात्रीदलातले लोक त्याना मदत करीत होते. पोहून पोहून ते सारे अगदीं थकून गेले रात्र होऊन गेली होती. शेवटीं उरलेलें सामान सकाळीं आणायचें ठरवलें. बाबाना तर त्यानीं फुलासारखें साभाळीत नेलें. बाबा म्हणाले, "मी तर अगदीं बादशहासारखा आलों!" रात्रीं प्रार्थनेनतर बाबा एक च वाक्य म्हणाले, "आज आप सब लोगोंने इतना पराक्रम किया इसलिये मैं आपको

धन्यवाद देता हूँ।" सारे मस्तींत होते. कुणाला कष्टाची जाणीव देखील झाली नाहीं. रामाचे वानर जणू! गावकऱ्यांच्या वत्सलतेचें किती कौतुक करू नी किती नको असें बाबाना झालें. 'अगदीं शून्यातून सारें निर्माण केलें त्यांनीं' असें ते सारखे म्हणत होते.



## ग्रामोद्योगाचें महत्त्वपूर्ण स्थान

नेलमगुडा, श्रीगुडा, गुडारी
५ ते ८ सप्टेंबर १९५५

बाबा कालपासून म्हणताहेत कीं, 'आपली ही यात्रा म्हणजे अगदीं Adventure (साहस) च्या च सदरात जमा होईल!' वाटेंत दर मैला-दीड मैलाला नदी, नाला लागला कीं व्यासजी ओडियातील एक म्हण सांगतात — 'कोस जा, घो पार.' त्यांनीं सांगितलेली आणखी लोकोक्ति बाबाना फार आवडते—

'अंते तिक्त, दंते लूण, पेट पुरिब तिनी-कोण
माथे कापड, पाये तेल, वैधर संगे करिब खेल।'

(जेवणाच्या शेवटीं काहींतरी कडू खावें, मिठानें दात घासावे, जेवतांना पोटाचे तीन च कोन भरतील एवढें जेवावें, चालतांना डोक्याला कापड बांधावें, पायाला तेल चोळावें. एवढ्या गोष्टी नियमित पाळल्या कीं उत्तम आरोग्य राहते आणि वैद्यासोबत खेळ खेळता येतो.)

या भागातील बरीं च गावें ग्रामदानांत मिळालेलीं आहेत. वाटेंतला एक तीन चार मैलांचा पट्टा भूदानांत मिळालेल्या जमिनीचा होता. व्यासजी बाबाना म्हणाले, "आपण आपल्या जमीनदारींतल्या जमिनीवरून चालत आहांत." मंगलाभावशी लगेच म्हणाल्या, 'अं हं! आपण मुक्त भूमीवरून चालत आहांत!' एका वाक्यात विनोद होता तर दुसऱ्यात विचार! बाळ म्हणाला, 'ही जमीन फार चांगली दिसते आहे.' त्यावर बाबा म्हणाले,

"ह्या भूमीला आपलें कार्यक्षेत्र बनवशील तर कळेल, हींत कसे छान पीक निघत तें ! भूमि नको बघूस, मनोभूमि बघ."

या ठाण्याचें प्रमुख ठिकाण गुडारी जवळ येत चाललें होतें आसपासच्या गावातले लोक बाबाना सागायचे की, "सारे बडे जमीनवाले गुडारींत राहतात" बाबा म्हणाले, "शहराच्या आसपास नेहमीं हें च दृश्य दिसतें बहुतेक सारे लुटणारे लोक शहरात राहत असतात." पण या भागातले भूमिहीन हि आता चागले जागृत झाले आहेत श्रीगुडाच्या प्रवचनात बाबा गरीबाना उद्देशून म्हणाले कीं, "ज्याच्याजवळ थोडी जमीन आहे असे तुम्ही लोक आपली सारी जमीन देऊन भूमिहीनाबरोबर एक होऊन सारें काहीं वाटून टाल व भूमिहीनाचीं हृदयें जिंकून घ्याल तर त्याची नी तुमची मिळून एक सामर्थ्यशाली आघाडी तयार होईल. आज थोडी जमीन बाळगणारे लोक आपल्या चार दोन एकराना चिकटून राहतात म्हणून बडे लोक देखील आपल्या चार दोन हजार एकराना चिकटून राहतात एकाला लगोटीची आसक्ति तर दुसऱ्याला उंची वस्त्राची. तुम्ही गरीब लोक च आपल्या आसक्तीमुळें श्रीमताचीं मुळें पक्कीं करत असता मला तुमची शक्ति वाढवायची आहे म्हणून च मी तुम्हाला एक युक्ति सागत आहे तुम्ही आपापल्या चार दोन एकराचा मालकी हक्क फेंकून द्या व क्रान्तीचे नेत बनायला समोर या मग पहाल कीं बडे लोक देखील आपला मालकी हक्क सोडून तुमच्या मागें आल्यावाचून राहणार नाहींत "

गुडारी जवळ आलें व परीटघडीचे कपडे घातलेलें लोक दिसू लागले. त्यात शाळेचीं लहान मुलें देखील हार घेऊन स्वागतार्थ उभीं होतीं बाबानीं मुलाचे हात धरून पळायला सुरवात केली. मुलाना घेऊन निवासस्थानीं पोहोंचल्यावर बाबानीं मागें वळून पाहिलें तों सारे वजनदार, इस्त्रीवाले लोक मागें पडले होते नतर बाबानीं जमावाला उद्देशून एक छोटेंसें भाषण केलें ते म्हणाले, "जगातल्या सर्व मुलाची मिळून एक च जात आहे, त्याच्यात कुठला हि भेद नाहीं. देशातल्या सर्व मुलाना समान रक्षण, पोषण व शिक्षण मिळायला पाहिजे. जो देश मुलामध्यें भेदभाव करील तो जगात टिकू शकणार नाहीं. देवानें सगळ्याना मुलें दिलीं आहेत

प्रत्येक घरात मूल जन्मते म्हणजे ईश्वर च जन्म घेतो. मग काहीं घरात आपलें पोषण व्हावें नी काहीं घरात शोषण व्हावें, कुठे खायला दूध तूप मिळावें तर कुठें पुरेशी भाकरी देखील मिळू नये, अशी देवाची इच्छा असणें कधीं तरी शक्य आहे का ? ''

या अरण्य यात्रेतील अनुभव सर्वोदयाच्या तत्त्वज्ञानाला बळकटी आणणारे होते. बाहेरचे व्यापारी कपडा, तेल, मीठ यासारख्या आवश्यक वस्तूंच्या बाबत खेड्यातल्या लोकांना कसे लुटतात त्याचे दर्शन घडलें. हें शोषण थांबवायला ग्रामोद्योगाचा एकमेव उपाय आहे हें पुन्हा एकवार ध्यानात आलें. गुडारीच्या प्रवचनात विनोबा या विषयाचें विवेचन करीत म्हणाले, '' खेड्याखेड्यात हिंडून नी तेथील परिस्थितीचें निरीक्षण करून माझीं काहीं निश्चित मतें बनलीं आहेत. ग्रामोद्योगाशिवाय ग्रामोत्थान होणें अशक्य आहे. सुव्यवस्थित योजनेशिवाय ग्रामोद्योग चालू शकणार नाहींत. खेड्यात ग्राम-समिति (ग्रामपंचायत) निर्माण झाल्याशिवाय खेड्याकरता सुव्यवस्थित योजना बनू शकत नाहीं व गावच्या जमिनीचें समान फेरवाटप झाल्याशिवाय कोणती हि ग्रामसमिति सर्व गावकऱ्याचा विश्वास संपादन करू शकणार नाहीं. आज संपत्तीची विषम वाटणी कायम असताना खेड्यात ग्रामसमिति स्थापणें म्हणजे वाघाला अध्यक्षपद देण्यासारखें आहे. कारण आज ज्याच्या-जवळ पैसा, जमीन व शिक्षण आहे असे च लोक ग्रामसमितींत येणार म्हणजे आज जे शोषण करतात त्यांना आणखी सत्ता मिळणार. तेव्हा जमीन व संपत्तीची समान वाटणी झाल्यानंतर खेड्याचें कल्याण करणारी ग्रामपंचायत अस्तित्वात येऊ शकते.

'' आजकाल सरकार देखील आपल्या नियोजनात ग्रामोद्योगांना स्थान देत आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे. पण सरकार बेकारी नाहींशी करण्याकरता म्हणून ग्रामोद्योगाचा आधार घेत आहे. राक्षसाच्या भीतीनें का होईना पण कोणी एखादें चांगलें काम करत असेल तर मी त्याची प्रशंसा च करीन. परंतु हें चांगलें काम रावणाच्या भीतीनें न करता, रामाच्या भक्तीनें केल्यास किती बरे होईल ! आपल्या देशाच्या आर्थिक

नियोजनात ग्रामोद्योगाना कायमचें स्थान आहे असें माझें निश्चित मत आहे. तेव्हा देशाकरता योजना करताना ग्रामोद्योगाला एक महत्त्वाचें व जीवनाचें आवश्यक अंग म्हणून त्या योजनेत स्थान द्यायला हवें ”



## ‘ गांवचें गोकुळ बनवूं या ’

डेरीगाव, धाभुनी
९, १० सप्टेंबर १९५५

अर्चिमान आदित्याच्या आगमनाची वेळ होती. दूरवर ताडाचीं सात उंच झाडें व एक ल्हान झाड दिसलें. जणू सप्तर्षि व अरुंधती आदित्याच्या उपासनेंत मग्न होतीं. साऱ्या विश्वाला रश्मिसूत्रात ओवणारा आदित्य आला, प्राचीला खुलवीत आला, प्रतीचीला फुलवीत आला, उदीचीला सुखवीत आला, अधराचीला हसवीत आला. काळोखाऱ्या काळ्या रात्रीं प्राचीला प्रतीचीची ओळख नव्हती, उदीचीला अधराचीच्या अस्तित्वाची जाणीव नव्हती. पण प्रकाशलेल्या जगात भेद सरले, भिन्नता उरली नाहीं. अद्वैताच्या रश्मिसूत्रात ओवल्या गेलेल्या सर्व दिशाना उदयाची एकत्र अनुभूति होऊं लागली.

जागलेल्या जगात नव्या हालचाली सुरु झाल्या. आंब्याच्या झाडाच्या छायेंत सारे गावकरी एकत्र जमले होते. त्याच्यातील नसलेला पण त्याच्यातलाच एक भासणारा असा भूदानकार्यकर्ता मध्यें बसला होता. ग्रामदान तर दिलें, आता पुढे नवी रचना कशी करायची, याविषयीं चर्चा चालू होती. “ आम्हीं सर्वस्वदान दिलें मग ती जमीन आम्हीं परत कशी घेणार ? ” एकानें शंका काढली. दुसरा म्हणाला, “ माझ्या हि मनात ही च शंका होती. पण परवा विनोबाचें भाषण ऐकलें, त्यात ते म्हणाले, “ जमीन तर आता देवाची झाली व त्याचा प्रसाद म्हणून गावाकडे आली. फक्त सोयीकरता म्हणून फेरवाटप करायचें. त्यात काहीं कुणी जमिनीचा मालक बनणार नाहीं. ” माणशीं एक एकराच्या हिशोबानें वाटायचें

ठरवलें. कालचा पन्नास एकरांचा मालक म्हणाला, 'माझ्या घरात चार माणसें आहेत, तर मला चार एकर पुरेल.' कालचा पधरा एकरवाला, 'माझ्या घरांत दहा माणसें आहेत, पण मला कमी जमीन दिली तरी चालेल. कारण माझीं लहान मुलें आहेत व मदतीला फारसें कुणीं नाहीं.' लगेच सारे बोलू लागले, "वा वा! पुरेल म्हणजे काय? तुला दहा एकर घेतली च पाहिजे. आणि मदतीला आम्ही सारे आहोंत च कीं! हें बघ, यदा आपण सर्वांनीं मिळून तुझ्या शेतात विहीर खणायची. दर वर्षी हा कार्यक्रम करूं म्हणजे पाण्याचा प्रश्न सोडवता येईल." एक तरुण म्हणाला, "शेजारच्या नदीला बांध घालण्याची योजना करायला हवी. श्रमदान तर आपण सारे देऊ च. मग सरकारकडून थोडी मदत मिळायला हरकत नाहीं." भूदानकार्यकर्ता म्हणाला, "हो, त्याकरता अवश्य प्रयत्न करू या."

आतापर्यंतच्या चर्चेत जरा दूर बसलेला कालचा भूमिहीन भाग घेत नव्हता. पण श्रमदानाचे नाव ऐकता च तो उत्साहानें म्हणाला, "कुणाच्यानें श्रम होत नसतील तर मी दुप्पट श्रम करीन." त्याच्या-जवळ हि देण्यासारखें असें काहींतरी होतें— नव्हे त्याची च संपत्ति सर्वांत अधिक होती. "तुझ्या घरात वीस माणसें ना?" त्याला कुणींतरी प्रश्न विचारला. "नाहीं, अठरा च आहेत. दोन महिन्यापूर्वीं दोन मुलें गेलीं माझीं—औषधपाण्याविना!" तो किंचित् कातर आवाजात म्हणाला. लगेच कालचा एक बडा जमीनवाला म्हणाला, "क्षमा कर. आता असें कधीं व्हायचें नाहीं आपल्या गावात. औषधाकरता आपण एक वनस्पतीचा बगीचा लावूं. आणि रमादेवी परवा इथें आल्या होत्या तेव्हा म्हणाल्या कीं कस्तुरबा ट्रस्टतर्फे एक नर्सिंग शिकलेली भगिनी इथें येईल. ती आपल्याला स्वच्छता, आरोग्य वगैरेचें हि शिक्षण देईल. आजवर आपण कधीं एकत्र बसून असा विचार तरी केला होता का? आता सारे मिळून रोग व दुःखाना पिटाळून लावू."

"चाळीस एकर जमीन उरते आहे ती सामूहिक ठेवायची ना?" उत्साही तरुणानें विचारलें. सर्वांचा होकार मिळता च तो म्हणाला— "आणि एक सहकारी दुकान हि काढायचें आहे. नाहीं तर व्यापारी व

सावकाराच्या कचाट्यातून सुटणें कठीण च आहे." एक वृद्ध काळजीच्या स्वरात म्हणाला, "सावकाराचे पाय धरल्यावाचून कसें निभणार बाबा आपलें ? अडीअडचणी आहेत, लग्नकार्यें आहेत." भूदानकार्यकर्ता बोलू लागला, "आपण सावकाराना नीट समजावू. काही गावात सावकारानीं पूर्वीच्या कर्जांच्या रकमेच संपत्तिदान दिलें आहे. पुढें हि त्यांच्याकडून संपत्तिदान मिळवता येईल शेवटीं ते देखील आपल्या च सारखीं माणसें आहेत. गावाच्या भल्याचा विचार आपल्याला पटतो तसा त्याना का नाहीं पटणार ? आपले श्रम, संपत्तिदान आणि मग बाकीची मदत बाहेरून सरकारकडून किंवा दुसऱ्या संस्थेकडून कर्जाच्या रूपान मागता येईल." दुसरा तरुण आवेशानें म्हणाला, "आणि लग्नात बिलकुल अवास्तव खर्च करायचा नाहीं असं विनोबानीं सांगितलें आहे. प्रत्येक लग्नाचा खर्च साऱ्या गावातर्फे होईल." कालचा भूमिहीन म्हणाला, "गावाकरता म्हणून मी आपल्या धान्याचा आठवा हिस्सा देईन." भूदानकार्यकर्ता म्हणाला, "पण तें धान्य राहील प्रत्येकाच्या च घरात. एका ठिकाणीं एकत्र केलें जाणार नाहीं. प्रत्येक घरात गावाची बॅंक राहील."

"आणि विनोबानीं सूत कातायला सांगितलें, त्याचे काहीं ठरवत च नाहीं तुम्ही ?" एका भगिनीनें विचारलें. "सारा कपडा गावात च तयार करायचा. बाहेरचा विकत घ्यायचा नाहीं," एका पोरसवदा तरुणानें जोरांत म्हटलें. "अजून चर्खा कधीं हातीं देखील घेतला नाहीं, मग कसें जमणार हें ?" तूफान शंका काढली भगिनी लगेच म्हणाली, "का शक्य नाहीं ? माझ्या माहेरीं तुकेन्द्रीला घरोघर चर्खे चालतात व कितो तरी लोक आपला कपडा स्वत च तयार करतात. मी देखील लहानपणीं कातत होतें. पण लग्न झाल्यापासून सारें बंद झालं." "बरं, आता तू च शिकव सर्वांना सूत काताय," तिचा पति अपराधाचें परिमार्जन करण्याच्या स्वरात म्हणाला. गावाला वस्त्रस्वावलंबी करण्याचा ठराव एकमतानें पास झाला.

भूदानकार्यकर्ता म्हणाला, "फार छान. पण आणखी कितीतरी गोष्टी करायच्या आहेत तुम्हाला तेल, गूळ, जोडे वगैरे सर्व आवश्यक वस्तु गावात च तयार केल्या म्हणजे गावचा पैसा बाहेर जाणार नाहीं व सर्वांना

उद्योग मिळतील.' आपलें गाव लक्ष्मीसंपन्न करायचें आहे ना ?" हें ऐकना च एकानें म्हटलें, "मग असें करा. तुम्ही च इथें रहा म्हणजे तुम्ही सांगाल तसें करू आम्ही." भूदानकार्यकर्ता म्हणाला, "अगदीं चूक. तुमच्या गावाचें राज्य तुम्हीं च चालवायचें आहे. एकवीस वर्षांच्या सर्व लोकांची मिळून एक ग्रामसभा बनवायची आहे. ती सभा सर्वानुमतीनें कारभार चालवायला १०-१२ लोकांची एक समिति निवडील. तिकडे भुवनेश्वरला मंत्रिमंडळ असतें ना, तसें च गावात हि बनेल."—"हें सारें आपल्या डोक्यात शिरायच नाहीं बुवा !" भूदानकार्यकर्ता चटकन् म्हणाला, "का नाहीं शिरणार ? हें सारें करायचें आहे, रामराज्य स्थापायचें आहे, म्हणून तर आपण ग्रामदान केलें आहे."—"तें सारें ठीक पण एकाला सुद्धा लिहिता वाचता येत नाहीं, मग गावाची एकताशी शाळेची योजना तरी कशी चालणार ?" एकानें विचारलें. भूदानकार्यकर्ता म्हणाला, "प्रश्न आहे खरा, पण तुम्हीं स्वामित्वविसर्जनासारखी एवढी क्रांतिकारी गोष्ट केलीत मग आम्ही काय तुमच्या सेवेला येणार नाहीं का ? पण आपल्याला नवी विद्या शिकायची आहे जीं त्यात ब्रह्मविद्या व उद्योग दोन्ही राहतील." एकानें म्हटलें, "गावातले झगडे बाहेरच्या कोर्टांत न्यायचे नाहींत हें ठरवून च टाकू आता." तेवढ्यात एका स्त्रीचे अनुभवानें पोळलेले उद्गार बाहेर पडले—"आणि दारू सोडायचा निर्णय अगदीं या क्षणाला घेऊन टाका."

पोरांना वाटलें आपण हि यात भाग घ्यायला हवा ते म्हणाले, "आणि विनोबांनीं आम्हाला खूप दूध लोणी खायला सांगितलें आहे—गोकुळातल्या गोपालांसारखें." पोरांना कृष्णाचें दूध लोणी आठवलें तर वृद्धांना भागवत विनोबांनीं सर्वांना रोज संध्याकाळीं रामायण, भागवत व गीता वाचायला सांगितलें होतें 'देवाची संस्कृत भाषा आपल्याला उठून समजणार ?' एकानें शंका काढली. भूदानकार्यकर्ता म्हणाला, "का नाहीं समजणार ? विनोबा तर म्हणतात कीं स्वर्गातल्या देवांना हेवा वाटेल असें काम केलें आहे तुम्हीं !"

माध्यान्हाची वेळ झाली. सूर्याच्या प्रखर प्रकाशात सारी सृष्टि कशी

पावन, निर्मल आणि मंगल भासत होती ! सूर्य जणू विचारीत होता, " कुठें आहे तुमचा तो अंधार ! बघायचाय् मला ! "

ब्रह्मधारेच्या काठाकाठानें जाणाऱ्या पायवाटेनें बाभुणीला पोहोंचलों आणि उद्या गुनपूरला बाबाच्या जन्मदिनानिमित्त होणाऱ्या समारंभाकरता येणाऱ्या पाहुण्याचें आगमन सुरु झालें. त्यात दादा धर्माधिकारी व विमलताई होत्या. मध्यतरीं काहीं दिवस आम्ही अगदीं दाट जंगलात होतो त्यामुळें सर्वांना फार काळजी वाटत होती. आज आम्हा सर्वांना सुखरूप आलेलीं पाहता च त्या सर्वांना आनंदाचें भरतें आलें. बोऊ व नुमानी तर आमच्यावर कौतुकाचा वर्षाव च केला. " तुम्हीं एवढ्या पावसात इतके दाट जंगल पार करून आलात, तुम्हाला अगदीं महावीर चक्र द्यायला हवें." तिकडे बाबा सर्वांजवळ आम्हाला नदीपार नेणाऱ्या जरापाच्या लोकाची सारखी प्रशंसा करीत होते कीं, " त्या लोकानीं अगदीं पाहता पाहता सारें निर्माणकार्य केलें. दोन तापे तयार करून आम्हा सर्वांना सामानासकट नदीपार पोहोंचवलें. आणि आमचे सामान देखील औरंगजेबाच्या सामानाहून काहीं कमी नव्हतें. त्या लोकाना मोठी च पदवी मिळायला पाहिजे."

हनुमंतपूरची ती अविस्मरणीय घटना आठवते. घड्याळाचे काटे बारावर आले म्हणून दुपार झाली असें समजायचें, एरवीं बाहेर सारें अंधारून आलेलें नी अखंड मुसळधार पावसाची झड. चारी बाजूला दाट जंगल, गाव मैलभर दूर. आमचे निवासस्थान असलेल्या ठिकाणीं काहीं वर्षांपूर्वी एका अधिकाऱ्याने एका रानहत्तीला गोळी घातली. थोड्या च वेळानें रानहत्तींचा एक कळप आला नी त्यानी सारा डाकबंगला उद्ध्वस्त करून टाकला. मग तो डाकबंगला पुन्हा बांधला त्यात हत्तींपासून बचावण्याकरता एक तळघर आहे. आम्ही हत्तींच्या गोष्टी करीत होतों एवढ्यात चार माणसें कुणाला तरी खाटेवर घालून आणताना दिसलें. या भागात काम करणारा एक भूदानकार्यकर्ता एका गावाहून दुसऱ्या गावाला जाताना वाटेंत बेशुद्ध झाला. त्याच्या सोबतच्या माणसानें शेजारच्या गावातील लोकाना बोलावून आणलें व ते सारे मिळून त्याला इथें घेऊन आले. नाडीचे ठोके मंद ऐकू येत होते म्हणून तो जिवंत आहे एवढें कळत होतें. पण चार पाच तासापासून

बेशुद्ध तो होता. इथून सर्वांत जवळच्या म्हणजे विश्रमस्टरच्या दवाखान्यात न्यायचें म्हणजे त्याला खाटेवर घेऊन पावसात तीस चाळीस मैल चालून जावें लागणार. दोघांनीं धावत जाऊन शेजारच्या नद्यारेचें पाणी बघितलें. पाणी इतकें वर चढलें होतें कीं नदी पार करणें अशक्य होतें. इकडे आम्ही त्या माणसाला शुद्धीवर आणण्याकरता शेकणें, पाय चोळणें वगैरे उपाय करीत होतों च. तास दीड तासानंतर त्यानें डोळे उघडले. बाबा सारखे म्हणत होते, "कांहीं काळजी करू नका. तो बरा होईल." अन् आश्चर्याची गोष्ट म्हणजे सध्याकाळीं तो उठून दहा पधरा पावलें चालून गेला व बाबाना नमस्कार करून आला. आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं आमच्या बरोबर दुसऱ्या मुक्कामीं पायीं चालून आला. तो बेशुद्धावस्थेंत पडलेला कार्यकर्ता, दुपार कीं सध्याकाळ हे न कळण्याइतका अंधार दाटून आलेला, अन् सभोंवतालचें तें किर्र ऽ ऽ जंगल सारें डोळ्यासमोर उभें राहतें नी सूरदासाच्या सुरात गावेंसें वाटतें 'सुनि रे मैंने निर्बल के बल राम!'

केवढें निबिड अरण्य होतें तें! अन् वरून अखंड धो धो पाऊस, वेगानें वाहणाऱ्या नद्या आणि उंच उंच डोंगर. पण इतक्या दाट जंगलात वाघ हत्तींचा हल्ला तर दूर च राहो पण आमच्यापैकीं कुणाला हि साधा विंचू देखील चावला नाहीं. ठिकठिकाणीं जंगलातले मुंगळे मात्र अगदीं कडकडून चावत असत आणि मलेरियाकरता प्रसिद्ध असलेल्या या भागात गेल्या दोन महिन्यात कुणाला हि पडसें देखील आलें नाहीं बाबांच्या प्रकृतीची तर सर्वांना च फार काळजी वाटत होती. पण दोनदा घसा किंचित् बिघडल्यामुळें त्यांनीं किनाईन घेतलें तेवढें च बाकी त्यांची प्रकृति अगदीं छान राहिली. आम्ही मात्र गेले चार महिने अगदीं इमानेंइतबारें दर आठवड्याला पॅलोड्रिन घेत असू आमच्यातील प्रफुल्लभाई तर लहानपणा पासून अशक्त नी आजारी. दरवर्षीं पावसाळ्यात तो एकदा तरी यमराजाचा दरवाजा ठोठावून परत यायचा. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे या पावसाळ्यात तो अगदीं चांगला टुणटुणीत राहिला. मी देखील गेल्या वर्षांत बारीक-सारीक दुखण्यांनीं अगदीं बेजार झालें होतें पण या अरण्ययात्रेंत मला इतर अनेक लाभाबरोबर आरोग्यलाभ हि झाला. बाबा नेहमीं म्हणतात कीं,

" यावरून तरी आता तुमच्या ध्यानात आलें असेल कीं आपल्याला सांभाळणारी एक अदृश्य शक्ति जगात आहे. तुम्ही तिला ' देव ' म्हणा कीं आणखी कांहीं म्हणा पण ती आहे हें निश्चित ! " मला नेहमीं तुकारामाचें वचन आठवायचें— ' माग पुढें उभा आहे सांभाळीत. ' सन्मार्गावर निःशंकपण पुढें पुढें जाणाऱ्या लेंकराना ईश्वर माऊलीच्या ममतेनें सांभाळीत असतो

गेल्या आठवड्यात भयंकर पाऊस पडल्यामुळें ओरिसातल्या कटक, बालेश्वर, पुरी या जिल्ह्यात पुरानें अगदीं हाहाःकार उडाल्याच्या बातम्या परवापासून मिळत आहेत. इथें काम करणाऱ्या बऱ्याचशा कार्यकर्त्यांचीं घरें त्या भागात होतीं. कित्येकांचीं गावें वाहून गेलीं होतीं. घरीं म्हातारे आईबाप, लहान मुलें, बायको सारी मंडळी होती. सर्वांचीं मनें काळजीनें अस्वस्थ झालेलीं. पण कामात खंड कांहीं पडला नाहीं कांहींना एकदा तरी घरीं जाऊन बघून यावेंसें वाटत होतें. कोणीं बाबाना विचारलें कीं, " त्यानीं घरीं जावें का ? " तर बाबा म्हणाले, " मुळीं च नाहीं. घर वाहून गेलें तर वाहू दे. तिथें देखील शेजारीपाजारी आहेत ना मदत करायला ?" दादा धर्माधिकारी म्हणाले, " तुम्हीं काय सर्वांना च सन्यासी बनवू पाहत आहात वाटतें ? " बाबा-" नाहीं आसपासच्या लोकाना मदत करणें हें उत्तम गृहस्थाचें च लक्षण आहे. आपले कार्यकर्ते वीर आहेत त्यानीं गेले चार महिने या कोरापुटच्या जंगलात बहादुरीनें काम केलें आहे. मी त्याना दुबळे करू इच्छीत नाहीं. तरी हि ज्याना घरीं जावेंसें वाटत असेल त्यानीं एकदा जाऊन यावें. पण शेवटीं पूर ही कांहीं मानवी कृति नाहीं, तर ईश्वरीय कृति आहे ! "

# 'माझें नांव मरो, रामनाम जगो'

गुनपूर
११, १२ सप्टेंबर १९५५

वशधारेच्या तीरावरील डाक नगरयाच्या आवारात विनोबाजयंतीचा समारंभ चालू होता. व्यासपीठासमोर साधी, सुंदर व प्रसंगाला साजेशी अशी रांगोळीची व फुलांची सजावट व लहान मुलांना वाटण्याकरता केळीं, सीताफळें, पेरू वगैरेंनीं भरगच्च भरलेलीं ताटें होतीं तुमाच्या मधुर रवीन्द्र-गीतानें कार्यक्रम सुरू झाला

'हे चिरनूतन, आजि ए दिनेर, प्रथम गाने।
जीवन आमार, उट्क विकाशी, तोमार पाने।'

नंतर बोऊनीं बाबांना गंध, फुलें, अक्षता व दूर्वा वाहून, आरती ओवाळून प्रणाम केला. बाप्पा व व्यासजी बाबांपेक्षा चार सहा महिन्यांनीं मोठे असल्यामुळे त्यांनीं आशीर्वादात्मक भाषणे केलीं. मग जयप्रकाशजींचें भाषण झालें. साधीं शब्दफुलें पण हृदयींच्या भावसूत्रात गुंफल्यामुळे तो हार मोठा आकर्षक भासतो. ते म्हणाले, "आज कोरापुटकडे साऱ्या देशाचे डोळ लागले आहेत. इथे आज जो प्रयोग चालला आहे तो सफल झाला तर देशाला आणि जगाला नवा मार्ग मिळेल. बाबांनीं इथल्या जंगल पहाडात तपस्या करून एक शक्ति निर्माण केली आहे. त्या शक्तीची आज देशाला फार गरज आहे. आज ऐन मुसळधार पावसात तुमचा जिल्हा एका नव्या आगींत जळतो आहे, एका नव्या ज्योतीच्या प्रकाशात तळपतो आहे."

या दृश्य जगातील घटना, आणि दृष्टीच्या पल्याड असलेल्या जगात? नोआखलीच्या दग्ध भूमीवर प्रेमसिंचन करणाऱ्या त्या चरणांची गति अवरुद्ध झाली नव्हती तर धर्मचक्राच्या प्रवर्तनात परिणत झाली होती. अमर आत्म्याची अनुभूति नयनांतून ओघळणाऱ्या अश्रूंत उमटली!

गंभीर होऊं पाहत असलेल्या वातावरणाला बाबांनीं एकदम खेळकर कलाटणी दिली ते म्हणाले, "मला आज मी म्हातारा झाल्यासारखें हि वाटत नाहीं वा तरुण असल्यासारखें हि वाटत नाहीं. मला तर असें च

वाटतें आहे कीं माझें बाल्य च अजून सरलें नाहीं. आईवडिलांनीं पावसात जाऊ नको म्हटलें तरी हि त्याचें न ऐकता पावसात भटकायचें हें लहान मुलाचें लक्षण गेल्या चार महिन्यात माझ्यात अगदीं पुरेपूर दिसलें असेल तुम्हाला ! गोपबाबू, व्यासजी वगैरे आम्ही सर्व बालगोपाल मडळी जमलों आहोंत नी आमचा इथें खेळ चालला आहे असें च मला वाटतें आणि म्हणून माझा साठावा वाढदिवस साजरा करण्याकरता तुम्हीं जो हा समारभ केलात तो मला अगदीं च बेढग वाटतो."

मग रोलवर दृष्टि वळवीत ते पुढें म्हणाले, "हा दिवस म्हणजे माझ्या वयाला साठ वर्षें पुरीं झाल्याचा दिवस नसून इथें सुरू झालेली भूमिक्रान्ति यशस्वी करण्याचा सकल्प करण्याचा दिवस आहे असें मी मानतों. हा जिल्हा मलेरियाकरता प्रसिद्ध आहे. आणि तरी हि ऐन पावसाळ्यात दाट जगलात कितीतरी कार्यकर्ते सतत चार महिने हिंडून काम करीत होते. धाना हिंडतो तर त्याच्याकरता सान्या सोयी केल्या जातात पण कार्यकर्त्यांकरता कुठली हि सोय नसते. त्या सर्वांचें मी आज अत.करणपूर्वक अभिनदन करतों. कुठल्या हि प्रकारच्या कीर्ति यशाची अपेक्षा न ठेवता अखड अविरत परिश्रम करणाऱ्या या कार्यकर्त्यांना निष्काम कर्मासारखी दुर्लभ गोष्ट देखील सुलभ झाली हें पाहून मला अतिशय प्रसन्नता वाटते. आपल्याला या कामाकरता एक असा नेता मिळाला आहे कीं त्याहून उत्तम नेता दुसरा असू च शकणार नाहीं. परमेश्वर च आपला नेता आहे. तो जडाला चेतन बनवतो, नालायकाला लायक करतो.

"आपल्या जीवनात एका स्वराज्यप्राप्तीच्या यज्ञाच्या पूर्तीनतर लगेच दुसरा–भूदानयज्ञ–यज्ञ सुरू करण्याचें महद्भाग्य लाभलें आहे. तपस्येमुळें मानवाला ताप न होता आनद च होतो. कारण तपस्येमुळें नव निर्मिति होते. आपण हातीं घेतलेलें कार्य हें सामान्य कार्य नसून यज्ञकार्य आहे आणि म्हणून तें हृदयशुद्धीवर अवलबून आहे. आजच्या दिवशीं आपल्याला सर्वांना शून्य होण्याचा सकल्प करायचा आहे

"इथें ग्रामदानामुळें स्वामित्वाचें विसर्जन होऊ लागलें आहे आणि इथें काहीं ठिकाणीं त्याला विरोध देखील होऊ लागला आहे हें

तेव्हा घेऊन देऊ व पाहिजे तेव्हा नवा घेऊ ? आपण तर अनंत कालाचे प्रवासी आहोत.' असें सहज बोलून जातात ते. त्यामुळें त्यांच्या या देहाला साठ वर्षे पूर्ण झाली याची सर्वोदयींच्या इतरांनी देखील दखल घेऊ नये ही त्यांची इच्छा. विचारपोथींत त्यांनी लिहिलें आहे, " माझें नाव मरो, रामनाम जगो. माझें काहीं च नसो, सर्व कृष्णार्पण असो. माझी इच्छा जावो, हरीची इच्छा राहो." द्वैतातून निर्माण होणारी भिन्न भिन्न नामरूपें अद्वैताच्या अनुभूतींत लोप पावतात, असीम सागरात असंख्य लाटा उत्पन्न होतात. एकेक वर येते, क्षणमात्र आपलें अस्तित्व भासवते नी पुन्हा त्यात च लीन होऊन जाते. महापुरुष म्हणजे मोठी लाट. ती गगनाकडे धाव घेताना दिसेल पण ज्या चेतनसागरातून ती निर्माण झाली त्यात च लीन होणार !

आज शून्य बनण्याचा संकल्प करण्याचा दिवस आहे. 'स्थितप्रज्ञदर्शना'त म्हटलें आहे—' एक ब्रह्म च शून्य च य पश्यति स पश्यति । ' जयप्रकाशजी, दादा वगैरे पाहुणे मंडळींच्या आगमनामुळें विचारचर्चांची नुसती लयलूट चालू होती. दुपारीं जयप्रकाशजींनी विचारलेल्या प्रार्थना व रामनाम-संबंधींच्या प्रश्नाचें उत्तर देताना बाबा म्हणाले, " प्रार्थना ही नेहमीं आपापल्या भावेंत व्हावी व आतरिक व्हावी असें मला वाटतें. सर्व धर्म व पंथाच्या लोकांनीं एकत्र येऊन प्रार्थना करावी. आपण संध्याकाळच्या प्रार्थनेंत स्थितप्रज्ञाच्या लक्षणाचा पाठ म्हणतों, त्यात आदर्श पुरुषाचें चित्र रंगविलेलें आहे. त्यात कुठल्या हि प्रकारची पाथिकता नाहीं. सकाळीं आपण ईशावास्य उपनिषदाचा पाठ म्हणतों, त्यात एक संपूर्ण दर्शन मिळतें. प्रवासाला निघण्यापूर्वी माणूस नकाशा पाहून निघतो तसें च रोज सकाळीं जीवनाचा प्रवास सुरू करण्यापूर्वी ईशावास्य बघून घ्यावें. म्हणून मीं ही निवड केली आहे. पण प्रार्थनेंत काय असावें याबाबत माझा कुठला हि आग्रह नाहीं.

" काहीं लोक रामनामावर आक्षेप घेतात असें तुम्ही म्हणालात. पण माझ्या मतें रामनामात सगुण आणि निर्गुण हे दोन्ही एक होऊन जातात. ' राम ' म्हणजे सर्वांच्या हृदयात रमणारा, अंतर्यामी राम. आता कोणाला

त्या नातावरीरर ऐतिहासिक रामाचें हि स्मरण करावयाचें असल्यास त्यानें करावें पण हिंदु धर्मांत तर म्हटलें आहे कीं रामाला मानणारा हि हिंदु आहे व न मानणारा हि हिंदु आहे. ईश्वर 'शब्दातिगः शब्दसह.' आहे, शब्दाच्या पलीकडे आहे व शब्दाना सहन करणारा हि आहे. एकदा एका आजारात मी आईचें नाव घेतलें. माझी आई त्याआधीं कितीतरी वर्षापूर्वी च देवाघरीं गेली होती. कोणीतरी मला विचारलें कीं आईचें नाव कशाला घेतलें ? त्यावर मी म्हटलें कीं आजागत जेव्हा मला इतर कुठून हि मदत मिळाली नाहीं तेव्हा आईचें नाव घेतल्यानें मदत मिळाली. या च प्रमाणें या देशात लाखों लोकाना रामनामानें समाधान लाभतें. बापूना हि गोळी लागली त्या क्षणीं त्यानीं रामानें च नाव घेतलें !

"नाम हा शब्द 'नम्' धातूवरून बनला आहे, व त्याचा अर्थ आहे 'नम्र बनणें.' नाम माणसाला नम्र बनवतें पार मोठा पुरुषार्थ करीत असताना देखील माणसानें ओळखायला हवें कीं हें काम मी करीत नाहीं तर दुसऱ्या च कुठल्या तरी शक्तीच्या हातून घडतें आहे. ती शक्ति माझ्यात हि आहे पण माझ्यात च सीमित नाहीं, तर साऱ्या जगात व्यापली आहे. आम्हाला आपल्या जीवनात सुधार करावयाचा आहे. पण तें काम केवळ आपल्या स्वत च्या च बळावर होणारें नाहीं. जेव्हा आपण नामस्मरण करतों तेव्हा आत्मोद्धाराची जबाबदारी उचलतों पण त्या च बरोबर नम्रतेमुळें आपल्याला हिंमत हि मिळते. नाम अत्यंत थोड्या अक्षरात सूचन करते. भटकणें हा मनाचा धर्म च आहे पण मन जिथें जिथें जाईल तिथें तिथें नाम त्याला रामाचें दर्शन घडवील तर माणसाचा विकास होईल.

"आपल्यात स्वत ला वाचवण्याची शक्ति नाहीं म्हणून आपण प्रार्थना करतों. आपण ल्हान मुलासारखे आहोंत आणि म्हणून तो च आपल्याला वाचवील. आपण 'राजा राम' म्हणतों, त्याचा अर्थ असा कीं तो च एकटा राजा आहे नी आपण सारे मानव त्याची प्रजा आहोंत. शासनमुक्तीकरिता हा एक उत्तम आदर्श आहे. नामस्मरण प्रत्येक च धर्मांत चालतें. नामस्मरण करणारा च मुक्त होऊं शकेल असा आग्रह धरणें चूक आहे. पण त्या च बरोबर इतके असंख्य लोक नामस्मरण करतात तेव्हा

## समन्वयाश्रमाचें उद्दिष्ट

उक्रा, पद्मपुर, सिलिगराई
१३, १४, १५ सप्टेंबर १९५५

पहाटे उषेच्या पिवट गुलाबी रगाचे जलधारेच्या पाण्यातले प्रतिबिंब पाहत गुनपूरचा निरोप घेतला. वाटेत विमलाताईंनी बाबाना प्रश्न विचारला कीं, "आतरराष्ट्रीय क्षेत्रात सत्याग्रहाचा प्रयोग होऊ शकत नाहीं का?"

बाबा—"ज्या राष्ट्राचे सरकार सैन्य ठेवीत असेल त्या देशाच्या नागरिकाना दुसऱ्या देशात जाऊन सत्याग्रह करण्याचा अधिकार नाहीं. त्याना असा सत्याग्रह करायचा असेल त्यानीं आधी आपल्या देशाचे सैन्य बरखास्त करण्याची मागणी करायला हवी जगात कुठें हि जाऊन सत्याग्रह करू शकणारे असे एखाद दुसरे महापुरुष च असू शकतात. आणि ते आज हि सत्याग्रह करत असतील. पण तो तुमच्या डोळ्याना दिसत नसेल."

भगवान् बुद्धाच्या विहारभूमींत यात्रा करीत असताना विनोबाना बुद्धदेवाच्या तपस्याभूमींत—बोधगयेला—एक 'समन्वयाश्रम' स्थापण्याची प्रेरणा झाली. अन् योगायोग असा कीं तेथील महतानें अगदीं बुद्धमदिराजवळ असलेल्या पाच एकर जमिनीचें आश्रमाकरता दान दिलें. मंदिराजवळ ऐन मोक्याच्या ठिकाणची अशी ती तेवढी च जागा होती नी त्या जागेकरता आशियातील इतर बौद्धधर्मीय देशाच्या सरकारानीं फार मोठी किंमत देऊ केली होती. गेल्या वर्षी बोधगयेला झालेल्या सर्वोदयसमेलनाच्या वेळीं विनोबानीं समन्वयाश्रमाविषयींची आपली कल्पना विशद करून सागताना म्हटले होते कीं 'वेदान्त आणि अहिंसा अभिन्न आहेत. वेदान्तातून अहिंसा च स्फुरते आणि वेदान्ताच्या अधिष्ठानावाचून अहिंसा टिकू शकत नाहीं. तेव्हा वेदान्त आणि अहिंसेचा समन्वय जीवनाद्वारें करण्याचा एक नम्र प्रयोग समन्वयाश्रमात व्हावा अशी माझी इच्छा आहे"

समन्वयाश्रमात राहणारे एक साधक—द्वारकोभाई—गेल्या तीन चार दिवसापासून यात्रेंत आहेत. आज सकाळीं त्याच्याशीं आश्रमासंबधीं चर्चा करताना विनोबा म्हणाले, "भूदानयज्ञाच्या मूल विचाराचें दर्शन व्हावें

या दृष्टीनें माझ्या मनात समन्वयाश्रमाची कल्पना आली. भारताचा सारा जीवनविकास च मुळी समन्वयाच्या पद्धतीनें झालेला आहे ही च भारताची मुख्य शक्ति आहे. त्या समन्वय प्रक्रियेचें प्रत्यक्ष दर्शन व्हावें याकरता एखादें स्थान असावें व तिथें राहणाऱ्या साधकांनीं आजवरच्या साधनेच्या जुन्या प्रकारातील उणीवा दूर कराव्या ही माझी त्यामागची दृष्टि आहे.

"भारतात ध्यानमार्गाचा खूप च विकास झाला आहे. परंतु त्यात ध्यानाचा कर्माशीं विरोध मानला गेला आहे. ध्यानयोगी बहुधा कर्म करीत नसत कारण कर्मांमुळे ध्यानात खंड पडतो असें ते मानीत. यात सुधारणा व्हावी असें मला वाटलें. ज्याप्रमाणें कर्म सोडल्यानें समाधि लागते त्या च प्रमाणें कर्म करीत असताना हि समाधि लागायला हवी, किंबहुना कर्म करीत असतानाची समाधि अधिक सखोल असायला हवी, असें माझें मत आहे. सतत क्रिया चालली असून देखील क्रियेचें 'क्रियापण' न भासण्यात च ध्यानप्रक्रियेची परमोच्च अवस्था आहे. आपण सतत श्वासोच्छ्वास करतो पण त्याची आपल्याला जाणीव तरी असते का? तशी च भूतदयात्मक, शरीरश्रमाची, शोषणरहित, उत्पादक क्रिया, शान्त, सौम्य व अविरोधी क्रिया, ध्यानासोबत केली जाऊ शकते असें मला वाटतें.

"समाजात ज्ञानप्रचार व्हावा नी साधकाची आसक्ति नाहींशी व्हावी या दोन्ही दृष्टींनीं अखंड परिव्रज्या अनिवार्य आहे असें माझें मत आहे. आपल्या पूर्वजांनीं समाजात एक परिव्राजकवर्ग निर्माण करण्याचें महान् कार्य केलें आहे. पण ते परिव्राजक श्रमनिष्ठ नव्हते ही एक फार मोठी उणीव त्यात राहून गेली. ते परिव्राजक अखंड सेवा करीत असत त्यामुळें त्यांना भिक्षा मागण्याचा हक्क होता हें खरें आहे परंतु तरी हि मला वाटतें कीं परिव्रज्येमध्यें सत्यादि यमांच्या बरोबर उत्पादकपरिश्रमनिष्ठेला हि एक 'यम' मानून स्थान द्यायला हवें उत्पादक श्रम हें 'ब्रह्मकर्म' आहे आणि म्हणून तें 'सर्वेषामविरोधेन' होतें आपल्या हातून कळत न कळत होणाऱ्या शोषणातून मुक्त होण्याकरिता हें ब्रह्मकर्म करणें आवश्यक आहे.

"आम्ही ध्यानमार्गात आणखी एक तिसरा हि सुधार करू इच्छितों.

त्यात काहींतरी रहस्य दडलेलें आहे हें ओळखायला हवें. तसें पाहिलें तर सर्वधर्मसमावेश मौनात च होऊ शकतो. मौन ही सर्वश्रेष्ठ भाषा आहे "

नतर समाजरचनेसबंधीं चर्चा सुरु झाली बाबा म्हणाले, "त्याप्रमाणें सर्वांना मजूर बनविणें हें आमचें ध्येय आहे त्या च प्रमाणें सर्वांना पडित बनविणे हें हि आमचें ध्येय आहे."

यावर दादा धर्माधिकारी म्हणाले कीं, "तुमचा 'वर्णव्यवस्था' हा शब्द मला मुळीं च आवडत नाहीं. त्यानें पुन्हा जातिसस्थेचें पुनरुज्जीवन होईल."

बाबा—"मुळीं च होणार नाहीं. उलट 'वर्णव्यवस्था' या शब्दाचा उच्चार करताक्षणीं च जातीवर प्रहार केला जातो. वर्णव्यवस्थेच्या मूळ कल्पनेंत जातिभेद, उच्चनीचता वगैरे काहीं नव्हतें. वर्णव्यवस्थेंत तर सर्वांना समान वेतन आणि समान सामाजिक, नैतिक व आध्यात्मिक प्रतिष्ठा दिली गेली आहे. श्रीकृष्णानें गीतेंत म्हटलें च आहे ना 'स्वे स्वे कर्मण्यभिरत ससिद्धिं लभते नर' । ' आपापलें कर्म प्रामाणिकपणानें व निष्कामवृत्तीनें करून प्रत्येक जण मोक्षाचा अधिकारी होऊ शकतो. मग यात उच्चनीचता कुठें आहे ? "

दादा—"आम्हाला तीन गोष्टी हव्या आहेत · (१) रोटी-बेटीव्यवहारात कुठलें हि बधन नको. (२) गावात प्रत्येक जातीकरता वेगवेगळे मोहल्ले (आळी) नकोत. (३) समाजात उच्चनीचता नको "

बाबा—"मला तुमच्या तीन्ही गोष्टी मान्य आहेत. माझ्या कल्पनेतील आदर्श समाजरचनेंत प्रत्येक जण दिवसातून काहीं तास शेती करील व प्रत्येकाला कला, सस्कृति, धर्म इत्यादींचें शिक्षण मिळेल. दोन तीन तास शेतात काम केल्यानतर बाकीच्या वेळात जो तो आपापला उद्योग करील. साधारणपणें मुलगा आपल्या बापाचा धदा पुढें चालवील कारण त्याला लहानपणापासून घरात तें शिक्षण मिळालेलें असेल. परतु अपवादरूपानें कोणी दुसरा हि धदा निवडू शकेल."

दादा—"तर मग या व्यवस्थेंत 'वर्ण' राहत च नाहींत. 'वर्णव्यवस्था' हा शब्द उच्चारल्याबरोबर जुनी रचना व त्यातील सर्व वाईट गोष्टी आपोआप येतात च."

बाबा—" कोणत्या हि शब्दावर प्रहार करण्यापूर्वी तुम्हाला याचा विचार करायला हवा कीं ज्या शब्दाविषयीं ( वर्णव्यवस्था ) भगवान् कृष्णापासून तो गांधी-विनोबापर्यंत सर्वांना आकर्षण वाटतें, तो शब्द 'व्यभिचार' 'दुराचार' या शब्दासारखा वाईट शब्द तर असू शकणार नाहीं. शब्द हे आमचीं शस्त्रे आहेत हें लक्षात असू द्या. जुने शब्द घ्यायचे कीं टाकून द्यायचे याचा विचार करताना दोन गोष्टी लक्षात ठेवायला हव्या —(१) त्या शब्दात नवा अर्थ भरला जाऊ शकतो कीं नाहीं ? (२) त्या शब्दाविषयीं असंख्य सत्पुरुषांना आकर्षण वाटतें का ? या दोन्ही दृष्टिकोनातून विचार करता असें आढळून येतें कीं 'वर्ण' हा शब्द घेणे च योग्य आहे. जुन्या शब्दात नवीन अर्थ भरणें ही अहिंसेची प्रक्रिया आहे. जुन्या शब्दांपैकीं काहीं शब्द जर असे असतील कीं त्यात नवा अर्थ भरणें शक्य नसेल तर ते शब्द सोडून देता येतील किंवा ते शब्द कापून फेकून देता येतील. पण शब्द सोडून देणें हे च अहिंसेच्या प्रक्रियेच्या दृष्टीनें अधिक उचित ठरेल."

दुसऱ्या दिवशींच्या प्रार्थनेत बाबानीं ग्राम-कुटुंब बनविणें हा ' मध्यम मार्ग ' आहे असें म्हटले. ते म्हणाले, " जमिनीवर व संपत्तीवर व्यक्तीची मालकी ठेवणें म्हणजे डबक्यासारखें ममत्वाला संकुचित करणें होय. सर्व च साऱ्या समाजाची मालकी आहे असें म्हटले तर तें समुद्रासारखें होतें. त्यात व्यक्तीला आपलें स्थान कळत नाहीं. पण गावची मालकी करणें म्हणजे सुंदर नदीसारखें आहे. त्यात डबक्याचा, संकुचितपणाचा व अशुद्धतेचा दोष हि उरत नाहीं व समुद्राप्रमाणें ती मोठ सामान्य माणसाच्या आकलनशक्तीच्या पलीकडे हि जात नाहीं. व्यक्तिगत मालकीहक्काचे दुष्परिणाम टाळून व्यक्तीला कामाची प्रेरणा व स्फूर्ति राहावी अशी ही आमची ग्रामपरिवाराची योजना म्हणजे बुद्धदेवाचा ' मध्यम मार्ग ' आहे."

तो असा की, साधना ही सामूहिक व्हावी. याचा अर्थ असा की सामूहिक जीवन हे च 'जीवन' आहे. व्यक्तीचें जीवन जितक्या अर्थानें समाजाचा एक अंश असेल तितक्या च अर्थानें तें 'जीवन' आहे असें मानावें. म्हणून आपला प्रत्येक सद्‌गुण सामाजिक सद्‌गुण असावा."

कोरापुटमध्ये ग्रामदानात मिळालेल्या गावासंबंधींचे आकडे गोळा करण्याचे काम चालू होतें. ते आकडे पाहून गणितात किती काव्य असतें याची प्रथम च जाणीव झाली. ग्रामदानाच्या गावांतील सर्वांत मोठें गाव म्हणजे कोरापुट ठाण्यातील लाटमगुडा. तिथें शंभर कुटुंबें आहेत व जमीन ७२२ एकर आहे. सगळ्यात लहान गाव विषमकटक ठाण्यातील सिरीजुडी. तेथील लोकसंख्या अवघी ३३ आहे व जमीन २८ एकर आहे. अंबादोळा ठाण्यातील सिरीजुडी गावातील अवजा दोरा काल्पर्यंत ५९ एकराचा मालक होता. त्याला माहीत होतें कीं मी मातींतून निर्माण झालों व शेवटी मातींत मिसळणार ! त्यानें सर्वस्वदान दिलें नी पुनर्वितरणात भू सेवक या नात्यानें मिळालेल्या ११ एकर जमिनीचा त्यानें आनंदानें स्वीकार केला. तसा च तो केमिंगपूर ठाण्यातील इटाका काला ६५ एकराचा मालक होता पण त्याच्या भारतीय हृदयाला हें कळायला वेळ लागला नाहीं कीं मरताना या ६५ एकरापैकीं एक मूठभर माती मुद्दा भी बरोबर नेऊ शकणार नाहीं. मात्र पुढच्या त्या अनंत प्रवासात या जन्मींचें पुण्यकर्म तेवढें माझी साथ देईल. तेव्हा त्याने स्वामित्वासारखी अशाश्वत वस्तु सोडून हृदयाचें समाधान ही शाश्वत वस्तु मिळवली. आपली सारी जमीन भूदानयज्ञात अर्पण करून आज तो साडेसात एकराची सेवा करणारा भूमिपुत्र बनला. हनुमतपूरच्या हाऊका मुदाला सर्व भूमिहीनांत अधिक २२ एकर जमीन मिळाली. इथें बरीचशी चांगली जमीन व्यापारी व सावकाराच्या हातात आहे. पण अंबादोळा ठाण्यातील कुटागजिडी गावात मात्र जमीन हि जास्त व संख्या कमी आहे. त्यामुळें पुनर्वितरणात तेथील लोकांना दर माणशीं इतर सर्व गावाहून जास्त म्हणजे चार एकर चांगली जमीन मिळाली. त्या च ठाण्यातील कुम्भारगुडा गावात सर्वांत कमी म्हणजे माणशीं १२ डेसिमल जमीन मिळाली

सूर्योदयाच्या सुमारास नावेनें वैशधारा पार करून 'पद्मपूर' गावात प्रवेश केला. हें दोन हजार वस्तीचें एक मोठें गाव आहे. इथें बरेच बडे जमीनवाले आहेत व काहीं भूदानविरोधी आहेत असें कळलें. सध्या आमच्या-बरोबर असलेले दोन तीन सुशिक्षित पाहुणे आज दुपारीं येथून तीन मैलावर असलेल्या एका गावात जाऊन आले. तिथें त्यानीं गावातल्या एका पूर्वीच्या सधन जमीनमालकाला म्हटलें, "तुम्हीं आपली सारी जमीन ग्रामदानात देऊन टाकलीत आणि पुनर्वितरणात तुम्हाला फार च कमी मिळाली. शिवाय ती हि जमीन तुमच्या मालकीची राहिली नाहीं च. ते विनोबा तुम्हाला बेवकूफ बनवीत आहेत नी तुम्ही बनत आहात! हें कसें कळत नाहीं तुम्हाला?" त्या माणसानें चटकन् उत्तर दिलें—"हें पहा महाराज, देवानीं आम्हाला देखील थोडीबहुत बुद्धि दिली आहे म्हटलें! धर्म कशात आहे तें फक्त तुम्हाला च कळतें असें नाहीं, आम्हाला हि त्यातलें काहींतरी कळतें! तुम्ही आमची परीक्षा घेऊन राहिला आहात हें समजलें मला! पण हें पहा, आपल्या गावाच्या हिताचा विचार करून जें योग्य वाटलें, तें च केलें आहे मीं!"

अडाणी खेडवळाच्या तोंडचे ते उद्गार ऐकून आमचे विद्वान् बंधु थक्क च झाले! या घटनेचा उल्लेख करीत विनोबानीं प्रार्थनाप्रवचनांत म्हटलें कीं, "यावरून तुमच्या ध्यानात येईल की ज्यानीं ग्रामदान दिलें ते अडाणी आहेत म्हणून दिलेलें आहे असें नसून ते चागले बुद्धिमान् आहेत म्हणून त्यानीं ग्रामदान दिलेलें आहे."

## ' पद्भ्याम् पृथिवी '

पनेकम्
१६ सप्टेंबर १९५५

पनकम्च्या प्रवचनात एका मूलभूत विचाराचें विवेचन करीत असताना विनोबा म्हणाले—" ग्रामदानाच्या द्वारे सामूहिक साधनेस आरंभ होत आहे. आणि हें काम अशा पद्धतीनें होत आहे कीं त्यायोगें पाश्चात्य समाज शास्त्रज्ञानीं निर्माण केलेला ' व्यक्ति विरुद्ध समाज ' हा वाद च अर्थशून्य होऊं पाहत आहे. कारण इथे व्यक्ति आपल्या स्वेच्छेनें आपल्या वैयक्तिक स्वार्थाला समाजात विलीन करीत आहे. तेव्हा ग्रामदान देणारे लोक एका नव्या समाजशास्त्राची व नीतिशास्त्राची निर्मिति करीत आहेत. ह्या लोकानीं स्वार्थ व परमार्थाचा वाद देखील मिटवून टाकला आहे."

विनोबा पुढे म्हणाले, " आपल्याला असा समाज निर्माण करायचा आहे कीं ज्यात वेगवेगळे धंदे राहतील पण वेगवेगळ्या जाति राहणार नाहींत, तर वृत्ति राहतील. प्रत्येकजण म्हणेल कीं माझी वृत्ति कुंभाराची, शिक्षकाची किंवा विणकराची आहे. पण त्या च बरोबर प्रत्येक व्यक्ति शेतकरी हि असेल. या भागातील आदिवासी लोकानीं आपला भूमिसेवेचा मूलधर्म अद्याप सोडला नाहीं. ते भूमातेची सेवा करतात नी प्राचीन आर्यांप्रमाणें सूर्य, वरुण इत्यादि मूल देवतांची पूजा करतात. साऱ्या भारताला भूमिसेवेच्या मूलधर्माची, आदिधर्माची दीक्षा देणें हें माझें उद्दिष्ट आहे."

अर्वाचीन ऋषिमुखातून निघालेला भूमिसेवेच्या आदिधर्माचा सनातन विचार ऐकत असताना मला मुण्डकोपनिषदातील एका श्लोकाचें स्मरण झालें. त्यात ऋषि परमेश्वराचें वर्णन करताना म्हणतो कीं, " अग्नि हें त्याचें मस्तक आहे, चन्द्र नी सूर्य हे त्याचे दोन डोळे आहेत, दिशा म्हणजे कान आहेत, विस्तृत वेद ही त्याची वाणी आहे, वायु त्याचा प्राण आहे, हें सारें विश्व म्हणजे त्याचें हृदय आहे आणि त्याच्या चरणातून ही पृथ्वी निघाली आहे. असा हा सर्वभूतान्तरात्मा आहे."

'अग्निर्मूर्धा चक्षुषी चन्द्रसूर्यौ
दिशः श्रोत्रे वाग् विवृताश्च वेदाः ।
वायुः प्राणो हृदयं विश्वमस्य
पद्भ्याम् पृथिवी ह्येष सर्वभूतान्तरात्मा ॥ '

भक्ताला देवाच्या चरणाचा ध्यास लागलेला असतो. नामदेव म्हणतो,

'सच्चिदानंदघन तेथें हारपलें मन,
त्याहूनि चरण गोड तुझे ।'

ऋषि म्हणतो कीं पृथिवी परमेशाच्या चरणातून निघाली आहे. म्हणजे भूमिसेवा ही परमेशाची चरणसेवा च झाली. म्हणून तर बाबा म्हणतात कीं, "भूमिसेवा हें भगवद्भक्तीचें एक सर्वश्रेष्ठ साधन आहे. तेव्हा भू-मातेची सेवा करण्याचा प्रत्येक भूमिपुत्राला अधिकार आहे एवढें च नव्हे प्रत्येकाचें तें कर्तव्य देखील आहे."



## अरण्ययात्रेंतील निर्मिति

तुवकोणा, बडमुलगा
१७, १८ सप्टेंबर १९५५

सध्या आमच्याबरोबर एक अमेरिकन भगिनी आहे. ती जिथें जाईल तिथें साहजिक च तिला पाहण्याकरता म्हणून गावची सारीं पोरंसोरं गोळा होतात. त्यातून तिने हिंदुस्थानच्या वाढत्या लोकसंख्येविषयीं पूर्वी वाचलेलें होतें च. त्यामुळें तिनें बाबाना लोकसंख्येच्या भयानक समस्येविषयीं विचारलें. त्यावर बाबानीं उत्तर दिलें कीं, "हे पहा, सध्या माझ्याजवळ या कोरापुट जिल्ह्याचे सारे आकडे आहेत. इथें प्रत्येक कुटुंबात एक पुरुष, एक स्त्री व एक किंवा सव्वा मूल अशी सरासरी आढळते. तेव्हा इथें तर वाढत्या लोक-संख्येचा प्रश्न अस्तित्वात च नाहीं. पण या प्रश्नाकडे वेगळ्या च दृष्टि-कोनातून पहायला हवें आहे. देवाने प्रत्येक माणसाला खाण्याकरता एक

लहानसें तोंड दिलें आहे व काम करण्याकरता दोन लाब हात दिले आहेत. आज वाढत्या लोकसंख्येचा प्रश्न भासतो याचें कारण असें कीं हाताना काम दिलें जात नाहीं. जर ग्रामोद्योगाच्या द्वारें सर्वांना काम देण्याची योजना झाली तर मग आपण असे नाहीं म्हणणार कीं, 'आमच्या घरात खाणारीं पाच तोंडें आहेत.' तर उलट असें म्हणू कीं, 'आमच्या घरात काम करणारे दहा हात आहेत.' लोकसंख्या फार वाढू नये हें मला मान्य च आहे. *पण संख्या कमी रास्यण्याचे काम पुण्यानें व्हावें, पापानें होऊं नये,* असें मला वाटते. पापानें संख्या वाढण्यात काय किंवा कमी होण्यात काय समाजाचें नुकसान च आहे. पृथ्वीला संख्येचा भार होत नसून पापाचा भार होतो हें लक्षात ठेवा."

बाबा द्वारकोभाईंना थट्टेत म्हणाले कीं, "तुम्ही लोक आश्रमात इंग्रजी पुस्तकें वाचता *अन् आसपासच्या लोकाना तर इंग्रजी कळत नाहीं. तेव्हा* हिन्दी पुस्तकें वाचत जा. हे बघ, इंग्रजी म्हणजे First Class Travel (पहिल्या वर्गानें प्रवास) आहे. आपल्याला आपला Third Class Travel (*तिसऱ्या वर्गानें प्रवास*) च बरा!" त्यावर मीं गमतीनें विचारलें, "अन् मग संस्कृत म्हणजे Air Travel (विमानाचा प्रवास) कीं पदयात्रा?" बाबा हसत म्हणाले, "संस्कृत म्हणजे छान उघड्या पगानें, अनवाणी पायानीं केलेली पदयात्रा!"

बहुधा बाबाचें निवासस्थान म्हणजे शाळा, धर्मशाळा किंवा पर्णकुटी हें असतें. पण तुम्बकोणाला प्रथम च एका आदिवासी घरात त्याचा निवास होता. घर भलतें च सुंदर होतें. काळ्या मातीनें सारवलेल्या गुळ-गुळीत भिंती व जमीन, लाल मातीनें सारवलेली किनार, दाराना चक-चकीत पॉलिश, नाजुक व सुबक रांगोळी अन् अगदीं आरशासारखी स्वच्छता. मोकळीं च मातीचीं भांडीं ओळीनें व्यवस्थित मांडून ठेवलेली. साधारणत. आदिवासींचीं घरें ठेंगणीं असतात पण इथलीं बेताचीं होतीं. घरासमोरच्या व्हरांड्यात छान ओटे असतात. बहुधा वाघाच्या भीतीनें हे लोक दार लावून घरात च झोपतात. त्यामुळें आम्ही ओट्यावर आपले बिछाने पसरले. प्रत्येक घर आपलें च होतें.

आज आम्हाला खास आदिवासी जेवण मिळाले. 'मुगा'चा भात, 'कागो'ची खीर व 'माडिया'च्या भाकरी. घराघरातून बायकांनी छोट्या भांड्यात भात व खीर शिजवून आणली होती. हे लोक लाकडाच्या मोठाल्या ओडक्याच्या भांड्यात पाणी साठवून ठेवतात व दुध्या भोपळ्याचे चमचे करतात. सगळ्याच्या पायात लाकडी खडावा दिसल्या. खडावाना वर लावलेले पट्टे चामड्यासारखे वाटले पण ते झाडाच्या सालींचे होते. गंजाम जिल्ह्यातील मण्याच्या माळा घालून पिसें लावणाऱ्या आदिवासींत नी इथल्या लोकांत खूप च फरक आढळला. इथले लोक विशेष च सुसंस्कृत वाटले.

बाबा तर इथल्या घरावर बेहद्द खुश झाले. आजच्या प्रवचनात हि त्याचा उल्लेख करीत ते म्हणाले, "या लोकांच्या जीवनात इतकें सौंदर्य आणि स्वच्छता आहे त्याची सांस्कृतिक पातळी चांगली च वरच्या दर्जाची आहे असें मानावें लागेल. अशा लोकांची नीति व चारित्र्याची पातळी देखील उच्च असायला हवी. आता इतकें सारे आहे नी ग्रामदानामुळें समाजभावना देखील निर्माण होत आहे, तेव्हा तुम्हाला आता उद्योग वाढविण्याकडे व ज्ञानप्राप्तीकडे लक्ष द्यायला हवें"

सध्याकाळीं आम्ही सारे बाबाजवळ बसलों होतों येथील लोकांच्या उत्थानाविषयीं चर्चा चालली होती. मीं म्हटलें कीं, "तुम्हीं बिहार यात्रेच्या अखेरच्या प्रवचनात म्हटलें होतें कीं मानवच्या इतिहासात शेतीचा शोध एक क्रान्तिकारी घटना आहे. त्यामुळें अहिंसेच्या विकासाला फार मदत झाली. तसें च सत्याग्रहाच्या तत्राचा शोध ही दुसरी क्रान्तिकारी घटना आहे आणि हे दोन्ही शोध भरतभूमींत च झाले."

बाबा— होय, शेतीमुळें मानवाची सांस्कृतिक आणि नैतिक पातळी वर उठली. त्यानंतर मानवानें अनेक शोध लावले पण शेतीसारखे मूलभूत क्रांतिकारी शोध फारसे झाले नाहींत बरेचसे शोध सुखसोयी वाढविणारे च आहेत मात्र क्लोरोफॉर्मचा शोध हा एक मानवाची नैतिक पातळी वाढवणारा शोध आहे. त्यायोगें माणसाच्या दयावृत्तीचा विकास होतो तो शोध लावण्यापूर्वीं एखाद्याच्या पोटात रोग असेल तर आपण त्याच्याकरता काहीं

च करू शकत नव्हतों पण आता ऑपरेशन करून त्याला बरें करू शकतों. माणसाची नैतिक पातळी उत्तरोत्तर उच्च होत जाईल व त्या च बरोबर विज्ञानामुळें सुखसोयी निर्माण होत जातील तर मग माणूस आपल्या रिकाम्या वेळेचा उपयोग ज्ञान आणि कलेचा विकास करण्यात घालवील.

बुलुभाईंनीं विचारलें, " कलेचें ध्येय काय ? "

बाबा— कलेचें ध्येय आहे आत्मदर्शन. आत्मदर्शनानें माणसाला आनंद होतो.

शिक्षणाविषयीं बोलताना बाबा म्हणाले, " या भागात आपल्याला शिक्षणाचें फार च मोठें कार्य करावयाचें आहे. इथें नई तालीम ला रूप च वाव आहे. नई तालीममध्यें विद्यार्थ्याला कोणकोणत्या विषयाचें ज्ञान द्यायचें त्यासंबधीं मीं एक सूत्र च बनवलें आहे—

**' मूलोद्योगः स गणितः मातृभाषा स राष्ट्रिका ।**
**समाज-सृष्टि विज्ञाने चित्रं संगीतमेव च । '**

' बडमुल्गा ' गावात गावच्या जमिनीचा चौथा हिस्सा दान मिळाला आहे व वितरण होऊन आज गावात कोणी हि भूमिहीन राहिलेला नाहीं. गावावर काहीं कर्ज आहे म्हणून गाववाले ग्रामदान देण्यास अजून तयार होत नाहींत असें कळलें. आजच्या प्रवचनात बाबांनीं जुन्या व नव्या समाजरचनेंतील विरोध दाखवताना म्हटलें—" जुन्या समाजरचनेचा एक नमुना मला इथें पहायला मिळाला. मीं असें ऐकलें कीं येथील, सावकार जितकें लोकाना कर्ज देतात त्याच्या दुप्पट वसूल करतात. आता जुन्या समाजाच्या या लोकाना असा प्रश्न विचारतों कीं आई आपल्या मुलाची सेवा करते तर त्याचा हिशोब लिहून ठेवते का ? जीवनाचा खरा आनंद देण्यात आहे याची जाणीव माणसाला होईल तेव्हा नवा समाज अस्तित्वात येईल. त्या नव्या समाजात सावकारी चालणार नाहीं. व्याज घेणें, भाडें घेणें, दलाली आणि नफेखोरी ह्यापैकीं काहीं हि राहणार नाहीं. याचा अर्थ असा कीं भांडवलाची गोष्ट च राहणार नाहीं. त्या समाजात भांडवल एका ठिकाणीं केंद्रित झालेलें राहणार नाहीं तर घराघरात वाटलेलें राहील. ह्यानें च

समाजाचें सामर्थ्य वाढेल. शरीरातलें रक्त साऱ्या शरीरभर खेळतें राहण्यानें च आरोग्य टिकेल."

पहाटे अडीचची वेळ. चहूकडे नीरव शांति पसरलेली. बाबा जागे होतात नी वेदमंत्र गाऊं लागतात. शेजारीं च झोंपलेला बाळ चटकन् उठतो व कंदील लावतो. नंतर पधरा वीस मिनिटांनीं सारें आटोपून बाबा चर्खा घेऊन बसतात ते साडेतीनच्या प्रार्थनेपर्यंत. पण गेल्या महिन्यात एका पहाटे अडीचला जागे होता च एक अपरिचित मंत्र बाळच्या कानावर पडला— 'अभिधेयम् परमसाम्यम्' आणि मग दिवसभर त्याला तसले च अपरिचित मंत्र ऐकू आले. दुसऱ्या दिवशीं बाबांनीं त्याला एक पाठकोरा कागद मागितला नी त्यावर ते कांहींतरी लिहू लागले. आठ दहा दिवस त्याचा हा च क्रम चालू होता. नंतर एकदा ते बाळला म्हणाले, "मीं 'गीता-प्रवचनें'वर सूत्रें तयार केलीं आहेत. एकूण एकशें आठ आहेत. एवढीं सूत्रें लक्षात ठेवलीं कीं सारें 'गीता प्रवचनें' डोळ्यासमोर उभें राहील." आणि मग त्यांनीं तीं सूत्रें म्हणून दाखवलीं. त्यानंतर गेले तीन आठवडे दिवसातून कितीदा तरी ते जोरजोरानें तीं सूत्रें म्हणत. आम्हाला बरींचशीं सूत्रें ऐकून ऐकून च पाठ होऊन गेलीं. कोरापुटच्या अरण्ययात्रेंतील ह्या 'निर्मिती'चें मूल्यमापन भविष्यकाळचे लोक च अधिक चागले करू शकतील. तसें च या यात्रेंत बाबांनीं ओडिया भागवताच्या निमित्तानें मराठी एकनाथी भागवत व संस्कृत भागवताचें पुन्हा अध्ययन करून संस्कृत भागवतांतील सर्वोत्तम असे तीनशे श्लोक निवडून काढले.

## साथ जीयेंगे, साथ मरेंगे

गरडा
१९ सप्टेंबर १९५५

शेतातून नद्यानाले ओलाडीत जाणारी वाट होती. भरदार हिरवीं शेतें पाहून वाटतें प्रसन्नता इथें साकारली आहे.

स्वच्छ, सुदर, सारवलेली जमीन, सुबक रागोळी, कमळाच्या फुलाचीं व पानाचीं तोरणें, कलश, दीप इत्यादींनीं सजविलेलें गरडा गाव पाहता च लक्षात आलें कीं हें ग्रामदानाचें गाव आहे. दुसऱ्या जिल्ह्यातून आलेल्या कार्यकर्त्यांपैकी वृंदावनबाबू, सावित्रीअप्पा ( ओडिया भाषेंत 'अप्पा' म्हणजे 'ताई' ) व अन्नपूर्णाअप्पा ह्यानीं गरडा हें केन्द्र बनवून गेले तीन चार महिने या भागात काम केलें आहे. सजावट पाहून मी सावित्रीची प्रशसा करीत होतें तेवढ्यात 'चल, आणखी एक गमत दाखवतें तुला' असें म्हणून ती मला तिच्या झोपडींत घेऊन गेली. तिथें धान्याचे व भाज्याचे ढीग पडलेले दिसले. तितक्यात दोन तीन माणसें आलीं व आपलीं गाठोडीं सोडून 'हें धान्य घ्या' असें म्हणालीं. ती उत्साहानें सागू लागली, "ह्या भागात २५ गावें ग्रामदानात मिळालीं आहेत. आज बाबा इथें येणार म्हणून त्या गावातील लोकानीं आपापल्या शेतातील धान्यें व भाज्याफळें भेट म्हणून आणलीं नाहींत. आज तुम्हाला या भेटींचें च जेवण मिळणार. आज सभेंत वितरण होईल. मोठा च उत्सव आहे या गावात."

वृंदावनबाबू आपले अनुभव सागूं लागले : "गरडा गावातील लोकानीं ग्रामदानानतर खूप उत्साहानें नवनिर्माणाच्या कामाला सुरुवात केली आहे. गावची लोकसख्या १५० आहे व ३१ कुटुंबें आहेत. जवळ च रस्ता बाधण्याचें काम चाललें होतें तिथें मजुरी करून या विनोबा-जयतीला प्रत्येक कुटुंबानें दोन दोन रुपये देऊन अेक सहकारी दुकान स्थापन केलें आहे. बाहेरच्या सर्व वस्तु या दुकानद्वारें च घ्यायच्या असें गाववाल्यानीं ठरवलें आहे. एक ग्रामपचायत स्थापन केली आहे. तींत गावचे सर्व प्रौढ स्त्रीपुरुष सभासद आहेत. पचायतीचा अध्यक्ष पेंटाना दोरा वीस वर्षांचा

उत्साही तरुण आहे. सगळे गाववाले रोज सध्याकाळीं एकत्र जमून भजन करतात 'महाप्रभु (विनोबा) म्हणतात कीं दारू सोडली पाहिजे' हें ऐकल्यापासून त्याचें विचारचक्र सुरु झालें व एक दिवस सर्वांनीं मिळून दारू सोडण्याचा निर्णय घेतला. तीन जणानीं एकदा ह्या नियमाचें उल्लघन केलें म्हणून पचायतीनें त्याना दड केला दड द्यावा लागणें ही फार नामुष्कीची गोष्ट आहे असें हे लोक समजतात. त्यामुळें त्यानतर कोणीं च तो नियम मोडला नाहीं." 'आम्ही नवें जीवन निर्माण करणार. सारे मिळून सर्वांच्या सुखासाठीं झटणार' हा भाव गावकऱ्याच्या चेहऱ्यावर दिसत होता. वृदावनबाबू म्हणाले, "आम्हीं जिथें जिथें गेलों तिथें तिथें ग्रामदान तरी मिळालें किंवा गावच्या सर्व भूमिहीनाना पुरेल एवढी जमीन तरी मिळाली ज्या गावात अजून दान मिळालें नाहीं तिथें अजून आमचें जाणें च झालें नाहीं. नीट विचार समजावून सागितल्यास प्रत्येक गावात ग्रामदान मिळेल असा आम्हास विश्वास वाटतो"

सध्याकाळच्या सभेंत सात गावाचें वितरण झालें 'दुत्तेंगी' गाव, लोकसख्या १०१. एकूण कुटुबें २४ त्यापकीं १७ भूमिवान व जमीन १३२ एकर. 'पालका सिंकान'जवळ ९ एकर जमीन होती. आता त्याला ५ एकर मिळाली काडरका गुड्डूजवळ १० एकर होती त्याला ५ एकर मिळाली काडरका रामजिलाजवळ फक्त २९ सेंट जमीन होती. त्याला ५ एकर मिळाली मालकी हक्काच्या कल्पना कोसळून पडल्या.

आमच्यापैकीं एकानें शेजारच्या एका ग्रामदानाच्या गावच्या लोकाची परीक्षा घेण्याकरता म्हणून त्याना काहीं प्रश्न विचारले. प्रश्नोत्तरें फार च उद्बोधक होतीं.

"तुम्हीं आज तर ग्रामदान दिलेंत, पण उद्या दुसऱ्याच्या सागण्यावरून परत कराल!"

"आम्हीं एकदा दिलेली जमीन घेणार नाहीं" लोकानीं निर्धारानें उत्तर दिलें

"ग्रामदान कशाला दिलेंत?"

" सुखी होण्याकरता ! "

" सावकार तुम्हाला त्रास देतील तर मग काय कराल ? "

" आम्ही सारे एक झालों आहोंत. आता आम्हाला कुणाची हि भीति उरली नाहीं "

" आजवर तुमच्यातले अर्धे ( भूमिवान ) लोक पोटभर खायचे नी अर्धे ( भूमिहीन ) अर्धपोटीं रहायचे. पण आता तुम्ही सारे च उपाशी राहाल ना ! "

" आम्ही सर्व मिळून जगू, आणि मरू तर सारे मिळून मरू."

( ' हम जीयेंगे तो साथ जीयेंगे, मरेंगे तो साथ मरेंगे । ' )



## अहिंसेचा मार्ग म्हणजे वीरांचा मार्ग

निलमगुडा
२० सप्टेंबर, १९५५

डोंगराच्या कुशींत हिरव्यागार शेतामध्यें छोट्या छोट्या झोपड्यांचें ' पाकलमिंग ' गाव लागलें. पत्तिका पेंटाया स्मित सुमने उधळीत स्वागत करीत होता. ' विनोबाजी सागतात कीं तुमच्याजवळ जें काहीं असेल तें वाटून खा.' हा क्रान्तिविचार कानीं पडल्यापासून त्याच्या मनात खळबळ सुरु झाली होती. त्या गावात असलेल्या सार्‍या जमिनीचा सत्तर एकराचा तो एकटा च मालक होता. गावच्या सोळा कुटुंबापैकीं बाकीचीं पधरा कुटुंबें भूमिहीन होतीं. त्या सर्वांनीं त्याच्या शेतावर मजूर म्हणून काम करायचें हा वर्षानुवर्षांचा प्रघात होता. पण विचार वह्नीची ल्हानशी ठिणगी हृदय क्षेत्राला आग लावते आणि मग आधल्या क्षणापर्यंत हृदयात वास करणाऱ्या स्वामित्वाच्या, आसक्तीच्या, उच्चनीचतेच्या कल्पना जळून खाक होतात. त्याला रहावेना. त्यानें आपल्या पत्नीजवळ मनातलें मथन व्यक्त केलें. ' सर्वांचीं मुलेंबाळे पोटभर खातील ' हा विचार कोणत्या मातेला

आवडणार नाही? तिने आनंदाने संमति दिलेली पाहून त्याचें हृदय हि त्याच्या पावलाबरोबर नाचू लागलं. त्याने गरडाला जाऊन वृंदावनबाबूची भेट घेतली व आपल्या ७० एकर जमिनीचं दानपत्र त्यांच्या हातीं दिलं. काल च त्याच्या जमिनीचें विनोबाच्या हस्तें पुनर्वितरण झालें होतें. वितरणात त्याला ८ एकर ११ सेंट जमीन मिळाली व बिडका सौरा नावाच्या एका भूमिहीन मजुराला ८ एकर ५० सेंट मिळाली. 'कशाला जमीन दिलीस तू?' कोणीतरी पंड्याला विचारलें. "सारे मिळून खाऊं असा विचार करून दिली." त्याने उत्तर दिलें. तें उत्तर भोळ्या श्रद्धेचें नव्हतें तर बुद्धीला पटलेल्या नव्या विचाराचें द्योतक होतं.

गेले दहा बारा दिवस आल्फ्रेड नावाचा एक जर्मन तरुण यात्रेंत आहे. यांत्रिकीकरण व सैनिकीकरणाच्या अत्युच्च बिंदूवर गेलेल्या व महायुद्धाच्या ज्वाळांत होरपळलेल्या देशांतून तो गांधींच्या देशांत सुखाच्या व शांतीच्या शोधार्थ आला होता. कोरापूटची क्रान्ति पाहून एक नवा विश्वास घेऊन तो परत जात होता. आज जातांना त्यानें बाबांना कांहीं प्रश्न विचारले.

प्रश्न—प्रचंड प्रमाणावर औद्योगीकरण झालेल्या देशांत (उदा० जर्मनी) भूदान आंदोलन कोठवर शक्य आहे? तिथें लोक अत्यंत भौतिकवादी व स्वार्थी असतात.

उत्तर—लोकांना हें कळलं पाहिजे की भौतिक वादाचा खरा भौतिकपणा संपत्ति आपापसांत वाटून घेतल्यानें अमलांत येतो. आणि असं झालें म्हणजे भौतिक वाद विरतो. शहाण्या स्वार्थासाठीं सुद्धां संपत्तीची एकमेकांत वाटणी आवश्यक आहे. आणि म्हणून औद्योगीकरण झालेल्या देशांत सुद्धां एकमेकांत संपत्तीचें विभाजन जरूर आहे.

प्रश्न—मला नक्की शब्द आठवत नाहींत. पण गांधीजींनीं असें कांहीं तरी म्हटलें आहे कीं कांहीं परिस्थितीमध्यें अन्यायाविरुद्ध हिंसाशक्तीचा वापर करावा लागतो. अहिंसक मार्गापासून आपल्याला दूर जायचें नसेल तर योग्य पद्धति कोणती?

उत्तर—अहिंसेचा मार्ग हा शूराचा मार्ग आहे, भित्र्याचा नव्हे.

म्हणून आमची कसोटी ही कीं भयामुळें आम्हीं कांहीं करता कामा नये. हृदयात भय नसेल आणि अशा स्थितींत हातीं तलवार असली तर चालेल हि. पण हृदय भयाने भरलें आहे आणि म्हणून हातीं तलवार नाहीं हें त्याहून हि भयानक आहे. शारीरिक बाह्य हिंसेपेक्षा मानसिक हिंसा अधिक वाईट आहे. म्हणून आमची खरी कसोटी निर्भयता ही आहे.

प्रश्न—विज्ञान आणि धर्म एकत्र नादू शकतात का ?

उत्तर—का नादू शकणार नाहींत ? त्यांचें एकमेकांशीं छान जुळू शकते. विज्ञानाचें क्षेत्र बाह्य जग आहे, धर्माचें अंतर्जगत् अर्थात् आत्मा आहे. म्हणून दोन्हींमध्यें शत्रुत्व असण्याचें कांहीं कारण नाहीं. दुर्दैवाची गोष्ट कीं ( धर्म ) शास्त्रातले प्रत्येक वाक्य हें आपण अंतिम प्रमाण मानतों. पण ज्या विज्ञानाच्या विरुद्ध जातात अशा शास्त्रातील कांहीं गोष्टी आपण सोडायला पाहिजेत. ज्या श्रद्धा विज्ञानाच्या प्रहारानें कोलमडतात त्या श्रद्धा च नव्हेत. त्या टाकून दिल्या पाहिजेत. हें हि लक्षात ठेवायला पाहिजे कीं 'वैज्ञानिक' हा कांहीं विज्ञानाच्या प्रयोगशाळेतील वस्तु नव्हे. धर्माचा संबंध आतील आत्म्याशीं आहे.

प्रश्न—'*मी नास्तिक आहें, माझा परमेश्वरावर विश्वास नाहीं, प्रार्थनेच्या शक्तींत हि नाहीं पण जीवनाचा मार्ग म्हणून अहिंसेवर विश्वास आहे*' असें म्हणणाऱ्याला तुम्ही काय म्हणाल ?

उत्तर—अहिंसेवरील श्रद्धा ही ईश्वरावरील श्रद्धेसारखी च आहे. परमेश्वर मानवाकडून प्रशंसेची अपेक्षा करीत नाहीं. तुम्ही जर चांगले असाल तर तुम्ही देवावर विश्वास नाहीं ठेवलात तरी देव तुमच्यावर विश्वास ठेवील.

सध्याकाळ होता च आम्हीं नित्याप्रमाणे 'गीता प्रवचनें' घेऊन बसलों. अखेरचा अध्याय संपत आला. मी मराठीतलें शेवटचें वाक्य वाचलें. कुंजुभाईंनीं ओडिया अनुवाद वाचला. पुस्तकें मिटलीं. उत्कल यात्रेचा हि अखेरचा अध्याय संपत होता. उद्या तुजेंद्रीला जायचें. तिथें आठ दिवस सर्वसेवासंघाची बैठक व उत्कल भूदान-कार्यकर्त्यांचें संमेलन व्हायचें होतें.

आणि मग लगेच एक ऑक्टोबरला आंध्रांत प्रवेश. म्हणजे एकूण आजचा दिवस हा यात्रेचा अखेरचा दिवस! गेल्या आठ महिन्यांच्या यात्रेंतील स्मृति आठवू लागल्या. वनराज सिंहासारखे महान् पण आमचे 'बाप्पा', सर्वांवर मातृत्वाची पाखर घालणाऱ्या 'बोऊ', आपल्या विमुक्त जीवनानें क्रान्तीचा पाठ देणाऱ्या 'नुमा', जुन्या जगांतील सत्ताधीश असून हि नव्या जगातल्या प्रथम सेवकाचें जीवन जगणारे 'बापी', प्रेमळ मंगलाभावशी, सदा आनंदी व सेवापरायण व्यासजी, वडील भावाची गंभीरता व जबाबदारी घेतलेले बुलुभाई, उत्साही तरुणाचे प्रतिनिधि प्रफुल्ल अनादि, 'हातीं काम व मुखीं गान' असलेला हसतमुख निशाकर, इतर सारीं कामें करीत उपनिषदाच्या वर्गांत सर्वांच्या आधीं हजर राहणारा लहानगा 'कृश' या सार्‍यांचा निरोप घ्यायचा होता. मन काहींसें अस्वस्थ होतें. पण तरी हि एका च ध्येयाच्या धाग्यात सर्वांचीं जीवनें एकत्र गुंफलीं गेलीं होतीं त्यामुळें निरोपाच्या क्षणीं देखील अंतरींची समीपता आता निर्माण होणारें भौतिक अंतर भासू देत नव्हती.



## जीवनाचें उपनिषद्

कुजेन्द्री, जगन्नाथपूर
२१ ते ३० सप्टेंबर १९५५

पाया तयार झाला. मंदिराच्या उभारणीचा आरंभ व्हायचा होता. शिल्पकार, गवंडी, कारागीर, सारे आले. योजना तयार होऊं लागली. ओरिसांत आतापर्यंत आठशेंनारा गावांचें ग्रामदान झालें आहे, त्यांतील सहाशेंपाच गावें तर कोरापुट जिल्ह्यांतील आहेत.

कुजेन्द्रीला एक छोटेंसें संमेलन च भरलें होतें. सर्वसेवासंघाचे सदस्य, कोरापुटच्या क्रान्तीला जीवन वाहिलेले उत्कलचे लहानथोर कार्यकर्ते, अधिकारपदावरील व्यक्ति वगैरे मिळून दोंदोनशें मंडळी जमली होती. कोरापुटच्या निर्माणकार्याची जबाबदारी सर्वसेवासंघ व नवजीवनमंडळानें

उचलली. उत्कलमधील बहुतेक सर्व प्रमुख कार्यकर्त्यांनी कोरापुटमध्ये च राहण्याचा सङ्कल्प केला सर्वसेवासंघाचे सरचिटणीस श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे आता इथे च राहणार आहेत. भारत सरकार, उत्कल सरकार, गांधीनिधि व इतर हि कित्येक संस्थानीं येथील कामाला सर्व तऱ्हेचें साहाय्य करण्याकरता सहकार्याचा हात पुढें केला. बाबा म्हणाले, " एखाद्या कामाला सर्व च लोकांनीं अनुकूल व्हावें ही एक अद्भुत च घटना आहे इथल्या निर्माणकार्यांत मदत करायला सारे च उत्सुक आहेत पण आपल्याला मदत घेताना मात्र विवेक बाळगायला हवा."

कुजेंद्रींत सध्या कोरापुटमध्ये काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचें एक प्रशिक्षण शिबिर चालले आहे. कार्यकर्त्यांना मार्गदर्शन करीत बाबा म्हणाले, " आपल्या सर्व कार्याचा आधार आहे जनशक्ति आणि उद्देश नैतिक उत्थान जनशक्ति आणि नैतिक उत्थान या दोन्ही गोष्टी अभिन्न आहेत नैतिक शक्तीहून वेगळी अशी कोणती हि शक्ति ही जनशक्ति होऊ शकत नाहीं. आम्हाला लक्ष्मीचा अनुग्रह अवश्य हवा आहे पण विष्णुकृपेच्या सोबत हवा आहे."

इथें आपल्याला अहिंसक समाजरचना निर्माण करायची आहे असें सांगून बाबा पुढें म्हणाले, " आज सारें जग केन्द्रित शासनव्यवस्थेच्या मगरमिठींत सापडलें आहे ही परिस्थिति कायम आहे तोंवर जगात शांतता निर्माण होणे अशक्य आहे आज साऱ्या देशात शांति राखण्याची किंवा साऱ्या देशाला अशांतीच्या वणव्यात फेकण्याची शक्ति देशाच्या सरकारजवळ आहे त्यामुळें सरकार आणि जनता यामधील पालक पाल्य हा संबंध कायम च राहतो तेव्हा आपण हें लक्षात ठेवायला हवें कीं आपला उद्देश जनतेला केवळ सुशासनाकरता तयार करणें हा नसून स्वशासनकरता तयार करणें हा आहे. स्वशासनाचे दोन पैलू आहेत (१) सत्तेचें विकेन्द्रीकरण व (२) शिक्षणशास्त्र, तत्त्वज्ञान व मानसशास्त्र यांत अहिंसेचें तत्त्व मान्य करणं ' आत्म्याहून देह वेगळा आहे, आपण देहस्वरूप नसून आत्मस्वरूप आहोंत, म्हणून कोणी आपल्या देहाला त्रास दिला तरी हि आम्ही त्याला वश होणार नाहीं ' हें आहे आपलें तत्त्वज्ञान. इतरांशीं व्यवहार करताना

आपल्याला कांहीं नियम पाळायला हवेत. त्यातला मुख्य नियम हा कीं व्यक्तिगत मन हें गौण आहे असें समजून आम्ही सामूहिक बुद्धीला प्रधान स्थान देऊ. हें झालें आपलें मानसशास्त्र; तसें च शिक्षणशास्त्रात, मानसशास्त्रात आणि परस्पर व्यवहारात शारीरिक किंवा भौतिक सजा आणि लोभ या दोन्ही हि गोष्टी राहणार नाहींत. भयाप्रमाणें च लोभामुळें हि हिंसा वाढते हें लक्षात ठेवायला हवें."

बाबा म्हणतात कीं, "कोरापुट जिल्ह्यात यापुढें संपत्तिदानाचें काम खूप जोरात चालायला हवें. कारण ज्याच्याजवळ जमीन आहे तो च भूदान देईल पण जो खातो तो संपत्तिदान देईल. न खाणारा असा माणूस आहे तरी का जगात? संपत्तिदानयज्ञात प्रत्येक माणूस आपल्याजवळ असलेल्या वस्तूचा एक हिस्सा समाजाला अर्पण करून मग उपभोग करील. कुंभार विटांचें दान देईल, मजूर श्रमाचें दान देतील, प्रेसमध्यें काम करणारे लोक महिन्यातून एखाद्या दिवसाचें श्रमदान देतील तर आपलें सारें भूदान-साहित्य फुकटात छापलें जाईल नी मग त्यावर चार दोन आणे किंमत लावून सारें साहित्य अगदीं स्वस्तात विकता येईल. अन् ते चार दोन आणे म्हणजे Russian aid (रशियाची मदत) होईल!" असें हि ते हसत हसत म्हणून जातात. संपत्तिदानयज्ञातील गर्भित शक्तीचें भान प्रथम कुजेन्द्रीच्या लोकानीं करून दिलें. दोन चार दिवसात च या गावच्या कित्येक लोकानीं आपल्या वर्षातील बारा दिवसाच्या श्रमाचें उत्पन्न दान म्हणून दिलें त्यात गरीब, श्रीमंत सारे च होते. चार पांच दिवसात च या गावात अडीचशे लोकानीं मिळून वार्षिक एकतीसशें रुपयाचें संपत्तिदान दिलें. संपत्तिदानाविषयीं बोलताना बाबा म्हणाले, "हें केवळ भूतदयेचें काम नसून करुणेचें, दयेचें राज्य प्रस्थापित करण्याचें कार्य आहे. आजच्या समाजात करुणा दासी आहे. तिला स्वामिनी बनवायचें आहे अपरिग्रहा-मध्यें चिंतामुक्ति आहे असें आजवर लोक मानीत असत. पण अपरिग्रहात असलेल्या शक्तीचें दर्शन करविणें हे आपलें ध्येय आहे. अपरिग्रहाचा अर्थ आहे अत्यंत परिग्रह, पण घराघरात वाटलेला. या योजनेंत एक कवडा देखील बेकाम राहणार नाहीं, प्रत्येक कवडीचा उत्पादनकार्यांत उपयोग होईल.

" लोक म्हणतात कीं विनोबा बड्या श्रीमंताची संपत्ति कशी हिरावून घेतो तें बघायचें आहे ! त्यावर मी म्हणतों कीं मला मुळीं संपत्तीचे मूल्य च नाहींसें करायचें आहे. माझा जन्म च संपत्तीचें मूल्य खतम् करण्या-करता झाला आहे असें मला वाटतें. संपत्तिदान देणाऱ्या हजारों गरिबांची सेना उभी झाल्यावर बड्याची संपत्ति टिकू शकणार नाहीं. ती संपत्ति आपणहून आमच्याकडे धावत येईल. ही अहिंसक प्रक्रिया लक्षात घ्या "

सर्व भूदानसमित्या बरखास्त करून भूदानकार्य जनतेच्या हातीं सोपविण्या-संबधीं सर्वसेवासंघाच्या सदस्यांशीं चर्चा करताना बाबा म्हणाले, " क्रांति कधीं हि संस्थेच्या द्वारें होऊ शकत नाहीं. संस्था फक्त क्रान्तिकार्यांत थोडी मदत करतात. पण क्रांति तर विचारपरिवर्तनानें च होते. काहीं व्यक्तींना नवविचार स्फुरतात आणि मग ते त्याचा प्रचार करतात. नंतर जेव्हां जनता त्या विचारांना कृतींत उतरवते तेव्हां क्रांति होते. साऱ्या संस्था बरखास्त करून निरपेक्ष व्यक्तींचे समूह ठिकठिकाणीं हिंडून प्रचार करतील नी जनता च हें काम उचलील तेव्हां क्रांति होईल. बाकीचे सारे आधार तोडून टाकाल तेव्हां तुम्हांला तो ' परम आधार ' मिळेल."

बाबांकडून ' निष्काम सेवकत्वा 'ची पदवी मिळवणाऱ्या उत्कलच्या कार्यकर्त्यांचें संमेलन सत्तावीस तारखेला सुरू झालें. त्यांत उच्चविद्या-विभूषितांपासून तों खेड्यातल्या अशिक्षित कार्यकर्त्यांपर्यन्त सारे होते. पावसाळ्यात अन् ते हि कोरापुट जिल्ह्यात काम होणें शक्य नाहीं असें च आजवर सर्वांना वाटत असे. पण येथील कार्यकर्त्यांनीं सिद्ध करून दाखविलें कीं हृदयात क्रान्तीची आग असली म्हणजे बाहेरचा पाऊस माणसाला अडवू शकत नाहीं. बाबांनीं स्वतः च इथें यात्रा सुरू केली नी मग एकाच्या पावलामागून अनेकांचीं पावलें पडू लागलीं. कार्यकर्ते आपापला अनुभव सांगू लागले.

डागबुरुटा विभागात काम करणारे वैद्यनाथबाबू म्हणाले, " प्रथम काहीं दिवस मी 'आज्ञा'( विश्वनाथ पटनाईक )च्या बरोबर हिंडलों. लोकांची त्यांच्यावर भारी श्रद्धा. त्यांच्या सहवासाचा माझ्यावर फार परिणाम झाला. मग मीं एकट्यानें हिंडून तीस गावाचें ग्रामदान मिळविलें. माझा असा

अनुभव आहे की इथल्या लोकांना आपलें तत्त्वज्ञान पटवून देण्याकरता जादी विद्वत्ता नको तर उदार अंतःकरण हवें. भीति दाखवून अगर धमकी देऊन तर ते मुळीं च ऐकणार नाहींत "

नवरंगपूरचे गर्जाभाई म्हणाले कीं, " बाबा येण्यापूर्वी आमच्या विभागात तीनशें गावात तेथील जमिनींचा सहावा हिस्सा दान मिळाला होता. पण नंतर जेव्हा आम्ही ग्रामदानाच्या, मालकीहक्काच्या विसर्जनाच्या गोष्टी सांगू लागलों तेव्हा तेथें कांहीं व्यापाऱ्यांनीं वगैरे विरोध करण्यास आरंभ केला व सावकार 'ग्रामदान द्याल तर तुम्हाला कर्ज देणार नाहीं' अशी धमकी देऊ लागले. तेव्हा कांहीं गावच्या लोकांनीं धावून जाऊन 'दान परत द्या' असें म्हणायला सुरवात केलेली पाहून आम्हीं त्यांचीं दानपत्रें त्यांना परत केलीं. नंतर रमादेवी तिथे आल्या व त्यांनीं लोकांना नीट समजावलें. तेव्हा दान परत मागणाऱ्यांपैकीं बहुतेक सर्वांनीं पुन्हा दान द्यायचें कबूल केलें. आतापर्यंत आमच्या विभागात अठेचाळीस गावांचे ग्रामदान झालें आहे. अन् तीं दानें अगदी पक्कीं आहेत."

उमरकोट भागात काम करणारे रघुनाथभाई म्हणाले कीं, " बाबांचीं प्रवचनें ऐकून माझ्यात दान मागण्याची हिंमत आली. पण मीं जेव्हा प्रथम कामाला सुरवात केली तेव्हा मला जंगलाची खूप भीति वाटायची. एकदा तर वाटेवर वाघाचीं पावलें उमटलेलीं बघून मीं पळत मागें परतलों. पण पुढें हळुहळू सवय झाली तिथल्या राजकीय पक्षाच्या कांहीं लोकांनीं मला म्हटलें कीं इथें ग्रामदान होऊ शकणार नाहीं, तुम्हीं परत जा. पण मग मी एकटा च जाऊन गावकऱ्यांना सर्वांना वाटून खाण्याचें तत्त्वज्ञान पटवून देऊ लागलों आणि त्यांना तें पटू लागलें. एका गावात एका दारू पिणाऱ्या माणसानें भूदानाचें तत्त्वज्ञान पटल्यामुळे दान दिलें. ते पाहून सर्वांवर फार च परिणाम झाला."

बऱ्या च कार्यकर्त्यांनीं आपापले अनुभव सांगितले. पण या सर्वांना प्रेरणा देणारे 'आशा' मात्र कुठें तरी कोपऱ्यात गुपचुप बसले होते. त्यांनीं कांहीं तरी बोलावें म्हणून सारे जण त्यांना आग्रह करू लागले. पण ते बोलायला तयार च होईनात. शेवटीं लोक अडून च बसले तेव्हा ते हळू च उठले

-नी एक च वाक्य बोलून खालीं बसले. "मीं काहीं च केलें नाहीं. इथें जें काम झालें तें सर्व गोपबाबूंच्या आशीर्वादानें व माझ्या सर्व सहकाऱ्यांच्या साहाय्यामुळें झालें." हें वाक्य ऐकून सारे सद्‌गदित झाले

इतर प्रांतांतून आलेले बडे पाहुणे वानरसेनेच्या पराक्रमाचा वृत्तान्त मन लावून ऐकत होते. बिहारच्या एका पुढाऱ्यानें तर असे उद्गार काढले कीं, "आजची सभा फारच उत्स्फूर्त करणारी होती. लहान माणसें देखील श्रद्धेच्या बळावर किती महान् कार्य करू शकतात याचें आज इथें दर्शन घडलें."

बाबांनीं समारोपाच्या भाषणांत म्हटलें कीं, "ज्यांनीं सर्वांत जास्त काम केलें ते काहीं च बोलू शकले नाहींत. त्यांनीं विनयपूर्वक जें वाक्य म्हटलें त्यांत फार मोठें सत्य दडलें आहे. खरोखर च ईश्वराला ज्याच्या हातून काम करवून घ्यायचें असेल त्याच्या हातून तो करवून घेतो. त्यामुळें कोरापूटमध्यें जें कार्य झालें तें ईश्वराच्या करुणेमुळें च झालें. इथें ग्राम-राज्याच्या स्थापनेचें जें कार्य होणार आहे त्यांत देशभरच्या सर्व सर्वोदय कार्यकर्त्यांची कसोटी होणार आहे. निष्काम वृत्तीनें काम करण्यांत च आपलें यश निहित आहे मग तें जें दुसरें यश आहे तें त्याच्या पाठोपाठ आल्यावाचून राहणार नाहीं."

एका जुन्या रचनात्मक कार्यकर्त्यानें बाबांना पत्र लिहून विचारलें होतें कीं, "तुम्ही आतां किती दिवस हिंडणार? कोरापूटमध्यें एवढीं गांवें मिळालीं आहेत तर तिथें च राहून सर्वोदयाचें सजीव चित्र निर्माण करण्याचें काम कां हातीं घेत नाहीं?" याचा उल्लेख करून बाबा एका प्रवचनांत म्हणाले कीं, "मीं इथल्या निर्माणकार्यांची सारी नीट व्यवस्था केली आहे. पण मी कां हिंडतों ह्या प्रश्नाचें उत्तर वेगळें च आहे. काहीं माणसांना जेव्हां एखाद्या नवविचाराचें दर्शन घडतें तेव्हां ते त्यानुसार आचरण करू लागतात नी मग त्याच्या प्रचाराकरतां बाहेर पडतात. वैदिकांना जेव्हां एक नवा जीवनविचार मिळाला तेव्हां '**चरैवेति चरैवेति**'चा आदेश देऊन ते संचारार्थ बाहेर पडले व साऱ्या जगभर गेले. बुद्धदेवाला एक नवीन विचार सुचला तेव्हां त्यांनीं आपल्या शिष्यांना आदेश दिला कीं, 'हे भिक्षूंनो,

बहुजनहिताय बहुजनसुखाय सतत विचरण करीत रहा.' बुद्ध महावीराच्या काळात हजारों स्त्रीपुरुषानीं परिव्राजक बनून अखंड संचार करीत धर्मप्रचार केला. शंकर, रामानुज, महंमद, येशू—सान्यानीं हें च केलें. जेव्हा एखाद्या नवविचाराचा उदय होतो तेव्हा तो विचार माणसाला स्वस्थ बसू देत नाहीं. तो विचार च माणसाच्या पायाना गति देतो. आम्हाला हि सर्वोदयाचा नवविचार मिळाला आहे. तेव्हा ही वेळ एका जागीं बसण्याची नाहीं. मानवमात्राला हा नवसंदेश देण्याकरिता निरहंकार होऊन सतत संचार करीत राहणें हा च आमचा धर्म आहे."

जगन्नाथपूरला उत्कल यात्रेच्या अंतिम प्रवचनात बाबानीं या यात्रेला 'शक्तियात्रा' हें नाव देत म्हटलें कीं, "समाजातील अन्याय व विषमते-विरुद्ध इथें एक शांतियुद्ध सुरू झालें आहे. अन्याय आणि विषमता नाहींशीं झाल्यानतर मग शांति होईल अशी पुरुषार्थहीन आशा आम्ही करीत नाहीं तर शांतीची शक्ति प्रकट करून आम्ही सारे अन्याय नाहींसे करू अशी पुरुषार्थमय आशा ठेवली आहे. येथील ग्रामीणानीं त्या शांतीच्या शक्तीचा शोध केला आहे. आपण हें विसरता कामा नये कीं विश्वात जे अन्याय घडत असतात त्याचा एक अंश आमच्यात हि असतो त्या च प्रमाणें विश्वशांतीची शक्ति देखील आमच्याजवळ असते.

"इथें मला खूप चिंतन करायला मिळालें आणि त्यामुळें माझी शक्ति वाढली आहे. आणि म्हणून च मी म्हणतों कीं ही माझी 'शक्तियात्रा' झाली. आता याच्या बळावर भारताच्या हातीं जगातील साऱ्या समस्या सोडविण्याची शक्ति येऊ शकते."

या अरण्ययात्रेचा आरंभ ब्रह्मपुरात नी शेवट जगन्नाथपुरात झाला. जणू 'अशब्दम्, अस्पर्शम्, अरूपम्' (शब्द, स्पर्श, रूप या सर्वांच्या पलीकडे असलेल्या) अशा ब्रह्माची उपासना, 'सहस्रशीर्षा सहस्राक्षः सहस्रपात्' (हजार मस्तकें, हजार डोळे नी हजार पाय असलेल्या) अशा जगन्नाथाच्या, मानवसमाजाच्या उपासनेंत परिणत करण्याचें युग आलें असल्याची सूचना होती ती !

ऋषि शान्तीचा त्रिवार जप करून सुचवीत कीं, 'शांतीनें शांतीची

उपासना करून शांति मिळवायची, अविरोधात्मक वृत्तीनें अद्वैताची उपासना करून अमरत्व संपादन करावयाचे.' ऋषींच्या दिव्य चक्षूना झालेलें क्रान्तदर्शन आज धर्मचक्राचें प्रवर्तन करूं लागले आहे. ऋषींनीं पाहिलेली अज्ञानाच्या पैलतीरावरील पहांट आज मानवजीवनाचें क्षितिज उजळूं लागली आहे. आता अहिंसेच्या मार्गानें ग्रामराज्य निर्माण करून विश्व-शांति स्थापित करायची आहे. स्वामित्वविसर्जन करून सर्वांच्या हृदयात रमणाऱ्या रामाची उपासना करीत मुक्त व्हायचें आहे. अरण्याच्या कुटीत राहणारीं ऋषींचीं बाळें कृतीच्या कुंचल्यानें जीवनाचें उपनिषद् रेखाटूं लागलीं आहेत. त्यातील पहिलें वाक्य आहे—

'हम जीयेंगे तो साथ जीयेंगे ।
मरेंगे तो साथ मरेंगे ।'